‘सत्य संकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ’

# न्याय-अन्याय

( स्वतंत्र लघुकथा संग्रह )



लेखक

दत्तात्रय विष्णु कीर्तने.

नवभारत प्रकाशन संस्था मुंबई नं. ४.

# कानगोष्ट

कानगोष्टी फक्त प्रेमाच्या माणसांबरोबरच करतात. माझी कानगोष्ट माझ्या प्रेमळ वाचकवर्गाकरितां आहे.

माझे सहाध्यायी श्री. गोविंद सर्वोत्तम वाघ व त्यांचे स्नेही श्री. वि. प्र. रामाणी यानीं १९३२ सालीं **आत्मोन्नति** नांवाचें मासिक चालविण्याकरितां घेतलें होतें. १९३३ सालपासून मी त्यांना स्नेहभावानें मदत करूं लागलों. श्री. वाघ यांच्या प्रेरणेनें मी स्वतंत्रपणें लघुकथा लिहिण्याचा यत्न केला. त्यांनीं उत्तेजन देऊन मला जिव्हाळ्यानें कल्पनातीत मदत केली. श्री. कै. हरी नारायण आपटे यांच्या कादंबऱ्या मी माझ्या विद्यार्थिदशेंतच वाचल्या होत्या. नंतर मी सम्राट साहित्य न. चिं. केळकर, मामासाहेब वरेरकर, प्रि. अत्रे, श्री. खांडेकर, प्रो. फडके, हॉलकेन, स्टीव्हनसन, पिरांदेलो, गोर्की वगैरेंचे वाङ्मय वाचलें. माझ्या सुरवातीच्या गोष्टी **आत्मोन्नति** मासिकांतून प्रसिद्ध झाल्या होत्या. त्यानंतर १९३५ सालपासून मी नवाकाळांत माझ्या गोष्टी देत होतों. चालू सालीं कांहीं गोष्टी सत्यकथेंतून प्रसिद्ध झाल्या आहेत. बहुतेक गोष्टी 'विष्णुदत्त' या टोपण नांवाखालीं प्रसिद्ध झालेल्या आहेत.

श्री. गो. स. वाघ-संपादक-**आत्मोन्नति** व **शारदा** यांचा माझा माझ्या विद्यार्थिदशेपासूनचा अत्यंत प्रेमळपणाचा स्नेह आहे. त्यांच्या प्रेरणेमुळें व उत्तेजनामुळें मी माझ्या आयुष्यांतील एक मोठ्या महत्त्वाचें दालन उघडूं शकलों व ही कलाकृति निर्माण करून जनतेची सेवा करण्यास समर्थ झालों त्याचें द्योतक म्हणून मी हा माझा पहिला संग्रह त्यांना आदरानें, कृतज्ञतेनें व बंधुप्रेमानें अर्पण केला आहे.

माझ्या लेखनव्यवसायांत माझे नातलग श्री. भुवनेश्वर भास्कर कीर्तने यांनीं मला वेळोवेळीं योग्य सूचना दिल्या. त्यांचा नामनिर्देश केल्यावांचून मला रहावत नाहीं.

संग्रहाचें प्रकाशन **नवभारत प्रकाशन संस्थेचे** सहृदय मालक यांनीं थोड्या अवधींत सुबक रीतीनें केलें त्याबद्दल मी त्यांचा सर्वथैव आभारी आहे. त्यांचा माझा परिचय प्रेमाचा व जिव्हाळयाचा आहे. मी त्यांचे नुसते आभार मानून मुक्त झालों असें नव्हे. त्यांचा मी कायमचाच उपकृत आहे.

कव्हरावरील प्रतीकात्मक चित्राची कल्पना माझे स्नेही श्री. द. र. चौधरी व श्री. र. धों. धोपेश्वरकर आर्टिस्ट यांच्या सहाय्यानें मुक्रर झाली आहे. त्यांचाही मी आभारी आहे. प्रूफें तपासण्याच्या कामीं श्री. गो. स. वाघ यांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून सहाय्य केलें त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. कथांची निवड फक्त १९३५ साल नंतरच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध कथांतून केली आहे.

हा माझा संग्रह मी मनांत काहीं हेतू धरून प्रसिद्ध केला आहे, त्याबाबतींत जास्त जरी नाहीं तरी, हळूच इतकेंच सांगतों कीं,

**अंतरीचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥**

त्याला अनन्यभावे शरण जाऊन ही कानगोष्ट माझ्या सहृदय वाचकवर्गाच्या सहनशक्तीवर ताण पडत नाहीं तोंच, आटोपती घेतों.

५-११-३८
**५८७ उमा-निवास**
डी. एल्. वैद्य रोड
मुंबई नं. १४

**दत्तात्रय विष्णु कीर्तने.**

माझ्यांत लेखनाची गोडी वाढवून ज्यांनीं मला वेळो-
वेळीं या कार्यांत उत्साह देण्यांत आणि इतर सहाय्य
करण्यांत मनःपूर्वक परिश्रम घेतले ते माझे परमस्नेही

**श्री. गोविंद सर्वोत्तम वाघ**

यांस माझ्या परिश्रमाचें हें पहिलेंच फळ अत्यंत
स्नेहभावानें, बंधुप्रेमानें आणि कृतज्ञतापूर्वक
अर्पण केलें आहे.

# ‘अधःपतन टळलें पण....?’

शीतलप्रकाशची पुण्यतिथी मोठ्या थाटानें साजरी होत होती. जो तो त्याच्या लिखाणाची तारीफ करीत होता. त्यानें केलेल्या बहुमोल कामगिरीबद्दल त्याला धन्यवाद दिले जात होते. जिथें तिथें त्याचीं स्मारकें करण्यांत आलीं होतीं. त्याचें अप्रसिद्ध लिखाण छापून काढण्याकरितां अनेक लोक पुढें सरसावत होते. तसेंच दुर्मीळ झालेले त्याचे ग्रंथ, पुन्हा मिळवून ते छापून काढण्यास निरनिराळे प्रकाशक अहमहमिकेनें पुढें सरसावत होते.

त्यानें जेव्हां वाङ्मयक्षेत्रांत पाऊल टाकलें, तेव्हां परिस्थिति कशी होती ? त्यावेळीं दैनिकें, साप्ताहिकें, त्रैमासिकें, मासिकें फारच बोकाळलेलीं होतीं ! शिक्षणाचा प्रसार सर्वत्र झपाट्यानें झाल्यामुळें, पदवीधर लेखकवर्गही बराच निर्माण झाला होता. अशावेळीं, एकाद्या बिनपदवीच्या होतकरू लेखकास मात्र जनतेच्या पुढें यायला अवसर मिळणें कठीण, नव्हे—दुरापास्तच झालें होतें ! शीतलप्रकाश काहीं पदवीधर नव्हता. त्याला फक्त वाचनाची व लेखनाची आवड होती. उठला सुटला लघुकथा लिहित होता, म्हणून त्यालाही वाटलें, आपणही लघुकथा तंत्राचा अभ्यास करूं, व आपणही लघुकथा लिहून नांव मिळवूं. त्यानें कुलीन स्त्रियानीं सिनेमानटींचीं कामें करूं नयेत असें प्रतिपादन करणारी एक लघुकथा लिहिली व ती छापून प्रसिद्ध करण्याकरिता तो एका संपादकाकडे गेला. संपादक महाशय त्रासिक चेहरा करून आपल्या कचेरींत बसले होते. टेबलावर बरींच वृत्तपत्रें, मासिकें पडलेलीं होतीं. संपादकांनीं लेखकास मुलाखत दिली. लेखकानीं आपली लघुकथा त्याच्या पुढें केली. गृहस्थाचा शिष्टाचारही त्यानीं पाळला नाहीं. संपादकानीं लघुकथा हातांत घेतली, तिचीं पानें भराभर चाळलीं व गोष्टीचें नाव पाहून म्हटलें,

'विषय उत्तम आहे. पण यावर पुष्कळ लघुकथा व लेख प्रसिद्ध झाले आहेत. तशांत–आपण कांहीं पदवीधर नाहीं. आमच्या मासिकांत आम्हीं फक्त, दोनच लघुकथा देत असतों अन् त्या सुद्धा, चांगल्या पदवीधर लेखकाच्या...'

संपादकानीं ड्रॉवर उघडला व त्यांतून एक एक लेख काढून ते लेखकास दाखवीत म्हणूं लागले.

'पाहिलेत—हे लेख ? या सर्व–लघुकथा, कविता, परीक्षणें प्रसिद्धीकरिता येऊन पडलीं आहेत. लेखक असे तसे नाहींत. मोठे पदवीधर आहेत. कमीत कमी दोन दोन तीन तीन तप केलेले, कसलेले खंदे लेखक आहेत–हे ! यात कुणी स्वतंत्र संग्रह प्रसिद्ध केले आहेत. कुणी कादंबऱ्या लिहिल्या आहेत. कुणी इंग्लीश वाङ्मयाचीं भाषांतरें, रुपांतरें, अनुवाद केले आहेत. आमचें मासिक महिन्यातून फक्त मोठ्या मुष्किलीनें एकदाच निघतें. आम्हीं त्यांत अवघ्या दोनच गोष्टी देतों. सांगा आतां—या सर्व लेखांची प्रसिद्धी कशी व केव्हा व्हावयाची...? मागील आमचा अंक, दोन महिन्यांनीं जेमतेम बाहेर पडला ! त्यात आम्हांला पृष्ठेंहीं वाढवितां आलीं नाहींत. त्यालाच जोड अंक म्हणून वर्गणीदारांची समजूत करून वेळ मारून नेली.'

संपादक बहुतेक नवा लेखक गेला कीं, त्याला हेंच लेक्चर ऐकवीत असत. हेतू हा कीं, त्यांनीं मोबदल्याची कांहीं अपेक्षा करूं नये. कित्येक वेळेला तर, या संपादक महाशयांनीं कमालच केली होती. लेखकाचा उत्साह मावळलेला त्यांनीं पाहिला कीं, त्याला ते उत्तेजन देण्याकरितां म्हणत,

'असें डगमगूं नका. धीर धरा. तुमची लघुकथा आमच्या मासिकांत देतां येणारच नाहीं असें नाहीं. त्यालाही युक्ति आहे. हें तुमचें संपूर्ण नाव मात्र तुम्हांला काढावें लागेल. तुम्हीं एक कोणतें तरी टोपण नाव घ्यावें. आजकाल बंगाली थाटाचें नुसतें नांव असलें कीं, लोक त्या लेखकाला चहातात अन् तसं नांव घेतल्यावर एकादी डिग्री लावून दिली तरी ती खपून जाते. समजा, तुम्हीं बी. ए. ही पदवी घेतलीत; आणि प्रसंग आलाच, तर बिकानेरचा अधिकारी म्हणून खोटया नांवापुढें खोटी पदवी लावली तर त्या पदवीला काय किंमत ? काय, आहे कीं नाहीं युक्ति ?'

लेखक बिचारा होता भोळा. तो हंसला. त्यानें विचार केला,

'प्रत्येक धंद्यांत लबाडी ही असतेच. तशांत आपण कांहीं पदवीधर नाहीं.

पदवीची ही अडचण सर्वत्र हिमालय पर्वतासारखी आड येणार! जर हे संपादक ही गोष्ट या अटीवर प्रसिद्ध करीत असतील तर आपण ' शीतलप्रकाश ' असें नांव धारण करावें; मासिक भारदस्त आहे, संपादक वर्गांत मोठमोठे कलावंत लेखक आहेत. त्यांच्या संसर्गानें आपण हां हां म्हणत प्रसिद्ध होऊन जाऊं. ' त्यानें ती गोष्ट कबूल केली. संपादकानीं त्यांच्या हातानें तें नांव व ती पदवी घालून घेतली व लेखाच्या शेवटीं आपली सही करावयास सांगितली व लेख प्रसिद्धीकरिता ठेवून दिला. गोष्ट प्रसिद्ध झाली.

ती गोष्ट एका प्रसिद्ध सिनेमानटीची होती. ती कलेकरिता त्या व्यवसायांत पडली होती. ती थोरा मोठ्याची होती आणि तिच्याबद्दल विपर्यस्त प्रसंग चित्रित केला होता. वर्तमानपत्रकारानीं तर्ककुतर्क लढवून बरीच मल्लीनाथी केली. कित्येक वर्तमानपत्रकारानीं, सिनेमांत अगर नाटकांत कुलीन स्त्रियानीं अगर कुमारिकांनीं नटींचीं कामें करूं नयेत म्हणून इषारा दिला होता. कुणी वारयोषितांकरितांच हें दालन खुलें ठेवावें अशी स्फुटें लिहीलीं होतीं. हा वाद इतका रंगला कीं, त्यावर अनुकूल प्रतिकूल बऱ्याच चर्चा झाल्या. वर्तमानपत्रकारांनीं मोठमोठे रकाने भरून वर्तमानपत्राचा बराच खप वाढविला—कुणी या विषयाला चालना देणारा मूळ लेखक बी. ए. च नसावा असा संशय व्यक्त करून खुद्द युनीव्हर्सिटीलाच प्रश्न टाकला होता कीं, विश्वविद्यालयाची खोटी पदवी लावल्याबद्दल लेखकावर कायदेशीर इलाज कां करूं नये? केवळ या वादामुळें लेखकाला बरीच प्रसिद्धी मिळाली व त्याचें लिखाण जिथें तिथें प्रसिद्ध झाले. प्रत्येक गोष्टीनंतर अगर लेखानंतर कुठें खळबळ उडाली नाहीं असें क्वचितच झालें! त्यामुळें हा लेखक कोण असावा हें जाणण्याकरितां लोक फारच आतुर व अधीर झाले होते.

काहीं केल्या हा लेखक पुढें येत नाहीं असें पाहून लोकांची निराशा होत होती.

मुंबईत एक मराठी वाङ्मयोत्तेजक मंडळ होतें. तें मंडळ, वर्षांत प्रसिद्ध झालेल्या लघुकथेंतील उत्कृष्ट अशा लघुकथेच्या लेखकास वार्षिक समारंभाच्या वेळीं सुवर्णपदक बक्षीस देत असे. त्या मंडळानें याच लेखकाची गोष्ट पसंत केली व तिला सुवर्णपदक जाहीर केलें!

समारंभाच्या दिवशीं लेखक हजर असूनही पुढें येऊं शकला नाहीं. संपादक

मात्र तिथें हजर होते. त्यांनीं तें पदक त्या लेखकास पोहोंचतें करूं असें आश्वासन दिलें व त्यांनीं तें आपल्या ताब्यांत घेतलें.

लेखक दुसऱ्या दिवशीं कचेरींत गेले. संपादकांनीं त्याचें अभिनंदन केलें. कचेरींत दुसरें कुणीही नव्हतें. लेखक आपलें पदक मागूं लागले.

संपादक म्हणाले,

'हो—जा कीं घेऊन पदक, पण पुढील अंकांत मला तें नांवनिशीवार प्रसिद्ध करावें लागेल.'

लेखक चपापले. ते मनात म्हणाले,

'पदक मिळेल खरें, पण सर्व बिंग बाहेर फुटून फटफजिती होईल त्यापेक्षां, राहिना का तें पदक तसेंच संपादकाकडे पडून. आपले लेख, गोष्टी प्रसिद्ध होऊन आपल्याला प्रसिद्धी मिळते आहे तीच पुष्कळ आहे. त्यांत आपल्या लघुकथेस सुवर्णपदक मिळालें आहे ही गोष्ट कांहीं कमी नाहीं.' नंतर ते उघड म्हणाले,

'तसं असेल तर आपणांला तें पदक नको आहे. तें आपल्या कचेरींत राहिलें तरी हरकत नाहीं!' असें म्हणून ते निघून गेले. त्यानीं आपले लेख 'शीतल प्रकाश' या नांवानींच प्रसिद्ध केले; पण नांवापुढें त्या पदवीचा मात्र उल्लेख केला नाहीं व पुन्हां त्या संपादकाचें तोंडहि पाहिलें नाहीं. त्याची लेखणी प्रभावी होती. त्यांनीं आपल्या लेखणीच्या जोरावर बरीच कुलंगडी चव्हाट्यावर आणलीं होतीं. तो चौफेर आपले लेख प्रसिद्ध करीत होता. एकदा असेंच त्यानें एका लेखातून त्याच्या ऑफीसातील एक अधिकारी, लांच लुचपत खातो असें ध्वनित केल्यामुळें, त्याला आपल्या नोकरीसही मुकावें लागलें! बरेच दिवस त्याला कुठें नोकरी मिळाली नाहीं. लेखन व्यवसायातही त्याच्या कपाळाला एक पैसाही लागत नव्हता! केव्हां केव्हांतर तो फक्त चणे कुरमुरे खाऊन व जुनेच कपडे जागजागीं शिवून व ठिगळीं लावून लेखन व्यवसाय चालवीत होता. मुंबईत पैशाशिवाय एक दिवस काढावयाचा म्हटला म्हणजे किती भयंकर असतें, तें प्रत्यक्ष असली स्थिति अनुभवीत असतील, त्यानांच त्याची कल्पना उत्तम रितीनें करतां येईल. तो या त्या संस्थेंत चिटणिसाचें काम करून जेमतेम आपला उदरनिर्वाह करीत असे. तो गायवाडींत एक नऊ रुपये भाड्याची खोली घेऊन रहात होता. पुढें एक पत्र्याची शेड होती. तींत लहान लहान दहा पंधरा गाळे काढलेले होते. ते गाळे मोटारी ठेवण्याकरितां भाड्यानें दिले जात. सबंध दिवस तिथें मोटरड्रायव्हर्स

व क्लीनर्स यांची वाहतूक असे. प्रत्येकाच्या गाळ्यांत एक आरसा, एक ब्रश व त्यावर एक कंगवा, एखादी तेलाची बाटली इतकी सामुग्री असावयाची.

सकाळीं बहुतेक मोटारी धुण्याचें व त्या साफसूफ करण्याचें काम चाले. त्यामुळें त्या गल्लीला रोज लहानशा नाल्याचें स्वरूप प्राप्त झालेलें दिसे. मधून मधून हॉटेलचीं पोरें सिंगल घेऊन ये जा करीत. पान, तंबाखू, सिग्रेट यांचा तिथें सारखा धुव्वा उडत असे. दोनप्रहरच्या वेळीं, हे बेटे रिकामे असत. त्यांचा वेळ थाटमाट करण्यांत जाई. एक एक ड्रायव्हरचा पोषाख, पाच पाचशें रुपये पगारदाराप्रमाणें असे. हलक्या माणसानीं भलता पोषाख केला कीं, तो तिरस्करणीय दिसतो. दिलावर नांवाचा एक बाटगा मुसलमान, सारा दिवस सिग्रेट तोंडांत घेऊन व पानानें आपलें तोंड बरबटवून, बूट, सॉक्स, अमेरिकन फ्याशनची प्याट, त्यावर लांडा, गिलीटच्या चकचकीत बटणांचा कोट व वांकडी फेज कॅप घालून मोठ्या ऐटींत या पोरीवर, त्या बाईवर छाप पाडीत, इथून तिथें अश्लीलपणें टिंगल करीत मिरवीत राही. हळूहळू तो आपली मोटर गल्लींत उभी करून ठेवूं लागला, व तींत बसून कोणतें तरी वर्तमानपत्र अगर पुस्तक डोळ्यापुढें धरून चाळीच्या कठड्याला रेलून उभी असलेल्या एका तरुणीबरोबर तो गप्पागोष्टी करूं लागला. दोनप्रहरच्या वेळीं शीतलप्रकाश ही मौज आडून पहात असे. ती मुलगी इंग्रजी सहाव्या इयत्तेंत चंदारामजी स्कूलमध्यें जात होती. तिची आई वारल्यामुळें तिनें शाळा सोडली होती. तिचा बारा वर्षांचा भाऊ मात्र, शाळेंत जात होता. बापाला साडेनऊ वाजतां नोकरीवर जावें लागे. तिचा बाप शीतलप्रकाशचा मित्र होता. शेजारी होता. हा प्रकार पाहून त्याची छाती फाटून गेली. असल्या गोष्टी सहसा प्रत्यक्ष पाहिल्या तरी कुणाला बोलतां येत नसतात! दिवसें दिवस त्यांच्या धीटपणाची मजल बरीच वाढत होती. तो खुशाल तासच्या तास तिच्या खोलींत येऊन बसे. तिलाही, त्याच्या समोर बसून शृंगार, वेणी फणी करण्यास संकोच वाटत नव्हता.

एके दिवशीं तर त्यांनीं कमालच केली. त्यांच्या दारांत एक गुलाबाची कुंडी होती. त्यावर एक सुंदर फूल उगवलें होतें. तिनें तें आपल्या कोमल हातानें खुडलें व दिलावरच्या कोटाच्या बटन होलमध्यें धडधडीत ग्यालरींत कुणालाही न भितां अडकवून दिलें व ती त्याला, तें कसें शोभतें हें न्याहाळीत उभी राहिली!

हाच प्रसंग शीतलप्रकाशानें मोठ्या शिताफिनें आपल्या एका लघुकथेंत रंगविला व ज्या साप्ताहिकांत ती गोष्ट प्रसिद्ध झाली तो अंक त्यानें मुलीच्या बापाला दिला. बापानें संसार केला होता. त्याला जगाचा अनुभव होता. तो त्यांतलें रहस्य समजला. त्यानें बारकाईनें चौकशी केली. प्रतिभा ओशाळली व काळी ठिक्कर पडली. वाईट गोष्टीचें समर्थन किती जरी शिताफिनें केलें, तरी त्याची छटा चेहऱ्यावर पडल्याशिवाय रहात नाहीं. ती इतकी बिथरली कीं, त्या लेखकाला आपलें तोंड दाखवीनाशी झाली. तिला त्याचा राग आला. ती गोष्ट तिनें त्या उडाणटप्पू प्रियकरासही कळविली. या प्रसंगानंतरही त्यांच्या गप्पा गोष्टी, खाणाखुणा, नेत्रसंकेत होत असत, पण तें मात्र चोरून व खबरदारी घेऊन केलें जाई.

प्राप्त परिस्थितीतून सुटका कशी करावी याबद्दलच्याही सूचना लेखकानें केल्या होत्या. त्याबरहुकूम मुलीच्या बापानें बिलकूल विलंब न लावतां आपल्या मुलीला तिचें शिक्षण पुढें चालू करण्याकरता पुण्यास हुजूरपागेंत पोंहचती केली व आपण, मुलगी रजेंत येण्यापूर्वी, ती जागा खालीं करून तो उत्तम ब्राह्मण वस्तींत जाऊन राहिला.

प्रतिभा सुंदर होती. तरतरीत होती. तिचा तिथें उत्तम अभ्यास चालला होता. मात्र, हा दिलावरखान झुरत होता. त्याला झालेल्या विरहामुळें त्याच्या हृदयाला जबरदस्त जखम झाली होती. त्याला कशात गोडी वाटत नव्हती. त्याच्या हातातलें सावज निसटलें होतें! शीतलप्रकाश त्याचा कट्टा दुस्मान झाला होता. त्याच्या डोक्यात क्षणोक्षणीं दुष्ट कल्पना येऊन त्याचा चेहरा पालटत असे. त्याचा तो मादक चेहरा व ते बटबटीत डोळे भेसूर दिसत.

दिलावरखान सर्व गोष्टींत पुरा होता. तो गुंडाचा गुंड होता. पक्का मवाली होता तो. आपल्या मित्राजवळ अनेक वेळां त्यानें मिजास मारली होती कीं, 'शादी करूंगा तो ब्रह्मनके लडकीके साथ करूंगा.' अन् हाताबोटाशीं आलेली शिकार तर निसटून गेली होती. तो मोठ्या फिकिरींत होता. महिनेच्या महिने गेले, वर्षें लोटलीं; पण ती गोष्ट काहीं त्याच्या मनांतून जाईना. त्याला चुकल्यासारखें होऊन गेलें होतें.

दिलावरचा एक भाऊ मुंबईच्या गुप्त पोलीस खात्यांत होता. त्याला चांगली बढती हवी होती. एक दोन सट्टयाच्या छाप्यांत त्याला चांगलेंच यश आलें होतें.

त्याचा रँक चढत होती. कायदेभंगाच्या चळवळातहा त्यानें छापे घालून बुलेटी-नच्या जागा शोधून काढल्या होत्या. तो आता क्रांतीकारकांच्या मागें होता. तो जेव्हा तेव्हा भावाला भेटण्यासाठीं ग्यारेजमध्यें येई व त्यानें बजावलेल्या कामगिरीचा पाढा आपल्या भावास मोठ्या शिताफीनें सुनवीत असे. त्याला गिरगांव हद्दीत, कॉम्युनिस्ट लोक क्रांतिकारकांबरोबर संबंध ठेवतात असा फार दिवसापासूनचा शक होता. कारण, तिथेंच जवळपास अधिकाऱ्यास धमकी देणाऱ्या ताबड्या जाहिराती लागल्या होत्या. त्याचा तो संशय पाहून दिलावरखान त्याला म्हणाला, ‘ लेकीन ई तो बात सच है. उधरबी ये चालीमें एक बाबू रहेता है. ओ धोती पेनते और, सफेत पैरन पेनते. ओ लालबावटावोंके साथ, जबरी धादल चलाता है. हमकू लगतें हैं के ओ तो बडा काफीर अदमी होगा ? ’

‘ एसा कुछ होगा तो हमकू बराबर ध्यान रखना चाहिये. ’ आणि त्या दिवसा पासून तो निरनिराळे पोषाख करून तिथें येऊन वारंवार तळ देऊन बसत असे. निरनिराळे लोक त्यानें त्याच्या मागें लावले व त्याच्या बसण्या उठण्याच्या सर्व जागाचा तलास लावून ठेवला. शीतलप्रकाश, परळ भायखळा भागांत आपल्या कॉम्युनीस्ट मित्राकडे जात येत असे, त्यामुळें त्याचा संशय जास्तच बळावला होता. त्याच्या खोलीवर छापा घालून त्याला मोठ्या कटाचा शोध लावल्याची बहादुरी संपादन करावयाची होती. त्यानें या कटात, मोठे मोठे सुशिक्षित लोक असावेत अशी खबर पोलीस खात्यात पसरविली. त्याचे संबंध कलकत्ता, बंगाल, पुणें, दिल्लीपर्यंत पोहोचल्याचा पुरावा त्यांच्याकडे असल्याचे त्यानें जाहीर केलें. या कामी, त्याचीच स्पेशल नेमणूक झाली व तो चौकशी करतां ठिकठिकाणीं फिरत होता. त्यानें क्रांतीकारकांची छापील पत्रकें, त्याच्या सभेचे ठराव, रशियन लिटरेचर, बंगाल-मध्यें जप्त झालेलीं कांहीं पुस्तकें हस्तगत केलीं. त्याला बार उडवावयाचा होता.

शीतलप्रकाश बिचारा एकटा. परिस्थितीनें तो अगदीं गांजून गेला होता. त्याला मायेचें असें कुणीही नव्हते ! तो जगाच्या कल्याणाकरिता अहर्निश झटत होता व तळमळत होता. तो आणि त्याचा व्यवसाय, कुणाच्या अध्यांत नाहीं कीं, मध्यात नाहीं. त्यानें बसून बसून बरेंच लिखाण करून ठेविलें होतें. इतका गांज-लेला तो, पण सदा समाधानी व आनंदी दिसे. गमती व विनोदी होता तो. त्यानें अखिल मनुष्यमात्रास उपयुक्त होईल असें महत्त्वाचें लिखाण करून ठेविलें होतें. तो साधा होता. दिसण्यांत थोडा बावळट दिसे. त्याचे मित्र त्याची

चेष्टा करूं लागले कीं, तो म्हणे ' हंसा बाबानों ! माणसाची. किंमत तो मेल्या-शिवाय कळत नसते ! '

खान मोठ्या जोसांत होता. जवळ जवळ चार साडेचार वर्षे त्यांनीं या कामीं खर्च केलीं होतीं. तीं पत्रें, त्या जाहिराती, तीं पुस्तकें त्याला छापा घालण्यापूर्वी, गुपचुप शीतलप्रकाशाच्या खोलींत ठेवावयाची होतीं. या कामीं त्यानें दिलावरची मदत घेतली. दिलावर हें काम पार पाडण्यास एका पायावर तयार झाला !

शीतलप्रकाशाचा एक गडी होता. तो मोठा विश्वासु होता. त्याची व दिलावरची दोस्ती होती. दिलावरनें या लोकास आंकडे लावावयाला शिकविलें होतें त्यामुळें हे लोक त्याच्या मागें असत. दिलावरचा भाऊ पोलिसांत असल्या-मुळें त्याला हें काम निर्धास्त करता येई !

शीतलप्रकाशाच्या खोलीची किल्ली नेहमीं त्याच्या जवळ असे. त्याच्या जवळ सर्व संपत्ति कायतीं—पुस्तकें ! त्याची खोली उघडी राहिली, तरी त्यानें त्याची कधींच खंत बाळगिली नाहीं, तो घरात नसला तरी गड्यानें त्याचें काम आटोपून जावें अशी त्याला ताकीद होती. दिलावरनें ही कामगिरी त्याच्यावर सोंपविली.

गड्याला तें रुचलें नाहीं; पण तो दिलावरला भीत होता. दिलावरचें हें काम पार पाडलें नाहीं तर त्याची धडगत नाहीं हें तो जाणून होता आणि म्हणून त्यानें हें काम पार पाडण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली.

शीतलप्रकाश, मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या एका सभेला गेला होता. ती वेळ साधून ती सर्व सामुग्री त्याच्या फळीवरल्या पुस्तकांच्या ढिगाऱ्यात त्यानें बेमालूम ठेवून दिली. दिलावरनें लगेच आपल्या भावास खबर दिली. त्यानें सर्च वारंट घेऊन ठेवलेंच होतें !

खाननें एक सशस्त्र युरोपिअन अधिकारी, चार पांच लाठीवाले कॉनस्टेबलस् व दोन ग्रेनेड्स पोलीस आपल्या बरोबर घेतले व शीतलप्रकाशच्या खोलीवर छापा घातला. दुष्कृत्य करायचं म्हणजे असल्या लोकांना रात्रीचीच वेळ अनुकूल असते. शीतलप्रकाश खानावळीचा डबा उघडून जेवत बसला होता. त्यांना पाहून तो एकदम आश्चर्यचकीत झाला व हंसत म्हणाला. ' कां बुवा ! तुम्हीं इथें कां ? '

' आम्हांला तुमच्या खोलीचा सर्च घ्यवयाचा आहे. '

शितलप्रकाश हंसला व बरं आहे म्हणून म्हणाला, व सर्च वारंट आहे का म्हणून चौकशी केली.

पोलिसांनीं सभ्यपणें सर्च वारंट दाखविलें. शीतलप्रकाशनें आपलें जेवण सावकाश उरकलें व त्याची खोली तपासण्याची परवानगी दिली; त्यांनीं सुमारें दोन तास खोली तपासली. त्यांना त्यांत जप्त झालेलीं पुस्तकें, रशियन लिटरेचर व ठिकठिकाणच्या जाहीराती व ठराव सांपडले ! खान विजयी झाला. पोलिसांनीं तें सर्व वाङ्मय व त्या सोबत त्यानीं केलेलें सर्व लिखाण व त्याचे प्रसिद्ध झालेले सर्व लेख, लघुकथा, नाटकें, काव्य आपल्या ताब्यांत घेऊन त्यास नम्रपणें त्यांच्या बरोबर चलण्याची विनंती केली.

शीतलप्रकाशनें दोन मिनिटांत आपली तयारी केली व देवाची प्रार्थना करून तो त्यांच्या बरोबर निघाला.

तो प्रकार पाहून गडी थरथर कांपत होता. त्याला रडूं कोसळलें होतें. त्याची ती स्थिति पाहून शीतलप्रकाशही गहींवरला. चाळींतलीं मुलें “ काका–काका–” करून रडत होतीं. मोटारजवळ लोकांची तमाम गर्दी जमली होती. शीतलप्रकाशनें खिशांत हात घातला व एक रुपया आपल्या गड्याच्या हातावर ठेवला व त्याच्या पाठीवर हात मारून खोलीचा बंदोबस्त नीट ठेवण्यास त्याला सांगितलें. मोटर भरदिशीं निघून गेली.

गडीमात्र त्या दिवसापासून कुठें गेला, तें कुणालाच कळलें नाहीं !

शीतलप्रकाशचा ज्यांच्याशीं संबंध होता अशा आणखी कांहीं पंधरा वीस जणांस त्यांनीं अटक केली व त्यांचे खटले चालू केले. शीतलप्रकाशवर भयंकर स्वरूपाचे आरोप ठेवले व त्यांच्या समर्थनार्थ पोलिसांनीं साक्षी दिल्या.

शीतलप्रकाशतर्फे एक नामांकित वकील काम पहात होते. सरकारनें त्याला खटला चालेपर्यंत जामिनावरही सोडलें नाहीं ! खटला दोन महिने चालला व ठिकठिकाणच्या चौसष्ट जणांच्या साक्षी झाल्या. मुंबईत खटल्यास भलतेंच स्वरूप प्राप्त झालें होतें, त्यामुळें कोर्टांत बेसुमार गर्दी लोटे. खटला संपल्यावर शीतलप्रकाश आपलें स्टेटमेंट देण्याकरितां शांतपणें उभा राहिला होता. त्यानें खटल्यांतील चुका, हप्त्याहप्त्यानें आणलेला पुरावा, क्रांतीकारकाशीं त्याचा जोडलेला बादरायण संबध, जप्त वाङ्मय पोलिसानीं त्याच्या खोलींत टाकण्याची केलेली कारवाई याबद्दल तीव्रतेनें निषेध केला व म्हणाला,

' महाराज, आपला अधिकार थोर आहे. आपण विद्वान आहां. न्यायासन म्हणजे परमेश्वराचें आसन आहे. परमेश्वराच्या शपथा घेऊन प्रत्येकानें साक्ष दिली आहे. आपणांला न्यायदानाचें पवित्र काम करावयाचें आहे. सत्य असत्य पाहून न्याय देण्याकरितां या कोर्ट कचेऱ्या असतात. पण इथे सत्याचा नुसता फार्स केला जातो, नाटक केलें जातें. चोर सुटून संन्याशाला सुळावर जाण्याची पाळी येते. लक्षात घ्या, सत्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. आणि सत्याकरिता मला फासावर चढवला, हालहाल केले आणि तुकडे तुकडे केले तरी त्यातच माझा विजय आहे. शेवटीं, मला इतकीच विनंती करावयाची आहे कीं, माझें लिखाण आक्षिप्त नाहीं अशी कोर्टाची खात्री झाली आहे, तें लिखाण मला माझ्या प्राणाहून प्यार आहे, तरी ते सर्व तसेंच्या तसें माझ्या मित्राच्या हवाली करावें.

न्यायमूर्तींनें शीतलप्रकाशचें म्हणणे शांतपणें ऐकून घेतलें व निकाल देण्याकरिता सरसावून म्हणाले,

' शीतलप्रकाशचें स्टेटमेन्ट म्हणजे तत्त्वज्ञानपरिपूर्ण असें एक व्याख्यानच होतें ! माझ्यापुढे जसा पुरावा येईल तसा निकाल देणें मला भाग आहे. शीतल प्रकाशाचा क्रांतिकारकांशीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध होता अशा बद्दलचा झालेला पुरावा विश्वसनीय नाही; म्हणून त्या आरोपावर मी त्याला दोषमुक्त करीत आहे. तसेंच, त्याचे स्वतःचें वाङ्मय आक्षिप्त नाहीं म्हणून ते तसेच्यातसें आरोपीच्या इच्छेप्रमाणें त्याच्या मित्राच्या हवालीं करावें; पण जप्त झालेल्या वाङ्मयाच्या प्रती त्याच्या जवळ असल्यामुळें मात्र, त्याच्यावर गुन्हा शाबीत झाला आहे म्हणून त्यास पाचशें रुपये दंड व दोन वर्षे सक्त मजुरी व दंड न दिल्यास आणखी सहा महिने अशी शिक्षा देत आहे.'

शिक्षा फर्मावल्यावर कोर्टात शीतलबाबूचा विजय होवो ! म्हणून घोषणा झाली.

हुजुरपागेतून, प्रतिभेनें मॅट्रीकची परिक्षा देऊन फर्ग्यूसन कॉलेजमधून आपली एम्. ए. ची परीक्षा दिली व आपला अभ्यास संपविला होता. परिक्षेकरितां ' जुनें व आधुनिक ललितवाङ्मय व त्यावरील बंगाली व इंग्रजी वाङ्मयाचा परिणाम ' हा विषय निबंधाकरिता घेतला होता. तिनें त्या करिता प्रो. तुळपुळे यानीं सांगितलेलीं सर्व पुस्तकें वाचून काढलीं होतीं. तिचा निबंध सर्वांत उत्कृष्ट ठरला. ती अभ्यास करीत असता, तिनें शीतलप्रकाशचें सर्व वाङ्मय वाचून काढलें

होतें. त्याचा उपयोग तिला अतिशय झाला होता. तिला तें सर्व वाङ्मय प्रसिद्ध करावयाचे होते.

शीतलप्रकाशनें आपल्या प्रभावी लेखणीनें योग्य वेळीं चांगला मार्ग दाखविला होता व तिची अधःपतनांतून वेळींच सुटका केली होती. ती त्याची ऋणी होती. तिचा बाप शीतलप्रकाशचा मित्र होता म्हणूनच त्याचें सर्व लिखाण तिला मिळालें होतें. तिने त्याच्या अत्यंत उपयुक्त अशा असलेल्या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर करून तें लंडनच्या प्रसिद्ध अशा लिटररी एजन्सीकडे, अवलोकनार्थ पाठवून दिलें होतें. तें पुस्तक त्यांना फारच बहारीचें वाटलें व त्यांनीं तिथें छापण्याची परवानगी मागितली. प्रतिभेनें शीतलप्रकाशला ही गोष्ट तुरुंगात पत्रद्वारें कळविली. आपलें लिखाण लंडनच्या लोकांस आवडलेलें पाहून त्याला समाधान झालें. त्यानीं त्यानां त्याचें वाङ्मय तिथें छापण्याची परवानगी दिली. त्याच्या बाकीच्या ग्रंथाची टीप व प्रती तिनें रवाना केल्या. तें सर्व वाङ्मय त्या लोकानीं नोबेल कमिटीपुढें ठेवलें.

शीतलप्रकाश साबरमती जेलमध्यें होते. त्यांना तिथें पुस्तकें वाचण्याकरिता व लिहिण्याकरितां सात दिवस अन्नत्याग करून सत्याग्रह करावा लागला होता. नंतर तिथें त्यांनीं बंगालीचा अभ्यास केला. व बरेंच लिखाण केलें. त्यांचा संबंध क्रांतिकारकाशीं असल्यामुळें, त्याना तुरुंगांत बरेच हाल भोगावे लागले. त्यांना मिठाची गंजी, दंडाबेडी, सॉलीटरी कनफाईनमेंट व गनीक्लाथ या सर्व शिक्षा कोणत्याना कोणत्या कारणावरून भोगाव्या लागल्या ! ते परमेश्वरावर भिस्त ठेऊन शांतपणें आपली शिक्षा भोगीत होते.

त्याचा रोज एकशें आठ नमस्कार घालण्याचा क्रम बरेच दिवस चालू होता. पण एक वर्षानंतर त्याना छातीचा विकार जडला व त्यामुळें ते आजारी झाले. त्यांची शिक्षा जेव्हां संपत आली, तेव्हां तर, त्यांचे दोन्हीं लंग्ज निकामी झाले होते व ते बिछान्याला खिळून राहिले होते.

नोबेलकमिटीनें त्यांचें पुस्तक मान्य करून त्याना ‘ नोबेल प्राइझ् ’ जाहीर केलें होतें.

हिंदुस्थानच्या लोकांना त्याची किंमत तेव्हां समजून आली ! ठिकठिकाणच्या वाङ्मयसंस्था त्यांचे जाहीर आभार मानण्याकरितां व त्याचा सन्मान करण्या-

करितां तयारी करीत होत्या ! ते त्यांच्या सुटकेच्या आदल्या दिवशीं साबरमतीस रवाना झाले होते. प्रतिभेचे वडील व प्रतिभा त्यांचें वाङ्मय छापवून तें त्यांना अर्पण करण्याकरितां साबरमतीस हार तुरे घेऊन आली होती. थंडी कडाक्याची पडली होती. शीतलप्रकाशांची प्रकृति त्याच रात्रीं बिघडली व त्याचें एकाएकीं हार्ट फेल झालें !

* * * *

उजेडतांच त्यांचा गौरव करण्याकरितां हार तुरे घेऊन तुरुंगाच्या दारांत सर्व वाङ्मयप्रेमी लोक हजर झाले होते; पण त्यांचा गौरव करण्याऐवजीं, त्यानीं ते सर्व हार मोठ्या गंभीरपणें, अश्रू ढाळीत त्याच्या शवाला अर्पण केले ! हाच तो महिना आणि ज्या दिवशीं हा हिरा हरपला—तो दिवस !!!



# अव्हेर

तिला मनोहरबरोबर लग्न करावयाचें होतें; पण तिचा त्यानेंच अव्हेर केला होता. तिचा तो हेतू त्याला कळला नव्हता असें नाहीं. चांगला कळला होता. त्यावेळीं, त्याचे वय म्हणाल तर, लग्नाला अयोग्य नव्हतें ! त्याच्या बरोबरिच्या कांहीं मुलाचीं लग्नें होऊन ते संसाराचा भला बुरा अनुभव घेत होते. त्यांना संसारांत पडलेलं पाहून त्यालाही पुष्कळ वेळां वाटे कीं, आपणही लग्न करून त्यांच्या मालिकेत जाऊन, शिष्टपणा संपादून घ्यावा.

तो नुकताच इंटर झाला होता. परिक्षेंत जरी तो पहिला आला नव्हता तरी, त्याचा फर्स्टक्लास कांहीं सुटला नव्हता ! त्याला, त्याच्या विद्वत्तेची, हुषारीची घमेंड होती. त्याची तडफ दांडगी होती. त्याची महत्त्वाकांक्षा, त्याला स्वस्थ बसूं देत नव्हती.

सर्व कांहीं त्याच्या इच्छेप्रमाणें पार पडेल, अशीच त्याची बालंबाल खात्री होती. त्याच्या दर्जाच्या बहुतेक विद्यार्थ्यांचें लक्ष विलायतेंत धांव घेत असतें; त्यांना हिंदुस्थानात नांव काढण्यासारखे कांहीं असतें, असें दिसतच नसतें ! त्याची गोष्ट कांहींशी तशीच झाली होती. एखादा अमली पदार्थ सेवन केला म्हणजे, जसा कैफ चढतो तसा तो—आपण विलायतेस जाणार, याच समजुतीनें धुंद झाला होता.

त्याचे वडील थोडे जुन्या वळणाचे होते, त्यांना त्यानें विलायतेला जावें असें वाटत नव्हते. ते म्हणत, ' त्यानें आपली नोकरी करावी, लग्न करावें आणि एक-दांचें चार चौघाप्रमाणें आपले संसारात पडावें, ' आणि या त्यांच्या म्हणण्याचें समर्थन करण्याकरितां ते आपलेंच उदाहरण पुढें करीत. ते म्हणत,

' मी कुठें तुझ्या इतका शिकलों होतों; पण आम्हीं त्यावेळचे लोक—बी. ए. आणि एम्. ए. झालेल्यांना बसवतों कीं नाहीं जागेवर ? हॉवर्डची तीन तीन चार चार बुकें केलेलीं माणसें; पण महिना तीनशें, चारशें रुपये मोजीत होतीं ! इतकंच नव्हे, तर त्यांपैकीं, कांहीं न्यायाधीशाच्या जागेपर्यंतही चढले होते ! ते अशीं जजमेन्टस् लिहायचे, कीं यंव—नाहीं तर आत्तांचे तुम्हीं, सांगितला एकादा अर्ज करायला, तर बसता डोकीं खाजवीत. तुमचा नाहीं कांहीं तो दोष; तो हल्लींच्या शिक्षणाचा ! आत्ताचें शिक्षणच तसें कुचकामीं झालंय्. नोकरीला लागण्याइतकें आतां नाहीं का झालें तुझें शिक्षण ? लागलास एकाद्या ऑफिसात, तर कांहीं हरकत का आहे ? तितकीच होईल मला मदत. शिवाय लग्न उरकून घेतलंस आणि देवाची कृपा झाली, तर होतील दोन मुलं बाळं आणि लागशील माझ्या डोळ्या देखत संसाराला ! आता आम्हीं काय ? पिकलीं पानें; केव्हा गळून जाऊं त्याचा का कांहीं नियम आहे ? माझं मुळीं ऐकायचं नाही. म्हणे, मीं विलायतला जातों. कशाला जातों विलायतेला ? तिथें जाऊन चैन करायला पाहिजे तुम्हा पोरांना दुसरें काय ? '

त्यांच्या म्हणण्यांतही तथ्यांश होता, पण त्यालाही दुसरें कारण होतें. त्यांना पै पै केलेला आपला पैसा, जवळचा सोडावयाचा नव्हता ! हें त्यांच्या प्रकृतीचें निदान, तो डाक्टर नसूनहि त्यानें अचूक केलें होतें !

त्याचे वडील भोळे होते. त्यांना खुलवायची युक्ती त्याला ठाऊक होती. फक्त त्यांच्या पुढें जरा नमतें घेतलें कीं, त्याचें भागे. त्यानें अगदीं सावकाश व लडीवाळपणें म्हटलें,

' लग्न मला नकोका आहे ! करायचं, पण तें मी आतांच करूं लागलों; तर लग्नाच्या बाजारात मला आज काय किंमत येईल ? पण तोच विलायतेला गेलों; चांगला आय. सी. एस. झालों—तर झाडून सारे श्रीमंत, एकावर एक-बीड वाढवीत मागें लागतील कीं नाहीं आपल्या ? बरें—तें असो. विलायतेला जायचें कीं नाहीं, तें आपण बी.ए. झाल्यावर ठरवूं. तोंपर्यंत तर, आपणाला लग्न कर्तव्य नाहीं. मग देणार ना मला बी. ए. होऊं ! '

वडिलाची कळी खुलली. त्याचें म्हणणें त्यांना पटलें. त्यांनीं त्याला मूक संमति दिली. त्याचा शिक्षणक्रम पुढें चालू झाला. कॉलेज उघडल्यावर तो कॉलेजांत जाऊं लागला.

कॉलेजांत पुष्कळ विद्यार्थीविद्यार्थिनी होत्या. त्यांतील विद्यार्थ्यांची तोंड ओळख होऊन परिचय वाढला होता; पण तो विद्यार्थिनींना फक्त ओळखीत होता. त्यांच्या-पैकीं एक दोघींशीं प्रत्यक्ष बोलाचाली होण्यास बराच अवधी लागला.

कॉलेजांत आल्यावर मुलींच्या बाकाशेजारीं, म्हणजे पुढें जागा मिळविण्याच्या बाबतींत जे काही विद्यार्थी धडपडत असतात त्यात एक याची स्वारी होती. अर्थात् याची जागा पुढें होती. एके दिवशीं शनिवारीं, तो व त्याचा मित्र सुरेश क्लासात होते. त्याच्या समोरचें बांक खालीं झालें होतें; पण त्या बांकावर एक फाऊंटन पेन फक्त होतें. याचें लक्ष त्या पेनाकडे गेलें. त्यानें तें उचललें. तें पेन नक्की कुणाचें होतें, हें त्याला माहीत नव्हतें. तें कुणातरी विद्यार्थिनींचें असावें एवढीच त्याला खात्री होती. म्हणून त्यानीं तें उचललें व त्याचा मित्र सुरेश यास दाखविलें.

सुरेश म्हणाला, ‘ पेन उंची आहे. आपण क्लार्ककडे देवूं. ’

‘ नाहीं. आपण बोर्डावर नोटीस लावूं. ’ त्याप्रमाणें, त्याच पेननें त्यानीं बोर्डावर नोटीस लावण्याची व्यवस्था केली. पुढें कोणत्या तरी सणानिमित्त कॉलेज चार दिवस बंद होतें. त्याला मिळालेली ठेव त्यानें खिशांत ठेवली. ते एकमेकाची थट्टा करीत व त्या पेनावर निरनिराळीं भाष्यें करीत जात होते.

कॉलेज उघडल्यावर, आपल्याजवळ असलेली अमूल्य ठेव, आपणाला अंतरणार म्हणून त्याचा जीव पाण्याबाहेर काढलेल्या माशाप्रमाणें तडफडत होता. व एक पक्षी, त्याच्या मनात आनंदोर्मी उसळून गुदगुदल्या होत होत्या. तो कॉलेजात गेल्यावर त्याच्या समोरच बसणारी मुलगी त्याची वाट पहात होती. ती लगबगीने उठली व किंचित् हास्य करीत त्याच्याजवळ आली व म्हणाली,

‘ पेन माझं आहे. आपण ठेवलंत म्हणून ठीक झालें. मी तुमची फार फार आभारी आहे. ’

‘ ओ ! इज इट यूअर्स ? आय ह्याव यूझड् इट. प्लीज एक्सक्यूज. ’ अस्सं. तें तुमचें आहे काय ? माफ करा हं मी वापरलें आहे )

‘ इज इट ? नेव्हर माईंड बट लेखणी पुस्तकम् ( अस्सं का ? हरकत नाहीं पण लेखणी पुस्तकम् ! )...”

इतकेंच ती सहज म्हणून गेली खरी; पण श्लोकाचा पुढील अर्थ ध्यानांत

येऊन ती चपापली ! त्यावेळीं तिच्या तोंडावर लज्जायुक्त हास्य चमकत होतें. त्याच्याही डोक्यांत एकदम प्रकाश पडला. तो म्हणाला.

'इट इज हिअर. इट हज इन् टॅक्ट.' ( इथें आहे. व्यवस्थीत आहे ) तिनें तें घेतलें व तीं दोघें ऑफीसमध्यें जाऊन, त्यांनीं बोर्डावरची नोटीस काढविली. त्या दिवसापासून त्यांची ओळख झाली.

× × ×

सुरेश कॉलेजांत येऊन चढून वर ग्यालरींत येतो तोंच, मनोहर एका मुलीबरोबर बोलत व हंसत आपल्या क्लासकडे जात असलेला त्याला दिसला. क्लासमध्यें मनोहर आपल्या जागेवर बसतो तेवढयांत सुरेशनें त्याच्या पाठीवर थाप मारली व त्याच्या कानात म्हटलें.

'आहे बुवा—मारलेंस खरें !—'

'काय ?'

'इंप्रेशन—' ( छाप )

मनोहर हंसला व म्हणाला. 'तें पेन यांचें होतें.'

सुरेशनें खालच्या मानेनें त्या मुलीकडे बघितलें व म्हटलें,

'यस्. यस्. आय अंडरस्टुड एव्हरी थिंग.' ( हो–हो–मला समजलें सगळें )

मनोहर देखणा असून स्कॉलर्सपैकीं असल्यामुळें, जो तो त्याच्या मागें असे. सुलभाची त्याची ओळख झाली असल्यामुळें, रोज त्यांच्या गोष्टी होत. मनोहरचे निबंध वगैरे सुलभा मुद्दाम मागून घेई. त्याचप्रमाणें इतर पुस्तकेंहि त्याच्याकडून मागितलीं जात. ते रोज टेनीस कोर्टवर खेळण्यास हजर रहात. मनोहर, सुरेश व सुलभा आता एकमेक चागल्याच परिचयाचे झाले होते.

वर्गातील मुलें आपापसांत कुजबुजत. त्यानीं त्यांच्या परस्परांबद्दल कंड्याही पिकाविल्या होत्या. सुलभेजवळ कुणी चौकशी करितांच, मनोहर माझा कझन् ब्रदर ( चुलतभाऊ ) आहे, असें सांगून ती मोकळी होई; पण विद्यार्थ्यांना तें म्हणणें पटत नसे. ते म्हणत 'सर्वच स्त्री विद्यार्थिनींचे कझन् ब्रदर्स ( चुलतभाऊ ) एकाच कॉलेजात कसे असतात ? आमचा एकसुद्धां कझन् ब्रदर–नव्हे–सख्खा ब्रदरसुद्धां कॉलेजांत भेटत नाहीं तो !'

पुढें सुट्टी सुरू होतांच कुठेंतरी ट्रीप काढावी असें त्यांच्यात घाटत होतें. साधारण एका दिवसांत ट्रीप होईल असें ठिकाण त्यांना हवें होतें. मुंबईच्या

लगतचीं ठिकाणें म्हटलीं म्हणजे वज्रेश्वरी, घारापुरी, जोगेश्वेरी, बोरिवली यांपैकीं कुठें तरी त्यांचा जाण्याचा बेत ठरला होता. सुटी पडतांच त्यांनीं काण्हेरीचीं लेणीं पाह्यला जाण्याचें नक्की केलें.

× × × ×

मुलगे मोठे होताच जशा मुलाच्या घरीं वडील माणसांच्या लग्नाच्या वाटाघाटी चालतात तशाच मुलींच्या घरींही चालत असतात. ते जसे निरनिराळ्या स्थळांच्या चर्चा करतात तशा मुलीही परिचयांत आलेल्या मुलाबद्दल, प्रेमाचे संबंध जोडण्यास उत्सुक दिसतात. पण संबंध जोडूं म्हणून जोडले जात नसतात, हें त्याना ठाऊक नसते. वडिलानीं जमविलेलीं लग्नें त्यांना आवडत नाहींत. वडील तीं त्याच्या बोकांडी मारण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळें शिकलेल्या कित्येक मुली अविवाहित राहतात !

ठरल्याप्रमाणें मंडळी सकाळीं पहिल्या गाडीनें चर्नीरोडवर चढली व पुढें रवाना झाली. गाडींत एकमेकांच्या थट्टा चालल्या होत्या. गाडींतील दुसऱ्या माणसांकडे त्याचें लक्ष नव्हतें. ते आपले आपल्याच गोष्टींत व रंगांत दंग झाले होते ! गाडींतील माणसें मात्र, त्याच्याकडे निरखून पहात होतीं !

सुरेशनें फक्त गरम पॅंट व शर्टच घातला होता. त्यानें जरी डोकीवर केंस राखले होते तरी, भांग वगैरे पाडला नव्हता. मनोहरनें मात्र, अगदीं तंतोतंत साहेबी ड्रेस करून स्नो, ब्रिलियंनटाइन, पावडर वगैरेचा भरपूर उपयोग केला होता. सुलभा रोजच्या प्रमाणेंच थाटांत होती. ती गुलाबी पातळ नेसली होती. तिचा जंपर गुलाबीच होता. सुप्रभातकाळीं तिचा तो पोषाख सुंदर दिसत होता. तिनें आपले केस सैल बांधले होते. त्यामुळें तिचे कान झांकून गेले होते. हातात रिष्टवॉच असून एक एक सोन्याची बारीक नक्षीबाज बागडी होती. गळ्यात फक्त लॉकेट असलेला बारीक साखळीचा छडा होता. कानांत हिऱ्याच्या कुड्या मात्र सारख्या चमचम करीत होत्या. तिच्या बरोबर एक जाभळें पातळ नेसलेली तिची मैत्रीण होती. तिनें तिचा शेपटा मोकळा सोडला होता. तिच्या हातात फक्त एक एक काचेची बांगडी होती. गळ्यांत काहींही नव्हते. तिचें नांव निरूपमा होतें. त्यांच्याबरोबर निरूपमेचा भाऊ होता. त्याच्या खांद्यावर एक क्यामेरा लटकत होता. मंडळी गप्पा गोष्टी करीत बोरिवलीस उतरली.

झाडी दाट होती. मंद पण थंड वारा सुटला होता. पांखरांचा किलबिलाट चालला होता. डोंगरापर्यंत जाण्याची वाट उत्तम होती, पण जयंत आपल्या

स्काऊटच्या थाटात पाना पाचोळ्यातून चालत होता. पाचोळा दंव पडून भिजल्यामुळें त्यांतून सळ सळ आवाज निघत नव्हता. तें जंगल त्यावेळीं भयाण भासत होतें. वाटेंत, त्यांना एक मोठा ओहोळ लागला; त्यांतील पाणी आटत आल्यामुळें त्यांना कोरडी वाट मिळाली होती. मात्र थोड्या अंतरावर बरेंच पाणी होतें. तेथे ते उभे राहिले. त्याना एक सुसर पाण्याच्या बाहेर येऊन पडलेली दिसली. ते पुढें डोंगर चढूं लागले. डोंगराची चढण बरीच बिकट होती. क्षणोक्षणीं पाय घसरून तीस चाळीस फूट खालीं पडण्याची प्रत्येकास भीति वाटत होती.

मनोहर दुसऱ्याना नीट चढा, म्हणून इषारा देत होता. इतक्यांत त्याचाच पाय घसरला. सुदैवानें लगतच्या झुडपाचा आधार त्याला मिळाला. हा आधार मिळाला नसता तर, त्याची ट्रीप त्याना चागलीच भोंवली असती. ते सुरक्षीत वर पोहोंचले. प्रथम त्यांनीं सर्व कुंडें, गुंफा व स्तूप पाहून घेतले व नंतर एक स्वच्छ अशी उत्तम निवात गुंफा पाहून तेथें, त्या दिवसापुरता तळ दिला. तो दहाचा सुमार होता. त्यानीं आपली सामुग्री काढली व पाणी आणण्याकरितां सुरेश भांडें घेऊन जाऊं लागला. मनोहर त्याच्या मागें गेला. त्याच्या मुक्कामासमोरच स्वच्छ पाण्याचें कुंड होतें. त्या कुंडातून पाणी घेणार, इतक्यात त्याचा पाय घसरून तो आंत गेला. कुंड खोल नव्हतें. त्याला इजा झाली नाहीं. फक्त त्याची प्याट भिजली. दोघांसही शिक्षा मिळालेली पाहून त्याच्या मैत्रिणी दांत काढीत हंसत होत्या, सुरेशला जिन्नस बाधून आणलेली चादर गुंडाळून दिवस घालवावा लागला !

त्याना भूक लागली होती. त्यानीं क्रॉनिकलचे कागद पसरले व आणलेले पदार्थ त्यावर सोडून ठेवले.

सर्व जणांचा फराळ सुरू झाला.

सुरेशनें, सुलभेनें आणलेल्या बटाटेवड्यांवर हात घातला आणि हळूच म्हटलें,

‘ कुणी केल्या ह्या वडया ? ’

‘ इतकी कशाला हवी चौकशी आपणाला ? ’

‘ गोड नाहींत का लागत चौकशी केल्याशिवाय ? ’ सुलभा म्हणाली.

‘ तिखटच आहेत त्या—गोड कशा लागणार ? ’ सुरेशनें उत्तर दिलें. अशी एकमेकाची थट्टा करीत व हंसत खिदळत त्यांनीं आपला फराळ आटोपला.

× × × ×

फराळ झाल्यानंतर गप्पांस सुरवात झाली. त्यांच्या निरनिराळ्या विषयांवर गप्पा झाल्या. पहिल्यानें त्यानीं वाङ्मयावर टीका केली. नंतर सुलभेनें मनोहर बी. ए. झाल्यावर काय करणार असा मोठा महत्त्वाचा प्रश्न केला.

'आमची चौकशीशी इतकी अगत्यानें करतां!'

'आपण कुठें इथें रहाणार आहों.—आपण विलायतचा मार्ग सुधारणार.' तो ऐटींत म्हणाला.

'माझा फर्स्टक्लास कांहीं जावयाचा नाहीं. बी. ए. ची परिक्षा होताच विलायतला अर्ज करायचा. माझं वय आय. सी. एस. ला जाण्यास योग्य आहे.'

'ओऽहोऽ!—आय. सी. एस. झाल्यावर ओळखणार का आम्हांला?... पण तें राहूं द्या—कां? तुम्ही विलायतला का जातां? इथें नाहीं का, कांहीं शिकता येणार?...'

'इथें काय आहे?'

'काहीं नाहीं? तर मग, आपली स्वारी-लग्न जमवून जाणार, का-करून जाणार?'

'छे—छे—च—च. तो विचारच नाहीं तूर्त काहीं करायचा—तो!'

'म्हणजे?—मग करायचा असं ना?'

'बायकांना लग्नाशिवाय दुसरें काय दिसणार?'

'अहाहा! पुरुषांना जशी लग्न करायचीच नसतात!'

'कशाला करता उडवा उडवी! आहे ठाऊक; आता लग्न जमवलं किंवा केलं तर-हुंडा बेताचाच मिळेल—अस्संच ना?' मनोहर जरा चरकला, इतक्यांत सुलभेनें त्याच्यावर हल्ला चढविला.

'काय पण मेली पुरुषाची जातच मतलबी!'

खरें तें बाहेर निघाल्यामुळें मनोहर चिडला; पण त्यानें तें हंसण्यावारीं नेलें व मद्राशासारखी चादर गुंडाळून बसलेल्या सुरेशला उद्देशून विचारलें,

'कारे बुवा! सुरेश, तुझा काय बेत? ठरव एकदां-आजची वेळ चांगली आहे आपण इथें लग्न ठरवायला आलों आहोंत. होऊन जाऊं द्या एकदाचीं लग्नें!'

बाजू आपल्यावर उलटते आहे असें पाहून सुलभा ओशाळली खरी; पण उसनी ऐट आणून हल्ला परतविण्याच्या उद्देशानें म्हणाली,

'इश्श!—कोण बसलाय लग्न जमवायला?'

'मनोहर !–आम्हीं काहीं नाहीं आलो लग्न जमवायला हं !'

'मग–तुला कां राग आला ! आम्ही कुठें तुझें नाव घेतलें ? चोराच्या मनांत चांदणें !'

'राहूं दे–मनोहर–राहूं दे !–असली भाषा नको.'

सुरेश त्यांचा संवाद लक्ष देऊन ऐकत होता. त्याला मनोहरच्या तुसडेपणाचा व तुटकपणाचा राग आला होता. पण तो भिडस्त होता. त्याला कांहीं बोलतां येत नव्हतें. वाद जास्त वाढूं नये म्हणून तो म्हणाला,

'काय झाले विचारलें तिनें म्हणून ?'

'मी सांगतो हं–मी काय करणार पुढें ते.'

'ऐका !'

'मी ना !'—

'अद्याप—काहीच ठरवलें नाहीं.'

सर्वजण खो खो हंसले. त्यानीं आपली नजर बाजूला फिरविली.

'सुरेश तसा दाद नाहीं लागूं द्यायचा. बी. एस. सी. झाल्यावर लावील लग्न—आणि करील काहीं उद्योग एखाद्या लॅबोरेटरींत.'

मनोहरला तिच्याच तंगड्या तिच्याच गळ्यांत अडकवायच्या होत्या. तो म्हणाला,

'तूं काय ठरवलें आहेस तें—सांग ना ! दुसऱ्याची कशाला नसती विचारपूस करतेस !'

निरुपमा म्हणाली,

'घे–आतां. चागलं झालं ! आलं अंगलट ? मी म्हटलं–हा विषयच नको इथं; पण तुझं तोंड राहील गप्प तेव्हाना ?...'

'काय झालं ग–त्यात. हो–हो मी ठरवलं. मी लग्न करणार.'

'कोणा बरोबर ?'

'जो करील त्याच्या बरोबर. मी कांहीं कुणा करतां थांबणार नाहीं.' शब्द सहज निघून गेले; पण त्यांतील सूचकता सुरेशनें तेव्हांच ओळखली ! मनोहर विलायतेला जाण्याच्या विचारात गढून गेला होता.

'अखेर बेत बदलणार !' सुरेशने आश्चर्य प्रगट केलें !

'कसला–रे बेत ? कुणी केला होता बेत.'

'आम्हांला काय ठाऊक ? आम्हीं आपलें जें ऐकतों तें सांगतों.'

'तुम्हीं ना ?—ऐकतां ढीग !'

'लग्न जुन्या पद्धतीनें करा—कीं नव्या पद्धतीनें करा—पहातातच ना दहा पांच स्थळें ! कुणाचें टिपणच जमत नसतें तर कुणाला वधूच पसंत नसते. कुणी मुलगी फार शिकली आहे म्हणूनच नाकारतो, तर कुणी हुंडयाचाच प्रश्न घेऊन अडेलतट्टू होऊन बसतो. लग्न आम्ही जमवूं म्हटलें तरी, काहीं कमी अडचणी नाहींत ? कुणाला वडिलांच्या विरुद्ध जातां येत नाहीं, तर कुणी नसतेंच खूळ डोक्यात घेतो. एकूण, आमचं कुमारिकाचं—हें अस्संच !'

गप्पा होतां होता वेळ केव्हा निघून गेला हें त्याना कळलंही नाहीं. घड्याळांत चार वाजून गेले होते. मंडळी आवराआवर करूं लागली.

मनोहर, सुलभा व निरुपमा यानीं तोंडें धुतलीं व आपआपले टॉयलेट केले. सुरेशनें काहीं केलें नाहीं. त्याने फक्त आपली कॉलर घातली व टाय बाधली.

जयंत यांच्या गप्पांत नव्हता ! तो आपला कॅमेरा घेऊन निरनिराळया देखाव्यांचा फोटो घेत होता.

मंडळी डोंगर पठारावर गेली. तेथें जयंतानें सर्वांचे निरनिराळया पोझीसमध्यें फोटो काढून घेतले.

गुहा पाहायला आलेली मंडळी आश्चर्यानें त्याची मौज पहात होती. जयंत कमी चावट नव्हता. त्यानें कॅमेरा त्या लोकाकडे उगीचच रोंखला. बिचारी मंडळी नीटनेटकी उभी राहिलेली पाहून त्यानें उगीचच कॅमेऱ्याची दोरी ओढली !

मनोहर, सुरेश, सुलभा व निरूपमा वरून लाब दिसणाऱ्या तुळशी तलावाचा देखावा न्याहाळीत होती. त्यांना साडे पाच वाजतां तेथून निघायचें होतें. मुंबईकडे जाणारी मंडळी उतरूं लागली होती. त्यांच्या मागोमाग ही मंडळी उतरली. हा रस्ता बिलकूल अवघड नव्हता. अशा रीतीनें मौज मजा करीत मंडळी आपल्या घरीं गेली.

* * * *

सुलभा निराश झाली—

तिला चैन पडत नव्हतें. तिची परीक्षा आटोपल्यावर ती वडिलांकडे गेली. तिला मनोहरच्या त्या वर्तनाचा राग आला होता; पण तिचा त्याच्यावरचा लोभ कांहीं कमी झाला नव्हता. तो विलायतेला जाईल याची तिला खात्री होती. तिचे

वडील परीक्षा होताच लग्न लावणार होते. त्यानीं तिच्याकरतां स्थळ पाहिलें नव्हतें. ते मुलीच्या मर्जीविरुद्ध जाणार नव्हते. ते गव्हर्मेंट हॉस्पिटलमध्यें डॉक्टर होते. त्यांच्या नोकरीची मुदत संपत आली होती. त्याना एवढीच एक मुलगी होती. मुलीकडे त्यानीं आपली इच्छा प्रगट केली. तिला मोठें कोडें पडलें. मनोहरचा प्रश्न निकालात निघाला होता. सुरेशचा मनोदय तिला कळला नव्हता. तिनें सुरेशला पत्र लिहिलें व त्याला वडिलाकडे बोलावून घेतलें.

सुरेश स्वतंत्र होता. त्याच्या डोकीवर वडीलधारें कुणी नव्हतें. त्याला आपलें सरळ संसारांत पडावयाचें होतें. सुलभेनें वडिलांची ओळख करून दिली. तो चार दिवस तेथेंच राहिला. डॉक्टरानीं त्याची संमती घेऊन लग्न ठरविलें. लवक-रच रिझल्ट लागले. पहिला बी. एस. सी. चा लागला.

सुरेश फर्स्ट क्लासात आला.

मनोहर व सुलभा याचे रिझल्ट मागून लागले. मनोहरनेंही तसाच क्लास घेतला होता. सुलभा पण पास झाली.

मनोहर विलायतला जाण्याची तयारी करीत होता. त्यानें निरनिराळ्या संस्थेंतून स्कॉलरशिपा मिळविल्या.

सुलभेचें आणि सुरेशचें ठरल्याप्रमाणे लग्न झाले !

डॉक्टरसाहेब फर्लो रजा घेऊन मुंबईस आले. त्यानीं हिंदू कॉलनींत एक ब्लॉक भाड्यानें घेतला. मुंबईस त्यांची व मनोहरची ओळख झाली.

मनोहरचे वडील, गावी कोणत्या तरी निमित्तानें, वार्धक्यामुळें कालवश झाले. मनोहरला कॉलेजांतून मंजूरी मिळाली नाहीं. पुढील वर्षी, त्याच्या वयाची मुदत संपत होती ! मनोहरची फसगत झाली. तो सैरभैर झाला !

आता त्याला विलायतेला जाणे शक्य नव्हतें ! हिंदुस्थानांतच काहीं जमल्यास उच्च शिक्षण घेण्याचा त्याचा विचार ठरला. त्याचा गणित विषय उत्तम होता. त्यानें एक्चुअरीचा अभ्यास करण्याचे ठरविलें. त्याला इथें मुंबईस राहून अभ्यास करायचा होता. तो, सुरेश व सुलभा याच्या इथेंच राहिला !

सुरेश शांत, गंभीर व भिडस्त स्वभावाचा होता.

सुलभा हौशी होती.

सुरेश उच्च शिक्षणाकरिता लायक होता म्हणून सुलभेच्या वडीलांनी त्याला डी..

एस. सी. होण्याकरितां विलायतेला पाठविलें. तो विलायतेला गेला. तिथें त्यानें डी. एस. सी. ची परिक्षा दिली व तो परत आला. नंतर लौकरच त्याची गव्हरमेंट ॲनालिस्ट म्हणून मोठ्या पगारावर नेमणूक झाली.

सुलभेमुळे त्याला सुस्थिति प्राप्त झाली.

मनोहरही ॲक्चुअरीची परीक्षा पास झाला. चागला पैसा कमावूं लागला; पण तारुण्यांत, सुलभे सारखें रत्न अव्हेरिल्यामुळें, त्याला पश्चात्ताप मात्र होत होता. तो म्हणत असे,

' मनुष्य कितीही बुद्धिवान असला तरी, त्याला परिस्थितीच्या विरुद्ध जातां येत नाहीं—हेच खरें ! '

× × ×



# वात्सल्य

"सहन करायचं म्हटलं, तरी मनुष्य किती सहन करणार? त्याला तरी कांहीं सीमा असतेच. माझ्या वागण्यात लोकाना असं काय दिसत होतं कुणाला ठाऊक ! ते आपले छळ छळ छळायचे मला. मी म्हणजे एक विषयच झाला होता सर्वांना ! अशी मी करीत तरी होत्यें काय ? मला वाटे, देवा ! नको हा स्त्री जन्म. आजच्या काळांत, अन् तें सुद्धां मुंबईसारख्या शहरांत, जरा मेलं कुणा-बरोबर बोललं, जरा मोकळेपणानीं वागलं कीं, लागले कुजबुजायला सारे ! पुरुष राहतात का मोकळेपणानीं वागायचे ? नाहींना ? मग आमचाच कां घेतात ते सशय !

पुरुषांच्या व्यवहारांत बायका कधीं करतात का लुडबुड ? मग हे कशाला करतात आमची उठाठेव ? आम्ही कांहीं करा, लोक लागलेच आमच्या पाठी. पहा ! मी जों जों याना भीत होत्यें तों तों ते अधिकच भिववीत मला ! डोकं ठिकाणावर नव्हतें अगदीं ! परिस्थिति बिकट व अवघड झाली होती.

मी म्हणजे काय चौदा वर्षांची पोर होत्यें ? मला काहींच का कळत नव्हतें ! माझं मला बरं वाईट कळण्याइतकं माझं वय नव्हतं ? मी काय, संसाराचा बरा वाईट अनुभव घेतला नव्हता ? सहासात मुलांची आई–मी, माझ्या पुढे वाढ-लेल्या मुलाबरोबर वागण्याची मला चोरी ! काय,—काय सांगावं, लोकांच्या या क्षूद्र विचारसरणीला ? किती कुत्सित विचार हे ? पुरुष म्हणजे काय समजतात आपणाला ? बायकांना कांही अक्कलच नाहीं ? त्याना स्वतंत्र वृत्तीच नाहीं ? त्याना आपली जबाबदारी कांहीं कळूंच नये ? काय, आम्हीं मुकीं जनावरं आहोंत ? अन् अकलेचा गड्डा काय तो पुरुषानाच दिला आहे ? आहे तरी काय हें गौडबंगाल ?

एखादी भोळी भाबडी बाई दिसली कीं, उडल्याच तिच्या चिंधड्या ! कसा बाई काढावा यांचा छळ तरी ! पुरुष हजार उलाढाली करतात, फसतात, त्याची करतो का कुणी खंत ? आम्हीं म्हणजे काय, कोण्या झाडाचा पाला ! म्हणावं, नाहीं. आम्हीं तितक्याच आहों खंबीर ! आम्हाला बुद्धी आहे, विचार आहे सर्व कांही आहे. आम्हाला आमचं, हितानहीत कळतं. आम्ही फसलों तर, आमचें आम्हीं पाहून घेऊं, नुकसान सोसूं, पण आमच्या कारभारात ढवळाढवळ करायला दुसरं कुणी नको आहे.

मी धैर्य धरलं, अन् कुणाची म्हणून पर्वा करावयाची नाहीं असं ठरवलं !

सोलापूरची मी. माझा बाप गरीब–त्याच्या पदरीं सगळ्या मुलीच ! दुर्दैवी तो ! सगळ्यानांच कुठून आणील हुंडा ! अशी काय त्याची मिळकत लागून राहिली होती ? बरं, आम्ही तरी चागल्या ठिकाणीं पडायला, स्वरूपराण्या होतो थोड्याच ? होतों आपल्या साधारण प्रतीच्याच ! अर्थात् आम्हाला ठिकाणं मिळालीं तीं हीं साधारणच ! माझ्या बहिणींची हकीकत मी कशाला सांगूं ? माझीच कथा ऐकीवली कीं पुरे !

मी लग्नाची झाल्यें, वडील स्थळं पाहून पाहून जिकीरीस आले. वर्षांपाठीं वर्षे निघून गेलीं. ज्यास्ती शिकायचं म्हटलं तरी, त्या काळीं कुणी जास्त शिकतही नव्हतं अन् जास्त शिकवायला वडिलाना ऐपतही नव्हती. शाळा मास्तर ते ! कुठून आणणार पैसा ? पैसा नसला म्हणजे कोणतीं कामं होतात सुलभ ? आ वासून संकटाचे अभेद्य तट दिसायला लागतात चोहोंकडे ! गरिबानाच कळायचं याचं मर्म. श्रीमंताना त्याचं काय होय ? त्याची आपली नित्य दिपवाळीच ! ते मोसुंबी, चैन म्हणून खातील तर, आमच्या तोंडाला आजारी झाल्यावरही लागायची नाहींत तीं !

गोपाळराव दिक्षीत आमच्या शेजारचे, माझ्या वडिलांचे दोस्त. त्यांना माझ्या वडिलानीं एक पत्र माझ्यासाठीं कुठे स्थळ पहाण्याकरतां लिहिलं ! त्याचा एक होता नातलग, त्याचा होता मुलगा. त्याचं नांव सुंदरराव. नुकताच तारुण्याचा बहर आला होता त्याला. अगदीं प्रथम वर, ठिकाण उत्तम वाटलं. कारण, माझे वडील बिजवर तिजवरही शोधीत होते माझ्यासाठीं, अन् तशात अंगारूपानेंही ते चागले होते. दुधात साखरच पडलीन काय. पण एक होती गोम त्यात; ती नव्हती कळली कुणाला ! त्याना संगत वाईट होती. आईबापाचे

तर ते ऐकत नसत व स्वैरपणें वागत. पांचवी सहावी होते न होते तोंच इतीश्री झाली होती अभ्यासाची त्यांच्या !

त्यांच्या बापाचं किराणा मालाचं होतं दुकान. यांचे चालले होते धंदे तिसरेच. जसं पळपुटं वासरूं असलं कीं, त्याच्या गळ्यात अडकावतात लोढणं, तसं लग्न करून स्वारीच्या गळ्यात लग्न लावून देऊन लोढणं अडकावयाच होतं. बाप त्या खटपटीत होता. माहितींतला मनुष्य मुलगी द्यायला काहीं तयार नव्हता त्याला म्हणून, हुंडयाचा प्रश्न आपोआपच निघाला होता निकालात !

माझ्या नशीबानें खैर केली. माझी माळ त्याच्या गळ्यांत पडली ! ज्याला, एकदा शेण खायची संवय लागली, त्याचें तुम्हीं लग्न करून द्या कीं, आणखी काही करून द्या, त्याचा स्वभाव काहीं जाणार आहे थोडाच ? लग्न केल्यामुळें कदाचित् त्यांना गृहस्थपणा प्राप्त झाल्याचा फायदा झाला असेल तितकाच ! त्याना चैनीशिवाय काहीं दिसतच नसे. लग्नातच त्यानीं, ब्रिलियनटाईन स्नो, पावडर, सेंटस्, मनीबॅग वगैरे जिन्नस दागिन्याच्या करंडयात ठेवले होते ! पांच वारी जॉर्जेटचीं पातळें नेसायला हवीं होतीं स्वारीला ! खेडयातली मी—मला कुठली आली संवय या गोष्टींची ? मी त्या जिनसा तशाच ठेवल्या काहीं दिवस: तितक्या वरूनच रागावली होती स्वारी. त्यांना पाहिजे होता–मुंबईकराचा थाट ! मी होत्ये साधी. मी म्हटले,

कठीणच आहे काम. कसं जमायचं हें ! दिवसांतून हजार वेळां व्हायचे टॉयलेटस् अन् ड्रेस व्हायचे तीन. वडील अब्रूसाठीं चालू देत त्याचे थेर. मला संसार करायचा होता. मीच पटवून घ्यायची तरी, खटके उडायचे व राग, रुसवे व्हायचे ते व्हायचेच ! माझ्यावर काहीं लक्ष नव्हतें त्यांचें ! म्हणतात, ‘लग्न म्हणजे बिडी’ बरोबर आहे. अक्षरशः खरं आहे. बिड्या कैद्याला घालतात; पण बायकाना–त्या अक्षयच्याच बसतात ! कैद्याला, कुठं असतं तुरुंगांत स्वत्व ? तो आपला जेलरच्या करड्या नजरेंत ! तुरुंगात कुठं नाहीं चालत सर्व व्यवहार सुरळित ? कोण करतात ते व्यवहार ? कैदीच ना ? तितकेच सुरळित चालतात आमचे संसार ! पण अंदरकी बात, शेंकडा पंचाणव स्त्रिया, नवऱ्याच्या लहरीवर वागणाऱ्या ! कुठली आली आहे त्याना स्वतंत्रता ? सांगा कीं मग, त्यांचा तो संसार होतो, का संसाराची होळी होते ती ? बाप मुलीचं दान देतो आणि दान घेणारा नरपशू—तिला गुलाम बनवतो ! आमची स्त्री, बापाच्या इस्टेटीची वारस

नसते. ती नवऱ्याची फक्त, दासी असते दासी. कुटुंबांत अन्नवस्त्राशिवाय तिला कोणता हक्क असतो ? अहोरे—कल्पना ! अहोरे—स्त्री ! अहोरे ! कायदा !

स्त्रीनें नवऱ्याशिवाय कुणालाही प्रेमळपणा दाखवता कामा नये. नवऱ्याचें प्रेम नसले तरी, त्याच्यावर तिनें प्रेम केलें पाहिजे. तो कसाही वागला तरी, त्याच्या मात्र हुकमतींत वागलं पाहिजे तिनं. मग स्त्रिया कशाला करतात लग्न ? मुलींनों ! कुमारिकानों ! तुम्हाला मी बजाऊन सागतें प्राण गेला तरी लग्न करूं नका ! पुरुषांच्या गुलाम बनूं नका. त्याच्या जोडीदार व्हा.

मीं बटीक होत्यें. नोकराला काही मान असेल; पण मला मान नव्हता. मला किंमत नव्हती. कुणाबरोबर बोलण्याची प्राज्ञा नव्हती मला. कुठं जाणं नव्हतं, येणं नव्हतं. गोषापद्धती असती, तरी बरं झालं असतं ! आमचा संसार चागला चाललेला दिसत होता लोकाना ! पण रोज टिपं पडत होतीं टिपं माझ्या डोळ्यातून. तशीच रडत पडत, एकापाठी एक मुलं ही झाली मला. गुणी आहे माझी सून म्हणून प्रशस्तिपत्रही घेतलं होतं मी माझ्या सासऱ्याकडून ! तो सर्व काहीं जाणत होता. हळहळत होता; पण तो—काय करणार होता ? चिरंजीवांना ताळ्यावर आणण्याकरिता, मुडदा पाडला होता माझा ! कमाल होती माझ्या सहनशीलतेची. पण माझं हृदय जळत होतं सारखं ! आम्हाला मुलंबाळं झालीं, त्यांचे सोहाळे झाले म्हणजे, फिटतात आमच्या डोळ्याची पारणीं ! सुखासाठी लग्न ना ? मला होतंका सुख ? परमेश्वर हातीं लागेल; पण हिंदू स्त्रीला–सुख लाभणार नाही !

वयस्क होता माझा सासरा. सज्जन होता तो. साधी होती रहाणी त्याची. धंद्यांत चागला जम बसला होता त्याचा. महायुद्ध चालू होतं, तेव्हां शेअर्सचा धंदा करीत होते बरेच लोक. सुंदररावही करीत होते हा धंदा. पैसा कांहीं थोडा नाहीं मिळाला त्याना ! चैन चालली होती त्याची. चौपाटीवर रहात होतों आम्ही एका बंगल्यात. गुजराती होते त्याचे मित्र; गुजरात्याच्या नादाला लागूं नकोस म्हणून सारखे सांगत मामंजी, पण स्वारी ऐकेल तेव्हां ना ? मोठा हट्टी स्वभाव ! सिनेमा कंपन्या निघत होत्या इकडे त्याचवेळीं. यांनींही एक भागिदारींत काढली कंपनी. चांगली चालली कंपनी चार पाच वर्षे अन् मग झाले घोटाळे ! अफरातफरी, खोटे चेक, खोटया सह्या, वगैरे प्रकरणें होऊन पोलिसांतून पकडवॉरंटें सुटलीं स्वारीवर ! वारंटाची बातमी लागतांच, कलकत्त्याला जातों म्हणून स्वारी कुठें गेली, त्याचा आम्हालाच काय; पण पोलिसानाही पत्ता लागला नाहीं !

बाप काळजी काळजीनें खचला व पक्षघाताच्या आजारानें कालवश झाला. सात आठ मुलेंबाळं व सर्व संसार माझ्या एकटीवर पडला ! दुकान बंद करावं तर, तें चांगलं चाललेलं, अन् तो तर आमचा आधार मग करावं काय ? हा पडला प्रश्न. तसंच चालवावं दुकान अशी केली हिंमत अन् स्वतःच बघूं लागल्यें देखरेख मी ! कर्मधर्मसंयोगानें दुकानांत, एक लहानपणापासून वहि-वाटलेला होता मुलगा, त्याचं नाव खवणेकर. मोठा सज्जन, वर मान नाहीं करायचा कधीं. त्याला चागली माहिती होती व्यापाराची. मुंबईचं दुकान तें ! व्यापही मोठा, तशीच देवघेव, उधारी पाधारी !

माझा मोठा मुलगा होता सज्ञान; पण त्याचं चाललं होतं कॉलेजात शिक्षण. तो काहीं या व्यवहारांत लक्ष घालीत नसे. खवणेकर मात्र, बिलकूल त्रास पडूं देत नसे मला. दुकानाचें सामानसुमान सर्व व्यवहार उत्तम तऱ्हेनें पहात होता तो. लोक टपून होते आमची फजिती पाहायला. आमचं चांगलं खुपत होतं त्यांच्या डोळ्यांत. त्यानीं आमची नालस्ती करायला सुरवात केली.

मला पाचहजारांचे होतें कर्ज, तें कसें फिटेल याची होती काळजी. सासरा मेल्या दिवसापासून सावकारानीं झिजवला होता माझा उंबरठा ! मला लाज वाटत होती त्याची. माझी अडचण पाहून खवणेकरानीं कुठून तरी, पाच हजार रुपये आणलेन् व माझ्या हवालीं केले. कर्जाची मी फेड केली. इतकी मोठी रक्कम अगदीं थोड्या अवधींत मी कशी फेडली याचीच पंचाईत पडली लोकाना ! ते चौकशी करूं लागले. त्यांना खवणेकरानीं आणून दिले, अशी बातमी लागली. तेवढेंच त्यांना मिळालं ! त्यांत आणखी एक भर पडली. ती ही कीं, नवरा पळून गेल्यामुळं, मी कांहीं दिवस दागिने घालीत नव्हतें; ते आतां घालूं लागलें होत्यें. आमचा परिचय लोकाच्या दृष्टिला विकृत भासला ! आमचे सर्व व्यवहार गुप्त होते ते लोकांना उघड होत नसल्यामुळे, ते तळमळत होते. आजच्या—ना धंदा —ना नोकरी या काळांत, लोकाना प्रेमाशिवाय दुसरें काय दिसणार ? एकदोन वर्षांच्या वयाच्या अंतराचा माझा मुलगा माझ्या शेजारीं बसला तर, त्यांत कुणाला कांहींच वावगं वाटत नसे; पण तोच खवणेकर बसलेला पहाताच, त्यांच्या अंगाची लाही लाही होई ! ती का ?

तो आमच्या घरांत राही. तो आजारी झाला तर त्याची काळजी मी नाहीं घ्यायची तर कुणी घ्यायची ? हा झाला व्यवहार पण स्त्रीस्वभाव ! जात्याच

कसा दयाळू, किती गोड, मर्यादशीर असतो—हें या अक्कलशून्य लोकाना काय ठाऊक ? तो एक पोरका मुलगा होता, आमच्याकडे शिकला होता, वाढला होता. लोक बेशरमपणाने वाटेल तशी टीका करीत होते.

नातेवाईक सारखे त्याला काढून टाक—कशाला ठेवला आहेस त्याला, म्हणून पाठी लागले होते. मी म्हटलें,

तो तुम्हाला काय करतो असला तर, तुमचं काय जातं त्यात ? त्याचं वर्तन काय वावगं आहे थोडंच ? मला त्याचा प्रसंगी केवढा उपयोग झालेला ! मी त्याची ऋणाईत, त्याला मी काय म्हणून दुखवूं ! त्यांनीं माझ्यासाठीं किती खस्ता खाल्लया होत्या. त्यांनीं माझा, माझ्या मुलाबाळाचा आजार कसा काढला होता हें कुणास मी सांगितलें नव्हतें. आमच्या व्यवहाराची दाद लागूं दिली नव्हती कुणाला म्हणून, माझे नातेवाईक तर्ककुतर्क करीत होते !

अखेर काहींच वळत नाहीं, तेव्हा लोकानीं खोटीच कंडी उठविली कीं, त्याला मी नोकरीवरून काढून टाकणार आहें. ही बातमी त्याच्या धनकोस कळली. त्याला खरं वाटलं त्यानं पैशाची मागणी केली.

तो घाबरून गेला. त्याची फजिती व्हायची वेळ आली ही गोष्ट त्यानं माझ्या कानावर घातली. मी म्हटलं,

घाबरूं नकोस ! दागिने आहेत कीं माझे, मी माझे दागिने विकवले, रक्कम फेडली व त्याला मोकळा केला. दागिने काढल्याची बातमी लोकांना समजली. त्यानें दागिने चोरले व मला फसवली म्हणून एकच ओरड केली ! खरं कुणाला काहींच कळत नव्हतं ! पण मला समजत होतं त्यांना काय नडत होतं ते ! त्याना त्याची जात नडत होती जात. लोकानीं त्याच्या अंगी नसते दोष लावले व त्याची अब्रू वेशीवर टांगण्याचा सपाटा लावला !

माझ्या मुलाना, लोक त्याच्यामुळें उघड उघड लाजवीत. त्यांचा बाप कर्ज-बाजारी होऊन व लोकांना बुडवून पळून गेला हें एक लांच्छन त्यांना चुकविता येत नसे, त्यांत, ही आणखी भर पडली होती. गरीब तीं ! तीं शरमिंधी होऊन जात व एकटीच रडत. माझीं मुलं, कुणीं हायस्कूलात तर कुणीं प्रायमरी स्कूलांत जात होती.

मी जशी माझ्या मुलांना टाकून कांहीं खात नसे तशीच एखादी वस्तू, या मुलानीं खाल्याशिवाय तो जिन्नस मला गोड लागत नसे ! त्याच्या कपड्या-लत्त्यापासूनची काळजी मी घेत असे. त्याचं शरीर चागलं होतं. उंची

चागली होती; त्यामुळें तो कमी वयाचा असून देखील, दिसण्यात मोठा दिसे. आमच्या कामाची दगदग फार पडे त्याला. मला त्याची दया येई. मी त्याला माझ्या मुलांप्रमाणें वागवी ! फावल्या वेळीं, जशी मी माझ्या मुलांना घेऊन फिरायला जाई, तशीच त्याच्याबरोबरही केव्हां केव्हां हँगींग गार्डन, चर्नीरोड गार्डन, मरीन ड्राईव्ह, अपोलो बंदर येथें फिरायला जात असूं. ओळखीचे लोक, आमच्याकडे रोखून पाहात ! आम्हीं मॉंजिनी ब्रदर्सकडे वगैरे चहा घेत असूं. आमचं रहाणं सुधारकी होतं.

तो सुटाबुटांत असे. त्याला इंग्रजी उत्तम येई. आमच्या व्यवहारात जातीचा प्रश्न कधींच आड आला नाही. इतकंच नव्हे तर, माझ्या लहान मुलानाही तो भेद ठाऊक नव्हता ! आमचं दुकान भरभराटींत होतं. या अपवादामुळं, ओळखीची काहीं गिऱ्हाईकी आम्हाला सोडून गेली; पण आम्ही त्याला भीक घातली नाहीं !

दहा बारा वर्षांनीं एके दिवशीं, आमच्या दारांत सकाळींच सामानानें भरलेली एक मोटर उभी राहिली ! मोठ्या रुबाबात व साहेबी थाटांत तींतून एक गृहस्थ उतरले !

मी बाहेरच उभी होत्यें. माझ्या जी गोष्ट कधीं स्वप्नींही नव्हती, ती अचानक घडली होती ! मी स्वप्नात आहे कीं काय, असा भास मला होत होता ! त्यानीं मला ओळखली व हास्य केले. मीही हसल्यें. ते सुंदरराव होते ! ते गोव्याहून आले होते.

आम्ही हाल अपेष्टा काढल्या; पण ते आपले होते चैनींत. ज्याच्या नशिबीं चैन असतें त्याना ते कुठेंहि गेले तरी पंचाईत पडत नाहीं. ते गोव्यात पळून गेले होते. तिथें दुसऱ्या नावानें त्यानीं काजीचा धंदा केला होता. मुबलक पैसा मिळाला होता तिथं त्याना.

खवणेकराना पहातांच, त्यानीं त्याची चौकशी केली.

मी सर्व हकीकत सागितली. त्यानीं घरात चोहोंकडे नजर टाकली. आमचा इतमाम किंचितही कमी झाला नव्हता ! त्याना त्यामुळें कांहीं तरी वेगळंच वाटलं !

थोडे दिवस ते आमच्यात राहिले. पुढें लोकाची टीका त्याच्या कानावर गेली. ते साशंक झाले ! त्यानीं आपणच होऊन एका गोवेंकरणीच्या सानिध्यात आपली वेगळी व्यवस्था केली !

× × × ×

लोक तर्ककुतर्क काढून हंसत होते, टीका करीत होते; पण मला त्यांना उत्तर मात्र देतां येत नव्हतं ! ”

# बदनामी की बेईमानी ?

**गो**ष्ट शहरातली नाहीं. म्हणजे, शहरात अशा गोष्टी घडत नाहींत असं बिलकूल नाहीं. कदाचित् शहरांत, याच अगर याहून भयंकर गोष्टी अधिक प्रमाणांत जास्त सफाईनें होत असतील !

आमचा गाव म्हणजे शहरापासून फारसा कांहीं लाब नाहीं. जवळच आहे तो. तेथील पाढरपेशे मूठभर लोक सोडून दिले तर, बहुतेक लोक काबाडकष्ट करणारे म्हणजे, मोलमजुरी करणारे. पारू, अशीच लहान कुणब्याची मुलगी. कुणब्यांच्या मुलींना जरा समजूं लागलें कीं, त्या त्याच्या आईबापाबरोबर कामं करायला लागतात. त्याचीं कामं म्हणजे, कुठें मुलंच साभाळ, शेणच गोळा कर, लाकूड फाटीच जमव अशी असावयाचीं. पारू, ही सर्व कामं करीत होती. बिचारे लोक ! त्याना सारडा कायदा अस्तित्वांत आहे, याची जाणीव सुद्धा नव्हती ! खुशाल जे बापदादापासून चालत आलें आहे, तसेंच पुढें चालवायचे, एवढें समजून बालपणींच मुलाचीं लग्नें लावून देत. पारू वाढून वाढून दहा वर्षांची झाली. त्या लोकाच्या मतें, लग्नाचें तिचें वय होऊन गेलें होतें ! आईबाप लग्न जुळवायच्या काळजींत होते.

मुलगा पाह्यचा म्हणजे पाढरपेशांना जी पंचाईत पडते तसली अडचण बरीक, या लोकांना पडत नाहीं. मुलगा शरिरानें चांगला धडधाकट असला म्हणजे जमतें त्याचें लग्न. आम्हाला एक लग्न जमवायचें म्हणजे—कोण पिडा !

मुलगा—बी. ए. पाहिजे. हुंडा पाहिजे, गोरा पाहिजे, मग तो फुंकेनें उडून जाईल असा काडीपेहलवान असला तरी पसंत—ही गोष्ट वेगळी !

पारूच्या आईबापांनीं घारूचा मुलगा पाहिला आणि दिलें ठोकून तिचें लग्न ! तो चवदा वर्षांचा होता. त्याची सुद्धा अशींच शेतीवाडीचीं चालत कामं. वास्त-

विक, हिशेब पाढरपेशी चष्म्यांतून पाहिला तर, हे वय शिकायचं नाहीं का ? पण शिकण्याकडे का त्याचें लक्ष असतें ? आणि क्वचित् एखाद्याचें असलेंच तर शाळा पाहिजे ना असायला जवळपास ?

ठक्याचें लग्न त्याच्या बापाने कर्ज काढून केलें होतें. तें कर्ज फिटत नव्हतें, इतकेंच नव्हे तर, त्यास व्याजही देता येत नव्हते त्याचें ! सावकाराचा लागला होता तगादा.

सावकार कोर्टात गेला. घरादारावर नांगर फिरायची वेळ आली आणि पेजपाणीही तोंडातून निघालें तेव्हां त्यानीं सावकाराला सांगितलें,

'बाबा, करज काय मला देता येत नाय. थापा मारून दिस ढकलायचे बेस (चागलं) नाय. तवा मी इचार केलाय माझ्या ठक्याला घरकामाला घेऊन मुंबईस जा आणि टाका एकदाचा मोकळा करून मला.' सावकारांनीं विचार केला.

'पैसे काहीं मिळत नाहींत. ठेवावा मुलाला घरकामाला आणि घ्यावे फेडून आपले पैसे.' तो म्हणाला,

'ठीक; पण नोकरनामा घ्यावा लागेल करून, नाहीं तर, तुमचे लोक ! नाहीं रहात कामावर म्हटलं तर, घ्या काय तुमचं ! शिवाय, तूं म्हणशील बोलावीन माझ्या पोराला या सणाला त्या सणाला—तें काहीं जमायचें नाहीं, असलं पसंत तर बोल ?'

हो ना करतां करता तो कबूल झाला व ठक्या मुंबईला घरकामाला आला.

दोन वर्षात त्याला एक दिवसाची पण रजा मिळाली नव्हती ! तो आईबापांना, त्याच्या बायकोला भेटायला आतूर झाला होता. मुंबईचा खुराक चागलाच मानवला होता त्याला. त्यानें दोन दिवसांची रजा घेतली, आणि तो गांवीं आला.

बायकोला चौदावें वर्ष होतें. ती वयात आली होती. ती रोज शेतावर सासूसासऱ्याला जेवण घेऊन जाई. तिथें पोरात खेळे. बाजूला धेड (चाभार) लोकाचीं होतीं घरें. तिथें ठक्याच्याच वयाचा एक होता पोरगा. त्याचें नाव रूपा. ती रूपाबरोबर हिंडे. बकऱ्या चरायला घेऊन जाई. गाधीच्या चळवळीनें, शिवा शिवीचा बाधा काहीं राहिला नव्हता ! आणि पोरं ती ! त्यांना काय समजतं ? तीं आपलीं पोरात जायचीं ! पारूच्या शेजारच्या बाया जनी आणि काशी अशाच भाकरी घेऊन जायच्या त्याच्या नवऱ्याना शेतावर. त्या हे त्यांचे चाळे रोज बघत. त्याना ते चमत्कारिक वाटे. त्यानीं तिला बजावलें.

' इस काय—गो हे ? सांगतों तुझ्या सासूला न सासऱ्याला सांजचा हां. '

ती गोष्ट तिनें हंसण्यावारी नेली व ती मुद्दाम त्याच्यापाशीं जास्त लगट करूं लागली !

पारूला दिवस गेले !

गावांत कुजबूज सुरू झाली. पारूनें जनी आणि काशीचा संशय धरला, व ती त्याना हात चोळून शिव्या देऊं लागली. मुळची ती तशी नव्हती. पण परिस्थितीनें ती अगदीं चिडखोर बनली होती. तिचें तोंड म्हणजे नुसती ' मुलूख मैदान तोफ ' असें वाटूं लागलें होतें ! धेड्या बरोबर तिचा संबंध झाला आहे, अशी कंडी जातींत पसरली. जातीच्या हिताच्या दृष्टीनें—ती गोष्ट अनिष्ट ठरली. त्यांतील प्रमुख मंडळींनीं चौकशी केली.

ती त्याच्यावर तुटून पडली व त्यांना पहातांच म्हणाली,

' धंदे नायत तुम्हाला ? काय लाज बीज हाय का नाय ? ऐकतास काय त्या मेल्या जनीचं न काशीचं. आये—आये ! माजा जकला (सगळा) घात करायला लावलाय, माजा काय नवरा नाय? आला होता तें ठावं नाय याना ? त्यांचे काय डोळे फुटलवते ?' ही गोष्ट काशीच्या व जनीच्याही घरीं कळली. त्यांच्या घरीं भांडणे सुरू झाली. नवऱ्यानीं त्याना चोपून काढलें ! पांढरपेशा लोकात, हा प्रकार जरी, चमत्कारिक असला तरी, खालच्या लोकांत बायकांना मार खाणें, खाण्या इतकेंच अंग वळणीं पडलेलें असतें !

जनी, काशी व जातीचे लोक चिडले होते. ते तिच्या पाठीमागें लागले. त्यानीं जात बोलावली व तिला जाती बाहेर टाकलें,

जातीला भिऊन पारूला, सासू सासऱ्यानीं घराबाहेर हांकून लावली !

रुपाला ही गोष्ट कळली. त्याला वाईट वाटलें, पण तो काय करणार होता ! कुणबी लोक, त्यालाच मारायला टपले होते. त्याला पोलिसातून संरक्षण मागण्या पलीकडे गत्यंतरच नव्हतें.

पारूला गावांत कुणी थारा देत नव्हता. ती मोलमजुरी करून दिवस काढीत होती. प्रसंग मोठा बिकट येऊन ठेपला. ती नवऱ्याला भेटली व असहाय्यतेनें म्हणाली,

' माजे हाल काय लावल्यात हे. रडत हाकून काढली मला. आईबाप पन जातीला घाबरून थारा देत नायत; कुणी मोलमजुरीवर ठेवीत नायत; तूं ठेवशील

मला तर, लेकाचं तोंड तरी गप होयल. बायमाणूस मी—काय करूं ? डोक फिरल्यावानी ( सारखं ) झालंय रे—बाबा !' व डोक्यावर हात मारून घेऊं लागली.

ठक्यानें विचार केला व म्हणाला. ' खरं हाय, पन लोक काय बोलतात ? ते मला नायका जातींतून बाहेर टाकतील ? तूं का लागलीस घेड्याच्या मगारी ( मागें ) ? आथं ( आतां ) जा त्याच्याकडेच. मी तुला ठेवली तर बामण ठेवील काय नोकरीवर मला ? काय बी कर, मला नको सांगू—मला तोंड नको दावूं.'

पारूचा नाइलाज झाला. ती कायद्याचा आधार घेण्याकरिता वकीलाकडे गेली. वकीलानीं कांहीं आधार पाहून अब्रूनुकसानाची फिर्याद द्यावी असा सल्ला दिला.

प्रथम त्यांनीं त्या दोन बाया व जातीच्या पुढाऱ्यांना नोटिसा दिल्या. ' नोटिसा मालक घेत नाहीं सबब परत ' अशा शेऱ्यानीं परत आल्या होत्या. आता पारूला कोर्टात जाण्यापलीकडे गत्यंतर नव्हतें.

जनी, काशी व जातीचे पुढारी नाना चंद्रू व हिरा बंडू याना आरोपी करून तिनें फिर्याद दाखल केली. त्याना रीतसर समन्सीस लागून खटला उभा राहिला.

प्रथम दिवशीं, आरोपीतर्फेच्या वकीलानीं खटला समजून घेण्याकरिता मुदत मागून घेतली. पुढच्या तारखेस जुनाच खटला चालल्यामुळें हा खटला तहकूब झाला. अशा रीतीनें ह्या नाहीं त्या कारणानीं खटला बराच लांबला. पारूचा जीव कोर्टाचे हेलपाटे घालून व खर्चापायीं मेटाकुटीस आला.

पारूच्या वकीलानीं केस लाबल्यामुळे, त्याच्या अशीलाचे बरेच हाल होत आहेत तरी, पुढें खटला तहकूब करू नये म्हणून हरकत घेतली. कोर्टानें केस आपसात काढून टाका अशी इच्छा प्रदर्शीत केली; पण फिर्यादी तसें करण्यास कबूल नव्हती म्हणून खटल्याचें काम सुरू करण्यांत आलें.

सर्व आरोपींस पुकारण्यात आलें व सुरवात केली.

' माझी अशील, पारूबाई, हिचा बालपणीच म्हणजे ती सारडा कायदा अस्तित्वांत असूनही अज्ञान असतांच विवाह झाला आहे. सदरहू बाई चांगल्या घराण्यातली असून विनयशील आहे.'

वकीलाचें असें भाषण चालू असतां, आरोपीचा वकील मध्येंच उपरोधिक शेरे मारून कोर्टाच्या कामात अडथळे उत्पन्न करीत असल्याचें कोर्टाच्या नजरेस आलें. त्यानीं तें पाहून तसें न करण्याची ताकीद दिली. फिर्यादीचा वकील,

# अनुक्रमणिका

लेखकाचें प्रसिद्ध होणारें आगामी पुस्तक

चित्तवेधक, विचार प्रवर्तक, व संपूर्ण वास्तववादी

# पवित्र प्रेम

( स्वतंत्र व सामाजिक कादंबरी )

गरीब अभ्यासू हुशार विद्यार्थी विद्यार्थिनीच्या प्रेमाचा विषय झालेला पण, धाकामुळें प्रेमास मुकलेला नंतर नोकरींत सुस्थिति प्राप्त होऊन बाणेदारपणानें, शुद्ध आचरण ठेऊन नांव काढलेला, धीट, धाडशी, त्यागी, उदात्त विचाराचा विवाहीत तरुण आणि सुधारकी घराण्यातली, सोंवळया घराण्यात विवाहबद्ध झालेली विधवा. समाजाकडून छळलेली व अचूक गुंडाच्या नादीं लागलेली अशी, अनेक संकटें सोसणारी, कारस्थानी, धीर गंभीर वृत्तीची, गोड स्वभावाची हौशी तरुणी यांची नाविन्यपूर्ण, टीकात्मक, सुंदर, रहस्यमय, रोमांचकारी प्रसंगानेंयुक्त, वाचकांचें कुतुहल वाढविणारी व मनुष्यस्वभावाचें यथार्थ चित्रण करणारी नवलपूर्ण प्रेमकथा आकर्षक स्वरूपांत लवकरच प्रसिद्ध होईल.

लेखक

द. वि. कीर्तने

आपल्या कामांत तरबेज असल्यामुळें, त्याकडे मुळींच लक्ष न देतां, आपली फिर्याद बिनधोक कोणताही अडथळा न जुमानतां अस्खलीतपणें समजून देत होता.

' हिचा नवरा मुंबईस घरकामावर असतो. तो तिला मधून मधून येऊन भेटत असे. ती सध्यां गरोदर स्थितींत आहे. जनी आणि काशी या दोन बायांनीं अदावातीनें व खोडसाळपणानें तिची बदनामी करण्याच्या हेतूनें, माझ्या अशी-लाचा संबंध रूपा नांवाच्या धेडाबरोबर जोडला आहे. त्याचा परिणाम, जातीच्या मंडळींनीं सभा भरून तिला जातीबाहेर टाकली. तिला त्यामुळें घराला, जातीला व अन्नूला मुकावें लागलें. ती निराधार होऊन बिकट परिस्थितींत दिवस काढीत आहे. तिला गांवात रहाणेंदेखील कठीण झालें आहे तरी, कोर्टानें सर्व आरोपींवर गुन्हा ठेऊन खटला चालू करावा.'

कोर्टानें चारीही आरोपींवर गुन्हा ठेवला व तो त्याना समजून दिला.

गुन्हा त्यांनीं नाकबूल केल्यामुळें फिर्यादीतर्फे साक्षीदारांस बोलावण्यांत आले.

पहिला साक्षीदार रूपा धेडा यास बोलाविलें व तो साक्षीदाराच्या पिंजऱ्यात उभा राहिला. त्याला नांव वगैरे विचारून रीतसर शपथ देण्यात आली.

' तूं पारूबाईस ओळखतोस का ? ' वकिलानें प्रश्न केला.

' हो '

' किती वर्षें ओळखतोस ? '

' वरस बिरस मला काय समजतनाय; पन तिला लहानपनपासून वळखतोय.'

' बरं, हिचं लग्न झालं आहे कारे ? '

' हो—हायत काय बिजं ( दुसरं ). '

' हिच्या नवऱ्याला तूं ओळखतोस का ? '

' केव ( कसा ) नाय वळखत; गांवचाच हाय तो. '

' तो कुठें असतो तें सागशील का ? '

' मुंबईस असतो. '

' त्याला इथें आलेला तूं केव्हां पाहिला होतास ? '

' दोन वखत आला होता बिजा '

' पहिला केव्हां आला होता '

' ते काय ध्यानांत ठेवलंय मी ? '

' पण तो आला होता—तेव्हां कोणतीं कामं चालली होतीं शेताचीं ? '

‘ आगोठ ठेपली होती तवां न राब झालते शेताचे ’

‘ दुसऱ्यांदा आला होता तेव्हां, कोणतें काम चाललें होतें ? ’

‘ आवजा ( लावण्या ) झाल्या होत्या, तवां होता एकदा तो चार दीस. ’

‘ हिचा तुझा कांहीं संबंध होता ही गोष्ट खरी आहे का ? ’

‘ छट्—असं ओंगळ काम मी नाय केलं हं—आपला बोललों, चाललों, एकठाई बसलों, म्हणजे काय ती बायकू होते काय ! कुभाड हाय, संमदं—थोथांड हाय. ’

‘ जास्त बोलूं नको. कुभांड आहे का थोतांड आहे तें कोर्ट बघून घेईल. मी तुला विचारतो तेवढया प्रश्नाच उत्तर दे ’ असं वकिलांनीं सावकाश म्हटलें व त्याची जबानी पुरी केली.

आरोपीच्या वकीलानीं त्यांची उलट तपासणी चालू केली.

‘कायरे ? तूं म्हणालास पारूची तुझी लहानपणापासून ओळख होती. हो ना ?’

‘ हो ’

‘ मग तुम्ही खेळत होता, रानांत जात होता, झोंपडींत मजा करीत होतां ना ?’

‘ म्हणजे काय ? तिला बायकु केली होती ? ’

‘ जास्त बोलूं नकोस. विचारतों त्या प्रश्नाच उत्तर दे. हुषार आहेस मला ठाऊक आहे. ’ वकिलानें दरडावलें.

साक्षीदारास विनाकारण दटावूं नये म्हणून फिर्यादीच्या वकीलानें उठून हरकत घेतली; कोर्टानें त्याकडे लक्ष दिलें नाहीं.

‘ तुम्हांला दोघाना झोपड्यांत असतांना कुणी पाहिलें होतें कारे ?

‘ हो ’

‘ कुणी ? ’

‘ जनी न काशी ’

‘ कसें पाहिलें होतें तें सागशील का ? ’

‘ बिजे कसे ! मी तिला धरलं होतं, ती पपया खात नव्हती म्हणून. ( म्हणून ) जनीनं ना काशीनं आमचा संशव धरला न ही समदी आग पेटली. ’

‘ कोण दिवस होता तो ? ’

‘ दिस काय लिहून ठेवलाय मी ? मला काय वाचाया येतें ? ’

‘तसं नाहींरे—पावसाला सुरवात झाली होती तेव्हां कापाऊस—पडायचा होता ?’

‘ पावसाला निगुतच सुरवात झालती ? ’

‘ बरोबर, असं वाकिलानीं म्हटलें व वेदर रिपोर्ट दाखवून तो दिवस म्हणजे जूनची दहा तारीख होती, असें कोर्टास दाखविलें व उलट तपासणी बंद केली.

ठक्या गावात त्या सुमाराला असल्याच्या दुसऱ्या स्वतंत्र साक्षी मिळण्यासारख्या नव्हत्या. त्यामुळे आरोपी तर्फेच्या साक्षी घेण्याचें काम सुरू झालें.

पहिली साक्ष ठक्याच्या बापाची घेतली. त्यानीं ठक्याच्या लग्नाला कर्ज काढलें होते व तें फेडण्यासाठीं मुलाला नोकरीवर मुंबईस ठेवला होता, असें दाखविलें. नंतर ठक्या घारूची म्हणजे तिच्या नवऱ्याची महत्त्वाची साक्ष व्हावयाची होती. तो आजारी असल्यामुळें कोर्टांत हजर नव्हता. बाईचे दिवस पुरे होत आल्यामुळें फिर्यादीतर्फेच्या वकीलांनी लांबची तारीख द्यावी म्हणून कोर्टास विनंती केली. यावेळींही न्यायाधिशानें केस आपसांत काढा म्हणजे लांबणीवर टाकण्याची जरूरी नाहीं असें म्हटलें, पण आपसांत निघत नाहीं असें पाहून ती अडीच महिने लांब ढकलण्यात आली. दरम्यान, बाई प्रसूत झाली व तिला मुलगा झाला.

तारखेच्या दिवशीं कोर्टाचें काम सुरू झालें. ठक्या घारूची साक्ष चालू झाली.

‘ तुझें लग्न झालें आहे का ? ’

‘ हो ’

‘ किती वर्षं झाली ? ’

‘ शिमग्याला होतील चार वरसं. ’

‘ तूं कुठं असतोस ? ’

‘ मुंबईस ’

‘ किती वर्षें काम करतोस ? ’

‘ दोन ’

‘ तुला शेट गांवीं यायला रजा देतो का ?

‘ नाय ’

साक्ष पुरी करण्यात आली.

फिर्यादीच्या वकिलांनीं उलटतपासणी केली.

‘ हें पहा, आगोठ सुरू झाली—तेव्हां तूं घरीं आलास होतास का ? आठवण कर. ’

तो गप्प राहिला. वकिलांनीं तोच प्रश्न पुन्हां दरडावून विचारला.

‘ आगोठ सुरू झाल्यावर बऱ्याच दिसानीं आलतो ’

‘ ते नंतरचं ! तूं सांगतोस—त्याच्या अगोदर आला होतास तें सांग ’

‘ अगोदर नाय आलों--एकदाच आलतो ’

‘ खोटं सांगतोस. खरं बोललं पाहिजे तूं शपथ घेतली आहेस, खरं सांग. घाबरूं नकोस. ’

‘ ऐक ! मी सांगतों. तूं आला होतास, तेव्हां बांध चालले होते शेताचे, नाहीं का ? ’

‘ नाय—नाय. मोप पानी पडलां होतां. ’

‘ हं हं. लोक बी पेरीत होते नाहीं का ? ’

‘ नाय—आंवाजा झालेल्या ’

साक्षीदार पहिल्या खेपेस आला होता, तें नाकबूल करतो तरी पण, तो २७ जुलै रोजीं आला होता त्याबद्दलचें त्याचें पोष्टाचें पत्र त्याला दाखवलें व तें त्यानें कबूल केलें. वकीलांनी तें पत्र, कोर्टांत दाखल करून घेतलें व त्याला विचारलें तूं किती दिवस होतास ?

‘ होतों दोन दिवस. ’

त्यांनीं रूपाच्या साक्षीवरून त्याचा संबंध नव्हता. बाईचा नवरा पावसाच्या सुरवातीला आला होता व त्या नंतर पुन्हा तो तारीख २७ जुलै रोजीं आला होता हें ठक्या घारूच्या साक्षीवरून सिद्ध झालें आहे व त्याबाबत लेखी पुरावा पोष्टाचें कार्ड दाखल झालें आहे. बाईचा नवरा जरी कर्ज फेडण्याकरिता मुंबईस नोकरीला होता तरी, तो मधून मधून येत असे. आरोपींनीं उगाच गैरसमजुतीनें व सुडाच्या भावनेनें त्याच्या अशिलाची नाहक बदनामी केली आहे. या बदनामीचा परिणाम, एक गरीब बाई व तिचें अज्ञान मूल, याना भोगावा लागत आहे. त्यांची इज्जत गेली आहे. मूल बेवारशी ठरूं पहात आहे. तीं दोघें, आज जातींतून उठली आहेत. घरादाराला मुकलीं आहेत. तरी, ही बिकट परिस्थिती लक्षात घेऊन कोर्टानें आरोपीस जास्तींत जास्त शिक्षा द्यावी अशी आग्रहपूर्वक व जोरदार विनंती केली.

नंतर आरोपीतर्फे भाषण झालें. वकील म्हणाला.

रूपा धेड्याच्या जबानींत, त्याचा व बाईचा कसा दाट परिचय होता; ती त्याच्या बाहूपाशांत तारीख १० जून रोजीं प्रणयाचे चाळे करीत असता तिला जनी व काशी यानीं प्रत्यक्ष पाहिलें होतें, असें सिद्ध झालें आहे. मुलाचा जन्म

तारीख पंधरा फेब्रुवारी रोजीं झाला आहे, हें या पाटलाच्या दाखल्यावरून व्हावें. मूल धडधाकट असून संपूर्ण दिवस भरून झालेलें आहे. प्रसूती १८० दिवसाशिवाय पुरी होत नसते. तारीख १० जूनपासून ही मुदत बरोबर संपूर्ण होते. बाईचा नवरा या दिवशीं गांवांत असल्याचा पुरावा फक्त रूपाच्या साक्षींत झाला आहे. रूपासारखा अनीतीनें चालणारा माणूस, तसेंच विवाहित स्त्रीस नादी लावणारा माणूस, आपल्यावरचें किटाळ टाळण्यासाठीं तो सांगेल त्याच्यावर कोर्टानें विश्वास ठेवूं नये. बाईचा नवरा सत्तावीस जुलै रोजीं आल्याचा पुरावा झाला आहे. तेव्हां तो आल्यावरचा संबंध जर असता तर, प्रसूती इतक्या लवकर झाली नसती. म्हणून बाईचा संबंध रूपाबरोबरच झाला आहे.

आरोपी नंबर एक व दोन यांनीं, खरीच गोष्ट निदर्शनास आणली, त्यांत त्यांनीं कांहीं गैर केलें नाहीं. त्या सपशेल निर्दोषी आहेत. पुन्हा त्या प्रौढ आहेत. चार चार मुलांच्या आया आहेत. त्यांना विनाकारण एका मुलीची नालस्ती करण्याची कांहीं जरूरी नाहीं. आरोपी नंबर तीन व चार हे जातीचे सन्माननीय पुढारी आहेत. जातीच्या हिताच्या दृष्टीनें, त्यांना बाईला वाळींत टाकण्यापलिकडे गत्यंतर नव्हतें ! त्यांनीं तें केलें तें चांगल्या हेतूनें केलें आहे. त्यांच्यावर आरोप शाबीत होत नाहीं. बाई वयात आली होती. तिचा नवरा मुंबईस होता. त्याच्य गैरहजेरींत तिनें रूपा धेडा बरोबर प्रेमसंबंध जोडून अनाचार केला. नवऱ्याची बेईमानी केली. मनुष्य विकारवश झाल्यावर तो जातपात कांहींही बघत नाहीं हा निसर्गाचा नियम आहे. विस्तवाजवळ लोणी ठेवलें आणि तें वितळलें नाहीं, याप्रमाणेंच ही गोष्ट आश्चर्य मानण्यासारखी होणार आहे, तरी कोर्टानें आरोपीस दोषमुक्त करावें.

प्रत्येक आरोपींकडून वेगळी वेगळी हकीकत लिहून घेतली व निकाल देतांना कोर्टानें म्हटलें,

‘ फिर्यादीचा संबंध रूपा धेडाबरोबर होता व त्यांना एकांतांत तारुण्यसुख अनुभवताना जनी आणि काशी यानीं पावसाच्या सुरवातीला म्हणजे तारीख दहा जूनला पाहिलें होतें. जनी व काशी या पोक्त बाया असून चांगल्या घरंदाज आहेत. त्या उगीच मुलीच्या विरुद्ध कुभाड पुकारतील हे संभवनीय नाहीं. बाईचा नवरा नोकरीला मुंबईस होता, तो गावीं येत असल्याचा पुरावा फक्त तारीख सत्तावीस जुलैचा झाला आहे. त्या दिवसापासूनची प्रसुतीची मुदत दोनशें

ऐशीं दिवसाची पुरी होत नाहीं. मूल धडधाकट असल्यामुळें बाईची प्रसूती संपूर्ण दिवस भरुन झाली आहे. बाईचा संबंध रूपा धेडा बरोबर झाला, ही गोष्ट सूर्य-प्रकाशाइतकी उघड आहे.

आरोपी नंबर तीन व चार जातीचे पुढारी आहेत. रूढी व जातीच्या एकंदर प्रश्नांकडे पाहिल्यास त्यानीं समाजाहिताच्या दृष्टीने जे केलें, तें गैर नाहीं. पुढें आलेल्या पुराव्यावरून फिर्यादी, तिची केस शाबीत करूं शकली नाहीं; म्हणून मी सर्व आरोपीस दोषमुक्त करतों !

निकाल ऐकून पारुबाईची कंबर खचली व तिच्यावर एकदम विद्युत्पात झाल्याप्रमाणें तिची स्थिती झाली !



# माझा प्रश्न ?

महात्माजींची चळवळ फार जोरांत होती. बहुतेक पुढारी रोज पकडले जात होते. तुरुंग नुसतें राजकीय कैद्यांनी फुलून गेलें होतें. कांग्रेसचे कार्यकर्ते मोठ्या उत्साहानें उघड घरादाराची, बायकापोराची, पर्वा न करिता कायदेभंगांत दाखल होत होते. कुणी झेंडावंदन करून तर, कुणी बनावट मीठ बनवून, अगर विकून, अगर तें विकत घेऊन, सारखे तुरुंग भरून काढीत होते.

चळवळ हाणून पाडण्याकरितां सरकारनेंहि तितक्याच जोमानें दडपशाही करण्याचा चंग बांधला होता.

मी पूर्वीपासून कांग्रेसचें काम करीत होतों. आतां मला चळवळींतून अलिप्त राहणें शक्य नव्हतें !

तुरुंगांत जावें लागणार म्हणून मी तयारींत होतों. माझीं भाषणें जिथें तिथें होत होतीं. मीं बुलेटीन माझ्या सहीनें प्रसिद्ध केलें होतें. म्हणून माझ्यावर खटला भरून, मला एक वर्षाची सक्त मजुरीची शिक्षा झाली होती. योग्यायोग्यता पहाण्याचा पूर्वींचा क्रम सरकारनें बंद केल्यामुळें, मला ' सी ' क्लासच मिळाला होता.

तूर्त आम्हांला आर्थररोड जेलमध्यें ठेविलें होतें. तेथें गर्दी झाल्यामुळें विसापूर जेल उघडणार असल्याची दाट अफवा उठली होती; पण सुदैवानें आमची बॅच ठाण्यासच रवाना झाली.

प्रथम, मला बऱ्याकी झाडून काढण्याचें काम मिळालें होतें. पडलेलें काम, आम्हीं आनंदानें करीत होतों. आम्हीं जरी कायदेभंग करून तुरुंगात गेलों होतों तरी, तुरुंगांतील नियम व शिस्त मोडावयाची नाहीं, असें कॉंग्रेसनें ठरविलें होतें; त्याप्रमाणें आम्हीं वागत असूं. तुरुंगांत आम्हांला गप्पा गोष्टी करायला पुष्कळ

वेळ मिळे. आमचीं तेथें भजनें होत, प्रार्थना होई, सर्व कांहीं मजेंत चाले. बाहेरच्या खऱ्याखोट्या अशा सर्व बातम्या आम्हांला ताबडतोब इत्थंभूत मिळत, आणि त्या बातम्या ऐकण्याकरितां आम्ही सर्व फार उत्सुक असूं.

तुरुंगांत एकसारखे सत्याग्रही आले कीं, आम्हांला फार आनंद होई; पुढें झाडण्याचें काम मजकडून बदलण्यांत आलें. नंतर, नवार विणायचें काम मिळालें. प्रथम नवारीकरिता सुताचे गुंडे बनवावे लागत; तें काम तुरुंगाच्या आवारात, रोज सकाळीं आंब्याच्या झाडाखालीं चाले.

सकाळीं बारा वाजेपर्यंत भेटीच्या दिवशीं, जेवढे म्हणून कैद्याना भेटण्याकरितां लोक यायचे, तेवढे आम्हांला दिसत असत. वार्डरची नजर चुकवून आम्हीं त्याना 'ॲमनेस्टी आली काय ? ॲमनेस्टी आली काय ?' म्हणून विचारून मोठ्या आतूरतेनें चौकशी करीत असूं. वार्डर आमच्यावर खटले भरण्याचा दम देऊन आम्हाला गप्प करी.

आमच्या मदतीला चोऱ्या, मारामाऱ्या खून वगैरे नैतिक गुन्हे करून आलेलेहि इसम असत. आमचें एके दिवशी असेंच काम चाललें होतें. जेलरनें माझ्या जवळ काम करणारा मनुष्य बदलला व त्याच्या ऐवजी एक वीस बावीस वर्षांचा, साधारण उंच, रांकट असा काळा सावळा इसम माझ्या जोडीला दिला. तो मोहन होता. त्यानें मला ओळखलें. मला पहाताच त्याचा चेहरा एकदम काळा ठिक्कर पडला ! तो अशा रीतीनें खजील झाल्यामुळें, मी विचारात पडलो !

वास्तविक, सत्याग्रही असे कधींच ओशाळत नसत. उलट ते आनंदी असून प्रत्येकाची ओळख करून घेण्यास आतूर असत. मी क्षणभर विचार करीतच राहिलों. तो गुंडा घेऊन कामाला लागला. माझ्याबद्दल त्याला मोठा आदर वाटत होता. तो कोणता गुन्हा करून इथें आला होता, हें मला ठाऊक नव्हतें. मी नवारीची दोरी गुडाळीत विचार करीत होतों. हा आपल्यासारखा चळवळींत तर सामील होऊन आला नसेल ! असें मला एकवेळ वाटलें; पण चळवळींत हा भाग घेईल, हें संभवनीय नव्हतें ! त्याला तशींच कारणें होतीं.

कांहीं व्यक्ति अशा असतात कीं, त्याच्या प्रथम दर्शनानेंच त्यांच्याबद्दल आपलें मत अनुकूल बनत असतें, तर कांहींबद्दल प्रतिकूल होऊन जातें. या व्यक्तीला पाहिल्याबरोबर माझें मत प्रतिकूल बनलें होतें. माझ्या चर्येवरून तो

तें जाणतहि होतां; पण इथें माझा संबंध टाळणें त्याला शक्य नव्हतें. त्याच्या कपड्यावरील पत्र्याच्या पट्टीवर त्याचा नंबर व त्याच्या शिक्षेची मुदत केव्हां भरते, ती तारीख नोंदली होती. मी विचार करीत असलेला पाहून त्यांनीं चौकशी केली—

'तुम्हीं चळवळींत आलां ?'

मी 'हो' म्हटलें.

'तुम्ही कसे इकडे ?' मीं आश्चर्यानें पृच्छा केली.

पुन्हां त्या मनुष्याची चर्या पालटली. तो अगदीं शरमिंधा झाला व 'चोरीमुळें' इतकेंच म्हणाला. मी पुढें जास्त चौकशी केली नाहीं. आम्हीं रोज एके ठिकाणीं काम करीत होतो. माझा सदरा टोपी तोच धूत असे व माझी जस्ती थाळी व वाटी तोच घाशी. आपली वर्दी संपवून तो माझें कामहि आटोपीत असे. तो निर्ढावलेल्या कैद्यांप्रमाणें बदमाष नव्हता; तरीपण सत्याग्रही त्याच्याबरोबर विशेष सलगीनें वागत नव्हते. त्याबद्दल त्याला राहून राहून वाईट वाटे. त्याची मुदत संपत आलेली पाहून आमच्यापैकीं एकानें त्याला म्हटलें,

'आतां सुटल्यावर किती दिवसानें परत येणार? बहुतेक चार आठ दिवसांतच आपली पुन्हां मुलाखत व्हायला मुळींच हरकत नाहीं. तुम्हांला बाहेर तुरुंगाशिवाय स्वास्थ्य कसें लाभावें ? तुरुंग हेंच तुमचें माहेर घर—नव्हे का ?'

हे शब्द त्याच्या मनाला लागले. तो खिन्न झाला व म्हणाला,

'मी इतर कैद्यांप्रमाणें नाही.' इथे आलेले सर्व लोक अपराधी असतात असाच आपला समज आहे काय ?

मी चोरी केली नाहीं. एका स्त्रीची अब्रू बचावण्यासाठीं मला हें दिव्य करावें लागलें आहे...'

इतक्यात, गोरा जेलर आपल्या खाकी पोषाकांत टपटप बूट वाजवीत येत असलेला दिसल्यामुळें, ते सर्वजण गुपचुप खालच्या मानेनें कामाला लागले.

स्त्रीची अब्रू वाचविण्यासाठीं हा तुरुंगांत आला, इतकें त्याच्या म्हणण्यावरून मला कळून चुकल्यामुळें, तारेची व्यक्ति माझ्यापुढें मूर्तिमंत उभी राहिली. मी गोंधळून गेलों !

'तारेबद्दल मला जी भीति वाटत होती तीच अखेर खरी ठरली काय ?' असे अनेक विचार माझ्या डोक्यांत घुमूं लागले.

तारा माझ्या समोर वाढलेली मुलगी. ती लहानपणापासून अल्लड, बापाची लाडकी, स्वभावानें गोड, मोहक अशी होती. तिचा बांधा गोंडस असून एकंदर शरिराची ठेवण, तिचें चालणें बोलणें फारच मोहक असे. तिच्या गोड स्वभावानें तिनें मला लळा लावला होता. ती जेव्हां लग्नाची झाली, तेव्हा तिच्या बापाची आर्थिक स्थिति खालावली होती. तो कोर्टकचेऱ्या करून जिकीरीस आला होता. त्यांत मुलीची धोंड त्याच्या डोक्यावर होती. तो मुलीला स्थळ शोधीत होता. माझी प्रकृति चांगली नसल्यामुळें मी सहा महिने हवा पालट करण्यास पंचगणीस गेलों होतों. मी जेव्हां परत आलों, तेव्हां मला कळलें की, तारेचें लग्न भास्कर-बरोबर झालें.

ही गोष्ट मला कळली त्यावेळीं मला वाईट वाटलें. तारेसारखी सातासुखांत वाढलेली मुलगी, असल्या जुनाट वळणाच्या घराण्यात पडलेली पाहून तिला आजन्म दुःखांत आपले दिवस लोटावे लागणार अशी माझी खात्री झाली. तारेच्या बापाची व माझी ज्या वेळीं भेट झाली, त्यावेळीं हा प्रश्न मी त्याच्या जवळ काढला. मी त्याला म्हटलें,

'तुला इतकी घाई करायला रे कुणी सांगितलें ? यापेक्षां दुसरें चांगलें स्थळ तारेला मिळालें नसतें काय ? इतका वयातीत नवरा पाहिलास तुला काय म्हणावें ?'

तो म्हणाला,

'काय झालें त्यात; तो चिंतामण, त्याचें लग्न केव्हा झालें, हें आहे का ठाऊक तुला ? त्याच्यापेक्षां तर भास्करराव चांगले नाहींत का ?'

'आहेस खरा अकलेचा खंदक. अरे नुसती घाडभर मुलं झालीं म्हणजे का संसार सुखाचा होतो ? कांहींच तुम्हांला कळत कसें नाहीं ! भास्करराव म्हणजे जवळजवळ तुझ्या बरोबरचा–तशात त्याचें घराणे म्हणजे जुन्या पद्धतीचें. त्याच्या एकंदर रहाणीवरून तो विसाव्या शतकात आहे असें कोण म्हणेल ? तूं तर आपली मुलगी नुसती कसायाच्या हवाली केलीस, दुसरें तिसरें कांही केलें नाहीस.'

तारेचा बाप कांहींच बोलला नाहीं. झाल्या गोष्टीला आतां काय इलाज होता ? मी म्हटलें–तारा आम्हाला कायमची अंतरली. तिला सासरहून आमच्याकडे आणणें म्हणजे जवळजवळ अशक्य होतें. तो आधींच संशयी

त्यांत वयातीत. त्याला आपल्या बायकोनें नुसतें कुणाकडे पाहिलेलें देखील खपत नाहीं. त्याच्या तीन बायका अशाच रीतीनें झुरून मेल्या. त्या त्यांच्या स्वतःच्या लग्नापूर्वी मोकळेपणानें हिंडल्या फिरल्या असतील तेवढ्याच !

तारेची माझी भेट तिच्या भाच्याच्या लग्नात झाली. तिला त्यावेळीं दोन तीन मुलं होतीं. पूर्वीचा तिचा हूड स्वभाव पार नाहींसा झाला होता. थोडक्यात म्हणायचें म्हणजे, ती अगदी कोकणदेवताच बनली होती. ती एखाद्या कोमेजलेल्या फुलाप्रमाणे निस्तेज झाली होती.

'तारे !—भाऊंना विसरलीस वाटतं !'

'बरी आहेस ना ?' मीं चौकशी केली

'बरी नसायला काय होतयू मला' तिनें उत्तर दिलें व म्हटलें,

'मी केव्हाची बघते आहे तुम्हाला; पण कशी हांक मारणार ?'

'तुम्हीं मुली—लहानपणीं, अंगाखाद्यावर लोळतां खेळता; पण त्याच मोठ्या झाल्या कीं, तुम्हाला आमच्या सारख्याबरोबर बोलायला सुद्धा लाज वाटते !'

'अहो, तसं नाहीं—भाऊ—त्यांचा स्वभाव कसा ? आहे ना तुम्हाला ठाऊक !'

'बरं, ते राहूं दे; पण कायग, तूं मुंबईत असतेस आणि कुठेंच कशी दृष्टीस पडत नाहींस ?'

'कुठें जाणार ?-घर सुटेल तेव्हां ना ?'

'आमच्या घरचा पसारा अन् सोवळं अन ओवळं आटपेल तेव्हाना ! आम्हाला जें लग्न करून आणायचं, त्या आम्हीं—चौघे बाहेर काढतील तेव्हां बाहेर निघायच्या !'

मी हंसून फक्त 'अस्सं !' म्हटलें व समजून चुकलों कीं, तारा तितकी सुखी नव्हती ! तिच्या स्वभावातील पूर्वीचा मोकळेपणा पार नाहींसा झाला होता. तिच्या पसंतीकडे, आवडी निवडीकडे, मुळींच लक्ष दिलें जात नव्हतें ! त्यामुळे तिला तिची हौस, भावना, आकांक्षा सर्व कांहीं दाबून ठेवाव्या लागत !

भास्कररावाच्या नोकरीची मुदत भरत आली होती. तो लवकरच पेन्शनींत येणार होता. त्याचा आवाज एकाएकीं बसला. त्यानें डॉक्टराचीं औषधें केलीं. गुण कांहीं येईना, अखेर त्यानें आपली प्रकृति नामांकित डॉक्टरास दाखविली. त्याला क्यानसर झाला होता.

क्यानसरचा रोगी, साधारण वर्ष सहा महिन्याचा सोबती असतो हें त्याला

माहीत होतें. त्याला बरें होण्याची आशा नव्हती. त्यानें आपल्या भावाबंधांपासून आपला भाग मोकळा करून घेतला. त्याचें दुखणें विकोपाला जाऊन त्यांतून त्याची मुक्तता झाली.

सर्व मुलांची जबाबदारी एकट्या तारेवर पडली. घरांत विभक्तपणा झाल्यामुळें, जवळचे नातेवाईक कश्या शत्रूप्रमाणें वागूं लागले. तारा मात्र पुन्हा स्वतंत्र झाली ! ती आतां आपल्या मनाप्रमाणें वागे. त्यामुळें तिच्या राहणींत फरक पडला. तितकंच लोकाना टीका करायला सोपें झालें. ते टीका करीत होते. हंसत होते. त्याची समजूत कीं, विधवानी अगदीं सर्वस्वाचा त्याग करावा !

तारेला आपलीं कामें करून घेण्याकरिता हजाराचे आर्जव करावे लागत सर्वच माणसे सारखी कोठून असणार ?

मोहन तिच्याच शेजारात होता. ती बारीकसारीक कामं त्याच्याकडून करून घेई. तो कुठल्यातरी कारखान्यात काम करीत होता. त्याला महिन्याकाठीं सतरा अठरा रुपये जेमतेम मिळत. त्याचा परिचय, तारेबरोबर येताच त्याच्यांत फरक होऊं लागला.

दिडकीच्या विड्या घेण्याची ज्याला ताकद नाहीं, असा माणूस सिगारेट शिवाय गोष्टच बोलत नव्हता ! त्याची फॅशन वाढली. तो लेंगा नेसून भपकेबाज पोषाख करून कॉलेज विद्यार्थ्यासारखा ऐट मिरवूं लागला. त्यात त्याचा उद्देश, आपला दर्जा वाढविण्याचा होता. तो आमच्या सारख्यांबरोबर बोलताना संभाळून शुद्ध बोले. ते त्याचें वागणें मुलामा दिलेल्या धातूसारखें वाटे. खरे गुण अंगीं बाणायला, मुळातच चागले संस्कार व्हावे लागतात. तारेचा बाप माझा स्नेही, आणि तारेवर असला प्रसंग आल्यामुळें, मी मधून मधून तारेकडे जात असें, त्याला पहातांच, मला त्याचा तिटकारा वाटे.

त्याचा तारेच्या घरात इतका परिचय वाढला होता कीं, जगू घराची व्यवस्था त्याच्याकडेच आहे अशा आविभार्वानें तो वागे. हें जेव्हां माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें त्यावेळीं, मी तारेला सूचना देण्यास कमी केलें नाहीं. माझा उपदेश तिला आवडला नाहीं. एकंदर गोष्टी, मला कुणीतरी सागत असला पाहिजे अशी तिची समजूत होऊन तिला ज्यांचा वहीम होता त्याच्या समोर ती मुद्दाम त्याच्या बरोबर ज्यास्त सलगी करूं लागली.

तो सुशिक्षीत नसल्यामुळें व त्याचा सर्व व्यवहार हलक्या लोकांत असल्या-

मुळें, हलक्या माणसाप्रमाणेंच त्याचें वर्तन होतें. तो कितीहि जपून वागला तरी, त्याच्या मंडळींत गेला कीं, तें सगळें विसरे. त्याच्या तोंडाला शुद्ध व सभ्य भाषा कुठून असणार ! त्याला मुलांबाळांबरोबर कसें बोलावें व त्यांच्याशीं कोणती थट्टा करावी याचें तारतम्य, त्या संस्कृतिहीन माणसाला कसें रहाणार !

त्याच्या शिव्या, त्याच्या वागण्याची ढब, त्याची अशुद्ध व ग्राम्य भाषा त्या मुलातही उतरूं लागलेली मला आढळली. मुलं अनुकरणशील असतात. प्रत्येक गोष्टीचें सूक्ष्म निरीक्षण तीं करीत असतात. त्या वयांत त्याच्यावर चांगलेच संस्कार झाले पाहिजेत; पण हा प्रकार पाहून मी थक्क झालों ! या गोष्टीचा परिणाम, अनिष्ट होणार हें मी समजत होतों. तारेला सूचना द्यावी कीं न द्यावी या विचारांत मी होतों. आपण जर वेळींच आपल्या कल्पनेप्रमाणें सूचना दिली नाहीं आणि गोष्टी विकोपाला गेल्या तर, मागून पश्चात्ताप होऊं नये म्हणून मी संधि शोधीत होतों.

तो जादूचे प्रयोग करीत असे. गणपती उत्सवात त्याचे कार्यक्रम लागले होते. जिथे जिथे याचे प्रयोग होत, तिथे तिथें तो तारेस व तारेच्या मुलास अगत्यानें बोलावी. तारेला सुद्धा त्याचे खेळ सारखे पाह्यला जावें असें वाटे. तिला घरात काहीं सुचेनासे होई. ती हजार कामं बाजूला सारून त्याच्या मागे जाई. त्याच्या घरातील माणसें दारू पीत असत. हा दारूला शिवत नाहीं असा टेंभा मिरवी. त्याला दुसरे नाद होते. त्यापेक्षा त्याला एक वेळ दारूचा नाद असता तरी पत्करला असता. कारण, त्याचें झालें इतकें नुकसान, त्या व्यसनानें खचित झालें नसतें ! त्याला मारवाड्याचें कर्ज झालें होतें. त्याला त्याचे व्याजहि आतां भरतां येत नव्हतें. मारवाडी त्याच्या मागे लागले होते. घरातून रक्कम मिळण्यासारखी नव्हती. घरांत आपणाला त्रास होतो, अशा कागाळ्या त्यानें तारेच्या कानावर घालण्यास सुरवात केली. तारा भाबडी होती, भोळी होती. त्याची प्रत्येक गोष्ट तारेला खरी वाटत होती. त्याला कर्ज झालें होतें हें कुणास माहीत नव्हतें. त्यानें तारेच्या गळ्यांतील बकुळीच्या सोन्याच्या हाराची तारीफ केली. तो त्यानें पहाण्यास मागितला व म्हणाला, ‘ बाई पुढल्या महिन्यांत माझें लग्न आहे. आपल्याला असला हार करावयाचा आहे. तुम्हीं दोन दिवस माझ्या सोनारास दाखविण्याकरिता तो द्याल काय ? ’

दुसऱ्या दिवशीं मी तारेकडे गेलों होतों. तारा विचारात होती. त्याचवेळीं

मोहन गडबडीनें बाहेर जाण्याच्या तयारींत होता. मुलें घरात नव्हतीं. मी तेथें बसलेला होतों हें त्याला ठाऊक नव्हतें. तो एकदम आला. तारेला हा व्यवहार कुणाला कळूं द्यावयाचा नव्हता. त्याला इषारा मिळावा म्हणून तिनें त्याला तिथेंच डोळे वटारून थोपवून धरलें व म्हणाली,

' काय काम आहे ? '

त्यानें उडवाउडवी केली. तिनेंहि तशीच तुसडीं उत्तरें देलीं. पण मी जाताक्षणीच, तो पुन्हां तिच्या खोलींत शिरला व तिच्याकडून कांहीं वस्तु घेऊन तावडतोब बाहेर पडला.

तो सरळ मारवाड्याकडे गेला. त्यानें तो हार गहाण टाकला. त्या नंतर मोहन दोन तीन दिवस घरींच आला नाहीं. मोहन पळाला अशी खात्री झाली. तारेचें धाबें दणाणलें. ती बेचैन झाली. तिचा आपला विश्वास कीं, मोहन कांहीं तिला फसविणार नाही.

मोहनच्या साथीदारांनीं मोहन पळाल्याची बातमी मारवाड्यांस दिली ! मारवाडी त्याचा शोध करीत घरीं आले. तेव्हा मोहनला मारवाड्याचे बरेच कर्ज झाले आहे असे घरच्या माणसास कळलें ! हें पाहून तारा मात्र, आपला हार आपल्या नशीबातून उतरला एवढें समजून चुकली. मोहनची स्वारी, पुन्हा थोड्या दिवसानीं घरीं आली. घरीं बोलाचाली झाली. तारेला मात्र त्यानें थापा देऊन तिची समजूत घातली. तारेला तें सर्व खरेंच वाटत होतें.

ती वेळीं अवेळीं त्याची तोंडफाटेपर्यंत स्तुती करी. पुरुष किंवा स्त्री विनाकारण एखाद्याची अवास्तव स्तुती करूं लागलीं कीं, तिथें कांहींतरी पाणी मुरतें असें समजावें.

मी तिला जेव्हां जेव्हां काही सांगे तेव्हा तेव्हा ती शपथा घेऊन सांगे कीं,

' माझी तुम्हीं काहींही काळजी करूं नका—मी माझ्या नवऱ्याचा अखेरचा उपदेश केव्हाही विसरणार नाहीं. माझ्या पायरीला बट्टा लागेल असं वर्तन मी घडूं देणार नाहीं. मी एवढी वाचतें करतें ती अगदींच अजागळ नाहीं. पुरुषच फसतील पण मी केव्हाही फसणार नाहीं हो ! '

तिचं हें अवसान पाहून मी गप्प झालों !

पुढे मी चळवळीत पडलों. त्यानंतर मला तारेची कोणतीहि हकीकत कळली नव्हती. पुढील माहिती मला मोहनकडून मिळवायची होती. मोहन व मी ज्यावेळीं बऱ्याकींत एकटेच होतों त्यावेळीं मी त्याला म्हटलें,

'मोहन, एकूण तूं चोरी केली नाहींस, तर कोणत्या गुन्ह्यासाठीं इथें आलास?'

त्यानें सुरवात केली,

'मुंबईची वस्ती कशी आहे तुम्हांला आहे ना ठाऊक ? बहुतेक आमच्या सारखे गरीब लोक चाळींचाळींतून रहातात. चाळींत एकेका खोलींत दहा दहा बारा बारा इसम असतात. ते रात्रीं कुठें तरी उंदीर घुशीसारखे ग्यालऱ्या फुटपाथवर पडलेले असतात. मी असाच आमच्या चाळीच्या ग्यालरींत झोंपत असें. एका अमावास्येच्या रात्रीं माझें कपाळ दुखत होतें. ताराबाईचा दरवाजा चुकून उघडा होता. ताराबाई दारांत निजल्या होत्या. त्याची बामची डबी कपाटावर असे, ती मला ठाऊक होती. माझ्या मनात आलें की, हळूच आपण बाम घ्यावा. मी मागचा पुढचा विचार न करता लगेच बाम घेण्याकरितां आंत शिरलों. काळोखांत बाम मला मिळाला नाहीं. सुमार दोहोंचा होता. आमच्या शेजारचे गणपतराव त्याचवेळीं बर्फ आणण्यासाठी बाहेर पडले होते. त्यांनीं मला दिव्याच्या अंधुक उजेडात घरातून निघताना पाहिलें.

तारेच्या घरात चोर शिरला, अशी त्याची समजूत झाली. त्यानीं एकदम 'चोर–चोर' अशी ओरड केली.

धडाधड लोक बाहेर आले. मीही घाबरलों. मला काहीं सुचेना. मीही 'चोर चोर' ओरडत पळत सुटलों. मला लोकानीं काळोखात घेरलें. तारेची फजीति होण्याची वेळ आली. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, तिनें आपल्या हातातील पाटली काढून दारात फेकली व तीही 'चोर चोर–धांवा–माझी पाटली नेली' अशी ओरडत बाहेर आली. लोकानीं पाटली शोधली, ती माझ्या हातात दिली, व मला पोलिसाच्या हवाली केलें.

पोलिसांनीं माझ्यावर खटला भरला. माझा खटला सुनावणीस निघाला. माझा गुन्हा काय होता तो सरकारी वकीलानें कोर्टाला समजावून दिला. माझ्यावर दोन चार्जीस ठेविले होते. एक हाऊस ट्रेसपास व दुसरा चोरीचा.

दुभाष्यानें माझ्यावर ठेवलेले आरोप मला समजावून दिले व मला 'गुन्हे कबूल आहेत काय ?' म्हणून विचारलें.

मी गुन्हा नाकबूल केला. ताराबाईना साक्षी करितां पुकारण्यात आलें.

'ईश्वर साक्ष सर्व खरें आणि खऱ्याशिवाय दुसरें काहीहीं सांगणार नाहीं' अशी हातात गीता देऊन तिच्याकडून शपथ घेवविली.

तिनें आपल्या जबानींत म्हटलें, ' गेल्या अमावास्येच्या रात्रीं गोष्टी करिताना मला झोंप लागली. दरवाज्याला कडी घालायची मी विसरलें. रात्रीं झोंपेत मी चोर चोर अशा आरोळ्या ऐकल्या मी एकदम जागे झालें. हातातली पाटली पाहिली. हातांत पाटली नव्हती. माझा दरवाजा सताड उघडा होता. मीं घाबरून ओरड केली व बाहेर आल्यें. बाहेर गर्दी जमली होती व लोकानी मोहनला घेरले होतें.

मोहनला माझ्या खोलींतून निघतांना गणपतरावानीं पाहिलें होतें.

माझ्या तर्फे काम चालविणाऱ्या वकीलानें तिची उलट तपासणी केली. मला वाटले की, वकील मला कांहीं कायदा काढून दोषमुक्त करील. त्यानें तिला प्रश्न केला,

' हें पहा, मी तुम्हाला असें विचारतों कीं, तुम्हीं तुमच्या जबानींत म्हणालांत, गोष्टी करतांना मला झोंप लागली हे खरे ना ? '

' हो '

' तुम्हीं किती वाजेपर्यंत गोष्टी करीत होता. '

' साधारण अकरा-साडेअकरा. '

' तुम्हीं मोहन बरोबर गोष्टी करता ना ? ' तारा गोंधळली. सरकारी वकीलानें हरकत घेतली; पण मध्ये बाचाबाची होऊन कोर्टाने तो प्रश्न तारेला विचारूं दिला.

तारा गप्प राहिली होती.

वकीलानें तोच प्रश्न पुन्हा दरडावून विचारला, व ' खरें सांगा ' असें त्यास निक्षून सांगितलें.

ती म्हणाली, ' मी माझ्या मुलाबरोबर गोष्टी करते.'

मुलें इतका वेळ जागीं रहात असल्याबद्दल वकीलानें संशय व्यक्त केला. सरकारी वकीलानें मुले वयानीं किती मोठीं आहेत तें मध्येंच उठून विचारलें. ताराबाई म्हणाल्या,

' माझा मोठा मुलगा बारा वर्षांचा आहे. तो अभ्यास करीत बसतो व मुलगी चौदा वर्षांची आहे. त्याचा अभ्यास आटोपल्यावर आम्हीं केव्हां केव्हा गोष्टी करतों.

कोर्टाची खात्री झाली. मग गणपतरावाची साक्ष झाली.

' मी तारेच्या घरांतून गेल्या अमावास्येच्या रात्रीं मोहनला निघताना पाहिलें

व म्हणून चोर समजून ओरड केली. नंतर त्यानें बाईची पाटली चोरली असल्याचें कळलें.'

वकीलानें विचारलें कीं, मोहनची तुमची ओळख आहे ना ? त्यानें होकार दिला. दुसरा प्रश्न त्याला काहीं कर्ज वगैरे असल्याची तुम्हाला माहिती आहे का ? असा होता.

ते म्हणाले,

' मारवाडी त्याच्याकडे येत असत.' त्याची उलट तपासणी झाली.

उलट तपासणींत ते अपरात्रीं बाहेर का पडले होते एवढेंच विचारण्यांत आलें.

त्यांची बायको आजारी होती, तिचा ताप चढला होता आणि बर्फ पाहिजे होता म्हणून ते दुकानांत निघाले होते असे ते म्हणाले.

' आरोपीचे साक्षीदार आहेत काय ? ' म्हणून कोर्टानें विचारलें.

माझे साक्षीदार नव्हते.

कोर्टानें माझें म्हणणे काय आहे तें सांगण्यास सागितलें.

' मला काहीहि सांगावयाचें नाहीं ' असें मीं म्हटलें.

सरकारी वकीलानें त्याच्या धंद्याला अनुसरून माझ्यावर ठेवलेल्या आरोपाची छाननी केली. तो म्हणाला, ' ताराबाईच्या साक्षीत मोहननें चोरी केली हें सिद्ध झालें आहे गणपतरावानीं मोहनला ताराबाईच्या खोलींतून निघताना पाहिलें होतें. शिवाय गुन्हेगार बराच कर्जबाजारी व व्यसनी आहे. दोन्ही गुन्हे त्याच्यावर शाबित झाले आहेत तरी, एका अनाथ विधवेच्या घरात काळोख्या रात्रीं शिरून चोरी करण्याचें धाडस करणें, हे गुन्हे फार भयंकर स्वरूपाचे आहेत तरी, कोर्टानें ही परिस्थिति लक्षात घेऊन कायद्यात जेवढी शिक्षा नमूद केली आहे तेवढी द्यावी.

नंतर वकीलाने सुरवात केली,

' माझा अशील तरुण आहे. त्याला कर्ज झालें आहे. अविचाराच्या भरांत त्याला चोरी करण्याचा मोह झाला. त्याला अद्याप वर्तन सुधारण्याची संधि द्यावी.'

विधवेच्या घरात ती झोंपी गेली असताना शिरून, तिच्या अंगावरचा ऐवज लांबविणे हा गुन्हा भयंकर स्वरूपाचा नाहीं असें कोण म्हणेल ?

हाच मुद्दा कोर्टानें लक्षात घेऊन निकाल दिला !

ते म्हणाले,

' वास्तविक आरोपीस जास्तींतजास्त शिक्षा देणेंच योग्य; पण त्याचें वय लहान

आहे. त्याला अजून आपलें वर्तन सुधारतां येण्यासारखें आहे व त्यानें ते सुधारावें म्हणून त्याला मी फक्त दोन्ही गुन्ह्याबद्दल सहा सहा महिन्याची सक्त मजुरीची शिक्षा देत आहें. त्यानें दोन्ही शिक्षा एकाच वेळीं भोगाव्या. '

तारेचा ऐवज परत देण्यांत आला.

मी मोहनकडेच टक लावून पहात होतों; तो मजपासून कांहींतरी छपवीत असावा असें मला आढळून आलें !

मोहन चोरी करून तुरुंगांत गेला ही लोकाची समजूत झाल्यामुळें तारा अजिबात सुटली होती. मात्र ती त्या दिवसापासून आपली अब्रू रक्षण झाल्याबद्दल देवाला धन्यवाद देत आपलें उर्वरित आयुष्य मुलाची काळजी घेण्यांत व परमेश्वराची भक्ति करण्यांत घालवूं लागली.

मोहनला त्याची चूक समजून आली. तो तुरुंगांतून सुटताच आपल्या गावीं गेला. तेथें त्यानें वडिलांच्या विचारानें आपणाला जिच्या गरजा भागविता येतील अशा मुलीबरोबर लग्न लावलें !



# उपराति

हल्लीं जशा मुली पंचवीस वर्षाच्या झाल्या तरी कुणालाच काय; पण प्रत्यक्ष त्याना स्वतःला सुद्धा त्यांत विशेष वाटत नसतें; तशी स्थिती साधारण पंचवीस तीस वर्षांपूर्वी नव्हती !

त्या काळीं मुली इतक्या वाढतच नव्हत्या. एकदां का मुलगी बारा तेरा वर्षांची झाली कीं, ती उपवर होत असे.

फाळक्यांची सुधा—अंगामासानीं चागली, धष्टपुष्ट, उफाड्या वाढ्याची, डबल हाडाची—अगदी बारा वर्षांची होते न होते तोंच ती सरसरीत केळीसारखी सरळसोट वाढली. लोकांना तितकेंच ओरड करायला पुरें झालें ! कुणी म्हणूं लागले ‘ झाली हो—ती लग्नाची ! ’ कुणी म्हणाले, ‘ काय हो ती कालची परकरी सुधा, झाकून काढते की आईला ! ’

सुधेच्या वडिलांचे मित्र मुंबईच्या सोकाजीपैकीं होते. फाळक्यांची रहाणीही थेट सोकाजी पथी. त्यांच्या घरात सोंवळेपणा नव्हता, शिवाशिवीचा बाधा नव्हता. घरातल्या बायका देखील पातळें अन् लांब हाताचीं, आखुडबाहीचीं पोलकी अन् शाली वापरीत. बुचडे घालून पायात गादीचे लालभडक जोडे घालीत. ही मंडळी अगदीं ब्राह्मण मंडळींत गेली तरी हे ब्राह्मण आहेत म्हणून ओळखणें कठीण जाई !

सुधा वाढल्यामुळें तिचे वडील तिला स्थळ शोधीत होते; पण या त्याच्या अशा वागण्यामुळें, माहितींतला कुणी त्यांची मुलगी पत्करायला सहसा तयार नव्हता ! त्यांचें घर बाजूला पडल्यासारखें होतें. ते विचारात होते. यंदा त्यांना तिला उजवून मोकळें व्हायचें होतें !

सुधा बुद्धीनें चलाख होती. बापाची अडचण जाणूनही घरांत ती सारखी

अल्लडपणा करायची व सर्वांबरोबर खेळीमेळीनें वागे. आपलें लग्न लवकर होणार म्हणून तिला आनंद होत होता.

ती लिहावाचायला शिकली होती. हार्मोनियमही ती वाजवी.

मुंबईत जेव्हां प्रदर्शन भरले होतें तेव्हां तिने त्यात पाण्यावर रासक्रीडेची रांगोळी इतक्या सुंदर रितीने घातली होती, कीं यंव्!

आई बाप मुलीच्या लग्नाचे विचार करूं लागले की, मुलीही आपआपल्या कल्पनेप्रमाणे लग्नाबद्दल हवेत मोठमोठे मनोरे बांधू लागतात! सुधा याला अपवाद नव्हती! तिला वाटत होते की, तिला केस राखलेला, मिशी काढणारा, टॉयलेट करणारा, चांगली ऐटबाज मखमलीची टोपी घालणारा, झोकदार कपडे वापरणारा एक सुंदर छानछबेला नवरा मिळेल; पण तो काळ तसा नव्हता! त्या काळीं, आईबापानीं कुणाला तरी मध्यस्थि घालून, त्यांच्या पसंतीवर टिपणे जमवून, हुंडा करणी ठरवून, लग्ने जमवून टाकायची! कित्येक वेळी टिपणे, करणीं, हुंडा जमला कीं, परक्याच्या शिफारशीवरच वडील देखील मुलगा मुलगी न पहाता विवाह लावून देत!

कुणीशी शिफारस केली, देवघेव ठरली अन् तिचे लग्न निश्चित झाले व ते सुमुहूर्तावर पारही पडले!

सुधा सासरीं गेल्यावर तिला तिथें सर्वच विलक्षण वाटूं लागलें!

सुधेचें लग्न झाले तरी तिचें माहेरचें नाव गोड वाटल्यावरून बदलण्यांत आले नाहीं; पण तिच्यीं पातळे बंद झाली, पोलके गेले, पायात काहीं घालायचे नाहीं. देतील तीं लुगडीं नेसलीं पाहिजेत; मोठें कुंकू लावलें पाहिजे वगैरे वगैरे कडक कायदे अंमलात आले!

माहेरीं तिला मोकळेपणानें बोलतां व वागता येत होतें; पण सासरी गेल्यावर तिच्या तोंडाला खंबायती कुलूप बसलें व पायात रुपेरी बिज्या पडल्या! घरात सारी माणसें वडील, सूनबाईबरोबर मग कोण बोलणार? त्यामुळे तिला अगदीं एकलकोंडें वाटून चैन पडत नाहीसे झालें! तिला सवड सापडली की, ती एकटीच बाजूला जाऊन मुळूमुळू रडत बसे. असें तिचें रडणें कुणाला दिसलें, अन् कुणी तिला प्रश्न केला—

—'कां—ग! रडतीस?'

'तुला कुणी काय बोललं? तुला रडायला काय होतंय?' कीं, डोळे बिळे

पुसून तिची जी तिरपीट उडायची कीं, कांहीं पुसूंच नये ! ती लगेच म्हणायची, ‘ इश्श ! मी–केव्हां रडलें ? छे–कुठे ? डोळ्यात धूर गेला म्हणून डोळे चोळतें आहे झालं ! ’ गंमत ही कीं, धूराचा लेशहि नसायचा तिथें ! तिचें विवाहोत्तर जीवन असे जात होते. तिला वाटत होतें, नवरा तिला सुख देईल. नवऱ्याची परीक्षा होईपर्यंत पुढले विधी तहकूब झाले होते. नवराबायकोंची नुसती नजरानजर होणेहि शक्य नव्हतें !

तिला सोवळ्या ओवळ्यात कसें वागावें हेंही माहीत नव्हतें ! ती आपली हरघडी चुके, आणि मग तिला सर्वांचीं बोलणीं खावी लागत. बोलणीं खाऊन पोट भरल्यामुळें, तिला जेवण जात नसे. तिच्या वडिलाची सुधारकी वर्तणूक तिला बाभळीच्या काट्याप्रमाणे बोचे ! त्या घरात सर्व तिची मजा पहाणारे ! तिच्या बाजूचे असें कुणी नव्हते ! जो–तो तिची गाऱ्हाणीं नवऱ्याला ऐकवी.

त्याच घरांत लहानाचा मोटा झालेला तिचा नवरा; तोहि त्याच स्वरूपाचा असावयाचा ! तशात तो वडीलाच्या ओंजळींनें पाणी पिणारा होता; मग त्याला बायकोची बाजू घ्यायला तोंड कुठलें असणार ? उलट तोहि–तिलाच टाकून बोलायचा ! या वागणुकीचा तिच्या प्रकृतीवर परिणाम झाला. ती अशक्त व पाढरी फट्ट झाली !

‘ कळमवणी पडल्यावर म्हणे–मुली चांगल्या उमटायच्या; पण आमची सुधा दिवसें दिवस खराबच होते आहे, कांहीं बाहेरची तर बाधा नसेल हिला ? ’ असें म्हणणारी एखादी आजीबाई तिथें तयार असायचीच !

नवरा पहावा, तर तो बेफिकीर; जसें त्याला त्यात कांहींच नाहीं !

नवऱ्याची परीक्षा होऊन तिच्यावरचीं बंधने निघालीं. तो पास झाला.

वैवाहिक जीवन कसे उपभोगावें हें, त्या पुस्तकात डोकें खुपसून बसणाऱ्या वसंताला ठाऊक नव्हते ! सुधेने त्याला खुलवायचा प्रयत्न केला तरी त्याची कळी खुलतच नसे ! घुम्या होता तो ! कुत्र्या माजराचे जीवन होतें त्याचें ! नोकरी करून अर्धी भाकरी पोटाला मिळवावी इतकीच होती त्याची तहान. नोकरी धरायची म्हटली कीं, मिळालीच नोकरी असे होते ते दिवस. लोक तेव्हां देखील नोकरीत चागले गब्बर झाले होते. सुधेचा नवरा नोकरीला लागला व लवकरच मोटा पगार कमावूं लागला. त्याला थोड्या अवधींत बरींच मुलें झालीं. पण सुधेच्या तोंडावर सुख, समाधान मात्र व्यक्त होत नव्हतें ! ती सदोदित

कंटाळलेली उदास अशी दिसे. तिला खाण्यापिण्याला पुष्कळ होतें; पण प्रेमाचा व प्रणयाचा ओलावा नव्हता; त्यामुळें ती जीवनावेगळी पडलेल्या मासोळीप्रमाणें तळमळे व तडफडे !

वसंताचे वडील फंड घेऊन आपल्या गांवीं गेले. सासू सासऱ्याच्या कटकटींतून सुधा सुटली; पण तिला त्यात आनंद वाटला काय ? नाहीं. ती आतां बेफिकीर बनली होती. नवरा तिला त्याच्या घरची एक बटीक यापेक्षा जास्त महत्त्वच देत नव्हता.

वर्षों वर्षी सुधा वटपौर्णिमेसारखीं व्रतें करी; पण ती मामुलीच असत, त्यात खरेपणा बिलकूल नसे.

‘ उभ्या आयुष्यात आपण कधी नाटक तमाशा पाहिला नाहीं कीं, कधीं कुठें गाण्याला गेलो नाहीं ’ असें सुधेचा नवरा मोठ्या अभिमानाने सांगे !

सुधा वस्ताद झाली होती. ती त्याच्या समोर सभ्यपणाचा अधिकच आव आणून वागे. त्यात त्याला समाधान होई.

वसंत मोटा हिशोबी होता. त्याने पै-पैसा करून जवळ बरीच माया करून ठेविली होती. दागदागिने केले होते. ऑफिसातला फंडहि बायकोच्या नावानें करून ठेवला होता. आयुष्याचा विमा उतरवून ठेवण्याचा तेव्हा विशेष प्रघात नव्हता. तशात तो अंगाबांध्याने धिप्पाड असल्यामुळें अकालीं मरेल अशी कल्पना त्याला चुकून सुद्धां झाली नव्हती. म्हणून त्याने विमा उतरवला नव्हता. तो पेन्शन घेतल्यावर त्याला किती पैसे मिळतील याचा हिशोब वारंवार करीत असे; पण निमित्त म्हणून त्याच्या तळहातावर एक पाढरा भाजल्यावर जसा फोड येतो, तसा आला आणि तो डॉक्टराकडून नावाला फोडला इतकेंच ! त्यात त्याला बेसुमार ताप चढला आणि तडकाफडकीं त्याचा अंत झाला !

सुधा शोक केला पाहिजे म्हणून रडत होती. त्याच्या शवाजवळ तिला सर्व कांही आठवत होते.

‘ —प्राण गेला तरी कुणाला बोलले नाहींत...आता मी काय करूं ? मुलाबाळाचा पसारा कसा आवरूं ? मला बाहेर पडूं दिलं नाही—कशाची माहिती दिली नाहीं. एवढ्या तेवढ्या गोष्टीवरून उगाच संताप करीत. कुठं गेला तो तुमचा संताप ? आतां कां नाहीं माझ्यावर दातओंठ खात ? आता—मी केवढी बोलते आहे. कसं सहन होतं हं ! माहेरचं नांव नाहीं घेऊ दिलंत

मला ! कधींमधीं म्हटलंच तर म्हणत, ‘ मी मरेन तेव्हां--जा एकदांच माहेरीं देवा–देवा काय हा प्रसंग ! ’ असें म्हणून ती कपाळावर हात मारून घेत होती-नव्हे ! ती लोकाना त्या घरात—तिला कशी वागवली होती, हे जमलेल्या सर्व नातेवाईकांना ऐकवीत होती.

सासरा कठोर हृदयी होता. तो उलट हिचेच दोष दाखवीत होता. त्याला सुनेनें लोकांदेखत असे उद्गार काढावे हें आवडत नव्हतें. इतके दिवस ती भीत होती. आतां तिचे भय नाहीसें झाले होतें. तिला हिम्मत आली होती. सर्वांना पाणी पाजायची तिची तयारी होती. फंड तिच्या नावावर होता हें त्याला त्याचवेळी कळलें. त्याला वाईट वाटलें ! मुलाचा पैसा त्याच्या हातीं येणार नव्हता !

‘ ती काही कां करीना—आपल्याला तिथें लक्षच द्यायचें नाही. ’ त्यानें ठरवले व दिवसवारे झाल्यावर आपला तेथून पाय काढून घेतला !

मुलाबाळाच्या शिक्षणाकरिता सुधेला मुंबई सोडता येत नव्हती. तिनें नवऱ्याच पैसा घेतला, थोड्या भाड्याची जागा घेतली, अन् ती स्वतंत्रपणे राहूं लागली.

तिच्या हातात मुबलक पैसा खेळत होता. तिला ती काय करते ?—असें विचारणारा कुणीं नव्हता. तिच्या परिचयात एक सुधाकर नांवाचा उमलता तरुण आला. त्याचा तिला हळूहळू विश्वास वाटूं लागला आणि त्याच्या तंत्रानें ती इतकी वागूं लागली कीं, एकमेकाना एकमेकाशिवाय एक दिवसहि रहावत नव्हतें ! कधी काळीं, तसा एकटे रहाण्याचा प्रसंग आलाच तर, तो एक प्रसंगच होऊन बसे सुधाकर हा चंगीभंगी मंडळीपैकीं एक तरुण होता. हा काहीं पट्टीचा गवई नव्हता तरीपण तो आपणाला तानसेन समजे ! त्याला प्रोफेसर सुधाकर म्हणून म्हणत. ते एकदोन नायकीणींच्या मुलींच्या शिकवणी करी. एका गायनशाळेंत तो मास्तरही होता. तो दिसण्यात मोठा सभ्य दिसे. सुधेला सट्टयात पैसे लावायलाहि त्यानें शिकविलें. हे त्याचे सर्व व्यवहार गुपचुपीनें होत. तिला त्याच्या सहवासात आनंद वाटूं लागला !

असले लोक नेहमी पैशाच्या अडचणींत असावयाचे ! जेव्हा तेव्हां तो पैशाची मदत सुधेकडून घेई. त्याचा आपसात देवघेवीचा व्यवहार सुरू झाला हें लोकाना ठाऊक होतें. सुधा फसेल याची सर्वांना खात्री होती; पण तिला मात्र तें उमगत नव्हतें.

प्रोफेसर सुधाकराचा एक क्लब होता. त्या क्लबामार्फत त्यांचें मंडळ, एक नाटक बसवीत होतें. हे रावसाहेब तिथें गायन शिकवीत होते. नाटकाच्या तालमी जोरात

चालल्या होत्या. नाटक त्याना अप्रतिम वठवायचें होतें. पैशाची त्यांना जरूर होती. प्रोफेसर साहेबाच्या ओळखी दाडग्या होत्या म्हणून लागणारे पैसे त्यानीं मिळवावे असे त्या मंडळीनी ठरविले होतें. त्याला पैशासाठी कुठलें तरी मोठे कूळ गाठावयाचे होते ! तो त्या विचारात होता. सरळ मागून काही कुणी पैसे देणार नव्हता ! नाटकात कोण काण आहेत, कोण उत्तम काम करतो, उत्तम कोण गाईल याची सर्व माहिती तो सुधेस देऊं लागला. पहिल्या खेळाला तो तिला व तिच्या मुलाना पुढच्या रांगेत बसविणार होता.

सुधेजवळ बरेच सोन्यामोत्याचे दागिने आहेत हें त्याला माहीत होते. दागिन्यात पैसा अडकवून व्याजाचे नुकसान करणें म्हणजे तोटा आहे असे तो वारंवार तिला म्हणे. तो सर्व दागिने किफायतशीर विकून, सर्व रक्कम तिला आणून देणार होता. एके दिवशी गुपचुपीने तिने त्याला दागिने दिले. त्यानी ते विकले व नाटकाला लागणारें सामान खरेदी केले !

संध्याकाळी त्याने सुरवात केली, ' बाई तुमचे दागिने उत्तम होते. सोनं पण सोन ! त्याला चागला भाव आला. मोत्यांची कधीं इतकी किंमत येत नसते ! वास्तविक मोत्यांतला पैसा पाण्यांत; पण काय त्याचें पाणी ! दुकानदार तर फारच तारीफ करीत होता मालाची. एकंदरीत किमत चागलीच आली हो ! तुम्ही आहांत खऱ्या नशीबवान. '

सुधा त्याला म्हणाली, ' आतां ही रक्कम चागली व्याजी लावा म्हणजे झाले ! '

' हो हो !...' तो मधेच म्हणाला आणि म्हणतो ' आमच्या क्लबात मोठमोठ्या शेट सावकाराचे मुलगे आहेत. असा तसा नाही आमचा क्लब !—आमचें नाटक विजयादशमीच्या मुहूर्तावर रंगभूमीवर यायचे ठरले आहे. आजच आमची रंगीत तालीम झाली. थिएटर ठरले. खरेदी झाली. मनोहर आणि विश्वनाथ आले होते माझ्याबरोबर ! मनोहर म्हणजे क्रॉफर्डमार्केटांत मोठा श्रीमंत फळवाला आहे ना ? त्याचा मुलगा. त्याच्या दहा चाळी आहेत मुंबईत ! आणि विश्वनाथ, गांजेवाल्याचा मुलगा. गांजेवाला म्हणजे असा तसा नाही. आज लाखाचा आहे असामी तो ! मनोहरच्याच पेढीवर ठेवतों तुमचे पैसे. तुमचे लोक बँकेत पैसा ठेवतात. तिथे काय व्याज मिळणार ? हे पहा, तुमचे पैसे—शेंकडा बाराच्या व्याजानें लावतो तिथें. असला विश्वास—तर ठेवा हो ! नाहीं तर बायकांच्या

व्यवहारात कुणी पडावें !—आपला कांहीं आग्रह नाहीं. उद्या बरें झालें तर कांहीं नाहीं, पण तेच कांहीं कमीजास्त झालें तर लागाल शिव्या द्यायला !'

सुधा म्हणाली,—'लावा तुम्हीं सर्व रक्कम व्याजी'. त्याला तेच हवें होतें. त्यानें दुसरे दिवशीं मनोहर सटवाजी बोळके याच्या सहीची नऊशे रुपयाची एक प्रामिसरी नोट तिच्या स्वाधीन केली व मोठ्या अभिमानानें म्हणाला,

'पहा कशी रक्कम व्याजी लावली ती. असेल हिंमत तर दहा टक्क्यानी तरी लावून दाखवा ना कुठें दुसरीकडे ? याला म्हणतात व्यवहार !'

नाटक विजयादशमीला होणार होतें. विजयादशमी गेली तरी नाटकाचा पत्ता नव्हता ! प्रोफेसर सुधेला व तिच्या मुलाना थापा देऊन झुलवीत होता. खरी गोष्ट अशी होती कीं, क्लबात त्यांची भाडणे झालीं होतीं. त्यांच्या चालल्या होत्या फौजदाऱ्या ! मुख्य आरोपी हाच होता. सुधेला हे त्याला कळवावयाचे नव्हते; पण तिच्या कानावर ही गोष्ट आलीच ! तिनें त्याची चौकशी केली तरी तो उडवाउडवी करीत होता.

'उंः त्यात काय आहे ? पोलिस केस ती ! हां–हा म्हणता करतों माडिवाळ. त्यातल्या सगळ्या विद्या आपल्याला कळतात. पहा तुम्हीं, उलट त्याच्याच हातात टाकतो बिडया की नाहीं ते !' असे म्हणून त्याने वेळ मारून नेली.

त्याचे एवढे मित्र, पण त्याला प्रसंगी कुणी उपयोगी पडत नव्हते ! जवळचे नातेवाईकहि त्याला पायरीवर उभे करीत नव्हत. तो पोलिसाच्या तावडींत आला होता. ते त्याच्याकडून पैसे उकळीत होते. एकदा असाच एका खटल्यात तो फक्त दंडावर सुटला होता. आताहि तो दंडावर सुटेल असा त्याला भरंवसा होता. त्याला पैशाची सारखी जरूरी होती. धंदा उद्योग काही नव्हता. असले लोक कधीं एक धदा करीत नसतात ! त्याची अडचण त्याने सुधेच्या कानांवर घातली. तो म्हणाला,

'बाई, मला सोडवायचें तुमच्या हातात आहे. तुमचे नातेवाईक श्रीमंत आहेत. तुमचे उपकार मी विसरणार नाही. तुम्ही मला वेळोवेळी मदत केली आहे. तशीच आणखी थोडी शेपन्नास रुपयांची मदत करा म्हणजे मी-सुटलोच समजा.'

तिला त्याची दया आली. तिनें पन्नास नाहींत, पण रुपये तीस देण्याचे कबूल केलें. तो खुश झाला व म्हणाला,

'बुरा वक्त आया–ओ बी दीन निकल जायंगा.'

तो डाकू होता. त्यानें रुपये तीस ताबडतोब घेतले व पसार झाला.

लवकरच वर्तमानपत्रांत, सुधेच्या पहाण्यात एक जाहीरात आली. ती सटवाजी दादोबा बोळके फळवाले क्राफर्ड मार्केट–यांची होती. तिनें ती संपूर्ण वाचली. ती अशी होती—

‘ माझा मुलगा मनोहर सटवाजी बोळके हा बरींच वर्षें विभक्त असून घरांत भांडण करून पळून गेला आहे. त्यानें नादान व बदफैली लोकांच्या नादाला लागून आपल्या शिरावर बराच कर्जाचा बोजा करून ठेवला आहे. त्यानें केलेल्या कोणत्याही व्यवहाराबद्दल आम्हीं बांधलेले आणि जोखीमदार नाहीत. त्यासंबंधी आमच्याकडे कोणीही पत्रव्यवहार अगर चौकशी करूं नये. ’

सुधा हें वाचून फाटून गेली. तिनें कर्माला हात लावला !

मनुष्याला चागली अद्दल घडल्याशिवाय सुविचार केव्हाही सुचत नसतो. आतां मात्र तिचे डोळे पार उघडले होते. ती मनात म्हणाली, ‘ इश्श–मी हें काय करतें ?–कुणाचा पैसा ?–कुणाला देत्यें. माझ्या नवऱ्यानें मुलाबाळाकरिता ठेवलेला पैसा असल्या नादान लोकाना देण्याचा माझा–काय अधिकार ? मी अशा रीतीनें काय म्हणून वागावें ? असल्या बदमाश लोकाना–मी काय म्हणून माझ्या पायरीवर उभे करावें ? ’

तिनें सुधाकरास चक्क सागितलें ‘ वा !–चागलं फसवलंत मला. उत्तम धंदे तुमचे ! ’ तिनें इंदुप्रकाश पुढें केला व म्हणाली,–‘ वाचा यांत काय आहे तें ! मला माहीत नव्हतं, तुम्हीं इतके बदमाष असाल तें ! हाच का तुमचा सच्चा मित्र ? जा–चला–चालते व्हा–इथून. पुन्हा तुमचं तोंड दाखवूं नका इथें. हलकट–बदमाष.’

तो खजील झाला व चमत्कारिक रीतीनें तिच्याकडे पहात, आणि आचकट-विचकट शब्द बोलत व हातवारे करीत तेथून निघून गेला.

झालेल्या नुकसानीमुळें ती तर हळहळत होतीच; पण त्याचा एक चागला परिणाम झाला कीं, ती पुन्हा असल्या फंदात न पडतां मुलाच्या हिताच्या दृष्टीनें आपल्या घराचा व्यवहार जागरूकपणें पाहूं लागली.

---

# होल्डर थीफ

कॉंग्रेस ही संस्था फार जोरांत होती. कॉंग्रेसनें अधिकारग्रहण करावयाचें नाहीं असे ठरविले होतें !

सरकारनेंही तेवढ्याच दमांत कूपर मंत्रीमंडळ बनवून कारभार चालू केला होता. सहा महिन्यापेक्षां जास्त हें मंत्रीमंडळ चालणार नव्हतें ! त्या मुदतींत कॉंग्रेसनें फेरविचार करून काहीं अटीवर अधिकारग्रहण करावे असें ठरविलें. सरकारने त्याला मान्यता दिली. सर्व सूत्रें कॉंग्रेसच्या हातीं आलीं. हिंदुस्थानात त्यावेळीं एकदम पालट झाली होती. केवळ लोकाश्रयावर चालणाऱ्या संस्थांना थोडा आशेचा किरण दिसूं लागला होता म्हणून त्या आपआपली प्रगती करून घेण्यास ही योग्य संधि आहे असें समजून, नेटानें काम करण्यास पुढें सरसावत होत्या. मुंबईतील मुख्य प्रधान खेर, याची तर, निरनिराळ्या समारंभांना हजर रहाण्याची मोठीच गर्दी उडून गेली होती !

बेकारी व व्यापारमंदी या दुहेरी केचींत सांपडलेली—धनिक व दानशूर म्हणून महशूर असलेली मुंबापुरी, आर्थिक मदत भागविण्यास असमर्थ भासत होती ! ती लाटच तशी और होती. त्यातच आश्चर्याची गोष्ट म्हणजे, एक विद्यादानाची पवित्र पताका फडफडविणारी व मोठ्या मोठ्या तत्त्वाचा पुरस्कार करणारी, धार्मिक, बौद्धिक, नैतिक, शारिरीक, औद्योगिक, व सर्वांगीण शिक्षण देण्याचा टेंभा मिरविणारी अशी, धर्माभिमानी संस्था, हळू हळू विजयाचें अति उच्च शिखर गांठण्याच्या आस्थेनें प्रेरित होऊन मिळतील तितके स्वयंसेवक घेऊन, मदतीची याचना करण्याची घाई करीत होती !

प्रोफेसर चंद्रचूड हे त्या शाळेचे एक मोठे जाडजूड, उत्साही व जबाबदार अधिकारी होते. त्यांच्या हाताखालचे बरेच विद्यार्थी, कुणी वकील, कुणी डॉक्टर,

कुणी व्यापारी, कुणी दलाल अशा निरनिराळ्या क्षेत्रात, फाकलें होते. त्याची ठाव ठिकाणे शोधून त्याच्याकडून पैशाची मदत उकळण्यास, ते त्याच्या भेटी गाठी घेत होते !

उद्दिष्ट हेतू साधण्यास कमीत कमी सत्तर ऐंशी हजाराची जरुरी भासत होती त्याना ! संस्थेचे लोक कंबरा बाधून रात्रीचा दिवस करून, पैसे गोळा करण्याच्या कामात चूर झाले होते.

प्रोफेसर चंद्रचूड, त्याचा एक डॉक्टर विद्यार्थी विभाकर, याच्याबरोबर बडी बडी धेंडे शोधीत सॅंडहर्स्ट रोडनें जात होते. त्यानीं 'भिडे, केळकर आणि कंपनी क्लॉथ मर्चंटस्' अशी पाटी वाचली व डॉक्टर, प्रोफेसर साहेबांस म्हणाले,

'या कंपनीचा प्रोपरायटर मिस्टर भिडे आपलाच विद्यार्थी आहे. मोठा श्रीमंत झाला आहे तो या धंद्यात. त्यानें त्याच्या मुलीच्या स्मरणार्थ एका सूतिका-गृहाला बरीच मदत केली आहे. तो जिथें तिथें मदत म्हणून मोठ्या मोठ्या रकमा देतो. परवा श्रद्धानंद आश्रमालाही एका बड्या इसमाने त्याच्याकडून एक अशीच देणगी नेली. 'खरंच ? चला तर गाठूनच त्याला' सर साहेब म्हणाले.

'मास्तर, तुम्ही इथेंच रहा—तो दुकानात आहे का—मी पाहून येतों.'

प्रोफेसर साहेबानीं मान्यता दिली. डॉक्टर मजकूर त्याच्या दुकानात शिरले. भिडे दुकानांत होते. गिऱ्हाईकाची बरीच गर्दी होती. डॉक्टर त्याचा बालपणींचा सहाध्यायी होता. त्यानीं त्याला ओळखले व मोठ्या आनंदानें त्याचे स्वागत केले. रीतसर विचारपूस झाल्यावर डॉक्टरनें सुरवात केली,

'तुला भेटायला एक इसम यायचे आहेत; आमच्या एका संस्थेला मदत हवी आहे. केव्हा तुला फावेल ते साग.'

'आता तर मला मुळींच वेळ नाहीं. आम्ही लोक रात्रीं दहानंतर मोकळे व्हायचे ! तुम्हाला भेटायचेच असलें तर, त्याना माझ्या घरी पेडररोडवर रात्रीं घेऊन ये.'

'चल तर आपण भेटीची वेळ ठरवूं या. तुला आज रात्रीं आम्हीं आलों तर बनेल काय ?' मोठ्या ऐटीत डॉक्टरनें इंग्रजींत म्हटले.

भिडे, 'वेल' ( बरं ) म्हणाले.

डॉक्टर 'चिअर यू' ( अच्छा ) म्हणून हस्तादोलन करून, डोकीवर हॅट चढवून व सिगारेटचा भपकारा सोडीत चालते झाले.

बरोबर दहाच्या ठोक्याला भिडे यानीं दुकान बंद केलें व मोटरमध्ये बसून ते आपल्या घरी आले.

त्याच्या मोटारी मागोमाग एक टॅक्सी उभी राहिली व तीतून दोन व्यक्ती उतरल्या ! सकाळचीच ती दुक्कल असावी असा तर्क करून भिडे मनातच्च काहीं पुटपुटले व त्यांना पाहिले न पाहिले करून ते तडक आपल्या बंगल्यांत शिरले.

प्रोफेसर व डॉक्टर घराचीं नावे पहात मंदगतीनें बोलत बोलत येत होते. त्यानीं भिडे याचें 'उद्यम मंदीर' म्हणून पाटी वाचली व त्यात प्रवेश केला. त्यानीं तेथील दरवाज्याजवळची कॉलबेल दाबली.

घंटी वाजताच, गड्याने दरवाजा उघडला व 'तुम्हास्नी कोण होवं ?' म्हणून चाकशी केली.

'शेट आहेत काय ?'

'हायत निगुतच आले हायत, वाईच हथ बसा.'

ते दोघे भिंतीलगतच्या एका सोफ्यावर बसले. इतक्यात माधवराव भिडे, स्वच्छ मलमलचा सदरा घालून आले.—पाहुण्यास नमस्कार केला व आपण एका चेअरवर बसून म्हणाले,

'कसें काय, आत्ताच आलात ना ? काय म्हणते शाळा ?'

'काय म्हणणार शाळा ? चालली आहे आपली. परवां आमच्या व्यवस्थापक मंडळीची एक सभा झाली. अध्यक्ष म्हणाले,'

'आपण आपला फंड वाढवला तर आपणाला पुष्कळ सुधारणा करतां येईल.' 'तेव्हापासून आमचे मंडळ फंड गोळा करण्याच्या मागें जारीने लागलें आहे. आपली शाळा स्वावलंबी करण्याकरिता कमीत कमी सत्तर ऐंशी हजाराची जरूरी आहे; म्हणून तुमची भेट घेण्याकरिता सकाळी आम्ही आलों होतो.'

'दुकानात कुठला वेळ आम्हाला बोलायला, ? हजार तऱ्हेचे लोक येतात तिथे ! चागलेच लक्ष ठेवावें लागत आम्हाला !'

'तुमचें दुकानही उत्तम चाललें आहे. लोकाचा विश्वास व मालाची खात्री असल्याशिवाय चागले गिऱ्हाईक मिळत नाही.'

'तुमची भरभराट पाहिली कीं, आम्हाला आनंद होतो व कौतुक वाटते.'

भिडे हंसले· पण त्यानी केलेली ती त्याची स्तुति त्याना आवडली नसल्याचें त्यांच्या चेहेऱ्यावर स्पष्ट दिसून आलें ! ते लगेच म्हणाले,

' तुम्हीं मदतीची अपेक्षा करून आलां खरे; पण प्रथम मला तुमच्या शाळेचा कसा अनुभव आहे हें सांगितल्या खेरीज राहवत नाहीं. अगदीं पहिल्या इयत्तेपासूनच्या सर्व गोष्टी मला आठवत आहेत. माझे मराठी पांचव्या इयत्तेपर्यंतचें शिक्षण खेड्यात, माझ्या वडिलाच्या देखरेखीखालीं झाले होतें. वर्गात जास्तींत जास्त, म्हणजे पंधरा सोळा विद्यार्थी असत. वर्गात पहिला दुसरा नंबर असे माझा. पुढें मला इंग्रजी शिकण्याकरितां माझ्या मामानीं त्यांच्या बिऱ्हाडीं आणलें. त्यांचा उद्देश मला घरींच एका वर्षांत तीन इयत्ता शिकवून शाळेंत घालण्याचा होता. ते पोस्ट ऑफिसांत नोकरी करीत. बारा बारा तास नोकरी केल्यावर रात्रीं ते मला अभ्यासाला बसवीत. ते स्वतः बुद्धीनें चलाख होते. मला तितक्या डिग्रीची बुद्धि नव्हती. मला झटपट नियम समजत नव्हते म्हणून ते संतापत व त्यांना मला शिकविण्याचा कंटाळा येई. अपेक्षेप्रमाणे मज-कडून शिक्षण होणार नाहीं अशी समजूत करून घेऊन ते निराश झाले. माझाही उत्साह खचला. अखेर त्यांनीं मला इंग्रजी शाळेंत पाठविण्याचें ठरविलें. त्याना मला दुसऱ्या इयत्तेत बसवावयाचें होतें. प्रथम ते ज्या शाळेत शिकले, त्याच मिशन स्कूलमध्ये मला पाठविणार होते. मी त्याप्रमाणे शाळेत गेलो; पण तेथील मास्तर मला दुसऱ्या इयत्तेत घेईनात. मी परत आलो. मला नंतर कुठच्या शाळेत पाठवावा हा त्याना मोठा विचार पडला !

आमच्या चाळीत त्याच वर्षी—त्याच्या पहाण्यांतला एक विद्यार्थी तुमच्या शाळेतून पास झाला होता. त्याचें नाव घेऊन ते म्हणाले,

' त्या शाळेंत तूं जातोस का ? तिथें तुला ते दुसऱ्या इयत्तेंतही बसवितील. ती शाळा काही वाईट नाहीं. आम्हीं मिशन स्कूलमध्ये शिकलों. तूं इथे शीक. ती शाळा धार्मिक शिक्षण देते. चागली आहे शाळा ती ! मुलगा शिकणारा असला म्हणजे तो कुठेंही शिकतो. शाळा वाईट नसते. भिकार शाळेंतूनही मुलें पास होत नाहींत का ? '

मी लहान, मला काय समजत होतें तेव्हा ? मला त्यांनीं त्या विद्यार्थ्यांच्या मार्फत —त्या शाळेंत घातला. तेथेंही मला पहिलींतच घेतला ! एकेका वर्गात ५०—६० विद्यार्थी असत तिथें ! त्यांत माझा नंबर, दहा एक मुलात असे. नोकरी करून अभ्यास करणाऱ्या मास्तराचाच बहुतेक या शाळेंत भरणा असतो ! ते

एक दोन वर्षांच्या करारानें तिथें नोकरी करीत असतात. त्यांचे विद्यार्थ्यांकडे लक्ष कसें राहणार ?

दुसऱ्या इयत्तेंत आम्हांला असलेले मास्तर नेहमीं आजारी असत. सहा महिन्यात जास्तींत जास्त ते चार वेळां आम्हांला शिकवूं शकले असतील ! वर्गात ताप येत असे त्यांना. ते स्वस्थ बसून असत. पुष्कळ वेळां ते हजेरी लावूनच घरी जात. परीक्षेच्या वेळेला मुलानीं ठरलेले अभ्यास पुरे झाले नाहींत म्हणून तक्रार केली. तेव्हां प्रिन्सिपॉलसाहेबांनीं मोकळे असलेले मास्तर आमच्या वर्गावर पाठवून आमचा नेमलेला अभ्यास जेमतेम वाचून टाकला ! सागा आतां कीं, ज्या गरीब मुलाना घरीं कुणी शिकवीत नव्हतें अशा मुलाची काय वाट ? माझीच गोष्ट पहा ना ? माझे मामा, चेंबर ऑफ कॉमर्सची नोकरी संभाळून अभ्यास करीत होते. त्यांना माझ्यामागें डोकेफोड करायला मुळींच वेळ नसे. त्यावेळची पोस्टाची नोकरी म्हणजे सक्तमजुरीच होती ती ! नोकरी करून ते रोज कंटाळून व दगदगून येत. त्यांना त्रास अगदीं सोसत नसे. त्यात पगार कमी, खर्च वाढता, त्याचें व माझें शिक्षण चाललेलें अशा हजार विवंचना त्याच्या मागें ! बरें शाळेंत तरी परिस्थिती नीट असावी ? ती ही नाहीं. नुकतेच प्रवेश परीक्षा उत्तीर्ण झालेले, पोरसवदा मास्तर, मास्तरकीचा अधिकार मिळाल्यावर ते विद्यार्थ्यांबरोबर कसे वागतात, हे कधीं कुणीं पाहिलें होतें का ?

आम्हीं रोज बहुतेक शाळा भरायच्या अगोदर अंगणात खेळत असूं. खेळतां खेळता एके दिवशीं कुणा मुलाच्या खिशांतून एक होल्डर पडला. त्या होल्डरकडे माझी व दुसऱ्या एका विद्यार्थ्याची नजर गेली. आम्हीं दोघानींही धावून तो लवकर उचलण्याचा प्रयत्न केला. दुर्दैवानें तो माझ्या हातीं आला. मी तो खिशांत ठेवला; पण लेखणी ती ! तिचा प्रभाव चाखायला लावल्याशिवाय थोडीच राहणार ! शाळा भरली. आमचे वर्गमास्तर पहिल्या दोन तासांनंतर आले. त्यांना मुलांची हजेरी घ्यावयाची होती. मॉनिटरला होल्डर मिळत नव्हता ! तो कुठें गहाळ झाला होता.

‘ होल्डर चोरीस गेला ’—त्यानें मास्तरपाशीं फिर्याद केली !

ज्या मुलाला होल्डर मिळाला नव्हता त्यानें ‘ मास्तर, होल्डर भिडेजवळ आहे’ अशी बातमी दिली.

‘ नाहीं मास्तर—मला तो सांपडला आहे ’ असें मी म्हटलें.

मास्तरनें मला एकदम दरडावून खुर्चीजवळ बोलावून घेतलें व तो होल्डर पाहयला मागितला.

मास्तर म्हणजे नुसते मास्तर नव्हते ! ते वकीलीचा अभ्यास करीत होते. सर्वत्र वकीली व जजशीप दिसत होती त्यांना. त्यांच्या नजरेसमोर पोलिस खातीं, पोलिस कोर्टस्, स्मॉल कॉजीस् कोर्टस, हायकोर्टस् दिसत होतीं. त्याना परीक्षा पास होऊन वकीली करायची होती. त्याना आपल्या वकीलीचें ज्ञान दाखविण्याची ती एक अमुल्य संधि साधावयाची होती.

‘ मी रोज वापरतों तोच हा होल्डर ’—त्यांनीं आपलें मत जाहीर केलें !

आतां, मी त्याच्या पुढें चोरी केलेला एक गुन्हेगार होतों ! गुन्ह्याची चौकशी करून मला शिक्षा देणें त्याचे पवित्र कर्तव्य होतें ! मास्तर ते ! वर्ग मॉनिटरची—ती फिर्याद, मला पकडणाऱ्या विद्यार्थ्याचा पुरावा, दुय्यम मॉनिटरचा दुजोरा, स्वतः न्यायमूर्ती मास्तरची—मालाची ओळख, मग गुन्हा शाबीत व्हायला काय अवकाश ?

मी निक्षून सांगितलें,

‘ होल्डर सापडला आहे. चोरला नाहीं. ’

‘ पुरावा ? ’

मी पुरावा कुणाचा आणणार ? इतका भरभक्कम पुरावा माझ्या विरुद्ध असल्यावर माझें म्हणणें खरें कोण मानणार ? मी गुन्हेगार ठरलोंच ! पण गुन्हा त्यांना माझ्याकडून कबूल करवून घ्यावयाचा होता. वदवून घ्यावयाचा होता. त्यांच्या रागाचा पारा चढत होता. ते मला दरडावीत होते, दम देत होते.

‘ खरं बोल. चोरलास कीं नाहीं ? ’

‘ खरं बोलला नाहीस तर तुला प्रिन्सिपॉलकडे नेईन. शाळेंतून ‘ वाईट वर्तणूक ’ म्हणून शेरा देऊन काढून टाकीन. ’ काय तें बोल, उगीच माझा वेळ घालवूं नकोस.

पोर मी, घाबरून गेलों. मला काय करावें तें सुचत नव्हतें ! मला दरदरून घाम सुटला. मी कांपत होतों. मी गप्प राहिल्यामुळें छडीचे तडाखे माझ्या अंगावर आडवे तिडवे बसत होते. माझी केविलवाणी स्थिति झाली होती.

मी माराच्या भीतीनें व घरच्या धाकानें चोरी कबूल केली !

मॉनीटरची फत्ते झाली !

' होल्डर थीफ ' म्हणून मुलांनीं एकच गिल्ला केला ! मास्तरनें ' सायलेन्स ' म्हणून वर्गात शांतता प्रस्थापित केली.

मास्तर आपलें वकीलीचें ज्ञान दाखवीत होते. ते म्हणाले,

' ही गोष्ट साधी नाहीं. कायद्यात दोन पैशाच्या शेणी चोरल्या तरी ती चोरी होते. टाकाची किंमत दोन पैसेच आहे. भिडेनें टाकाची चोरी करून भयंकर गुन्हा केला आहे. ऐवज शाळेचा आहे. चोरी, दुय्यम मॉनीटर, चोरीचा पत्ता लावून देणारा विद्यार्थी, यांच्या साक्षी वरून सिद्ध झाली आहे.

गुन्हेगाराने गुन्हा कबूल केला आहे. याला शिक्षा द्यावयाची आहे.

मास्तरचें भाषण ऐकून मी दयेची याचना करीत होतों. असहाय्यतेनें हात जोडीत होतों. रडत होतों. म्हणत होतों,

' मास्तर, सोडा मला—मी चोरी करणार नाहीं ' पण छे ! मास्तर म्हणत होते,

' गुन्हा शाबीत झाल्यावर ?—सोडा ! न्यायाधिशास कायद्यानेंही गुन्हेगार सोडतां येत नाहीं. '

मास्तरानें दात विचकीत मॉनीटरजवळ एक चतुर्थांश कोरा कागद मागून घेतला. त्याची चौपट घडी केली. त्यावर ' Holder Thief ' अशीं अक्षरें लिहिलीं व ती चिट्ठी माझ्या टोपी खालीं कपाळावर अडकवून मला दरवाज्यांत उभा करायची तयारी केली !

किती नीच व लज्जास्पद शिक्षा होती ती !

शाळा सुटण्याची वेळ झाली होती. हजार दीड हजार विद्यार्थी त्या वर्गावरूनच बाहेर पडणार होते. त्याच्या समोर माझी अब्रू जाणार होती म्हणून, मी रडत होतों. पण मास्तरला काय त्याचें ? त्यांचा खेळ होत होता. ते मजजवळ आले. त्यांनीं सक्तीने माझी टोपी काढली. मी डोकीवर हात धरले म्हणून त्यांनी छमाछम माझ्या मनगटावर छड्या ओढल्या. टोपीखालीं ती चिट्ठी सर्वांस स्पष्ट दिसेल अशी अडकवली व निर्दयपणें मला ढकलीत दरवाज्याबाहेर उभे केलें !

मधली सुट्टी झाली. सर्व विद्यार्थी माझ्या डोक्यावरची चिट्ठी वाचीत होते, हंसत होते. पुष्कळ विद्यार्थी मास्तर पुढें काय करतात हें पाहण्याकरितां घोळक्यानें जमा झाले होते. कुणीं ' चोर—चोर ' म्हणून हिणवीत होते मला. सर्व शाळा सुटल्यावर अखेर मास्तरनें मला मुक्त केलें ! मी डोळे पुशीत पळत सुटलों. सर्व मुलें ' चोर—होल्डर थीफ ' ओरडत माझ्या मागें धावत होतीं.

इतका माझा छळ झाला तरी मला त्याबद्दल घरीं कांहींच कळवितां आलें नाहीं. घरच्या धाकाला व लोकांतील अपमानाला भीत होतों मीं ! घरीं देखील, मी चोरी कबूल केली ही गोष्ट मास्तरनें सांगितल्यावर माझें म्हणणें खरें कोण मानणार ?

माझे वडील प्रेमळ खरे, पण घरांत त्यांचा धाक जबर होता. माझ्या मुंजींतील गोष्ट. मुंजीकरतां मुगभाटांत एकमजली लहानसें एक घर घेतलें होतें आम्हीं. पुष्कळ नातेवाईक माझ्या मुंजीला आले होते. मी नऊ वर्षांचा असेन त्यावेळी ! वरच्या मजल्यावर एक बिऱ्हाड होतें. तिथें सुमारें बारा वर्षांचा एक मुलगा होता. आमच्या घरीं केळींचें पिवळें जर्द झालेलें एक लोंगर आणलें होतें. त्या मुलाला त्यांतील केळीं खावीशीं वाटलीं त्यानें मला तीं आणण्यांस सांगितलें. मी खुशाल एक एक केळें तोडून त्याला नेऊन देत होतों ! माझ्या वडिलांचें लक्ष त्याकडे गेलें. मी केळीं चोरतों आहे अशी त्यांची समजूत झाली. ते ओरडले. त्यांचा आवाज ऐकल्यावर मी तीं केळीं फेकून दिलीं व पळूं लागलों ! तेही माझ्या मागें धावले. त्यांनीं मला पकडलें व जोरानें दोन रट्टे दिले. माझा गाल धरला. मी टाकलेलें केळें त्यानीं घेतलें व तें जमलेल्या सर्व मंडळींस मला वगळून शिक्षा म्हणून वाटलें ! मामा तिथें होते. त्यांना वाईट वाटलें. मला त्यांनीं कडेवर घेतलें. आपल्या धोतराच्या शेवानें माझे डोळे पुसले व पदरच्या पैशाचीं केळीं आणविलीं व त्यातून मला केळें खायला दिलें व दयाळूपणानें व प्रेमानें उपदेशाच्या चार गोष्टी सांगितल्या. अशा शिस्तींत वाढलेला मी—ही गोष्ट घरीं कशी सांगावी ? तशात, सहानुभूतीनें विचार करणारे माझे मामा तिथें नव्हते ! अन् मामा जरी असते तरी, मामीला ही गोष्ट कळल्यावर माझी बदनामी करायला—तेवढेच तिला पुरें झालें नसतें का !

मला गप्प बसण्यापलीकडे गत्यंतर नव्हतें. मी अब्रूला भीत होतों ! शाळेंत पोरें मला सतावीत होतीं. मला तक्रार करतां येत नव्हती. कारण, शिक्षा झालेल्या गुन्हेगाराची तक्रार—तिला कोण महत्त्व देणार ! विनाकारण गुन्ह्यापाठीं गुन्हे मात्र घडावयाचे ! मी अब्रूला भीत होतों व माझी अब्रू तर जात होती सारखी. मला नको ती शाळा, नको तो अभ्यास असें होऊन गेलें होतें ! अभ्यासावरचें माझें चित्त उडालें. माझा नंबर खालीं खालीं जात होता. महिन्याचा शेवटचा दिवस म्हणजे, फांसावर चढण्याचाच दिवस तो ! त्या दिवशीं शेजाऱ्यापाजाऱ्या

समक्ष, आल्या गेल्या समक्ष, पुरी पुरी झडती व्हायची, षोडशोपचारें पूजा व्हायची माझी ! मी कसेबसे चवथीपर्यंत तुमच्याच शाळेंत दिवस काढले. पुढें मी नापास झालों. मला मामानीं त्या शाळेंतून काढलें. व ते ज्या शाळेंत शिकले होते त्याच मिशन स्कूलमध्यें घातलें !

माझे अभ्यास बरेच मागें होते. पोराचा छळ, माझ्या मागचा सुटला होता. यापुढें झटून अभ्यास केला पाहिजे ही जाणीव झाली होती मला व मी मन लावून अभ्यास करूं लागलों होतों. तेथले परधर्मीय मास्तर; पण माझा उत्साह व मेहनत पाहून त्यानीं माझे मागचे अभ्यास करून घेण्याची मन लावून तसदी घेतली. रोज आपल्या घरीं मला बोलावून त्यांनीं माझ्या अडचणी समजावून दिल्या. मी सर्व विषय सुधारण्याचा छाती फोडून प्रयत्न केला. मी प्रिलिमिनरींत पास झालों; पण माझी बॉर्डर केस असल्यामुळे परीक्षेंत मला यश लाभलें नाहीं !

सुदैवानें माझी स्थिति सुधारली; पण ज्या शाळेंत पक्षपात, भेद याचे चरचरीत चटके मला बसले, जिथें माझा अनन्वित छळ झाला व केवळ, माझें जन्माचें शैक्षणिक नुकसान झालें व ज्या शाळेची स्थिति, अद्यापही यत्कींचित् सुधारली नाहीं, अशा शाळेला मला मदत करावी अशी इच्छा कशी होईल ?

महाराज, रात्र फार झाली; आपणांस विनाकारण तसदी झाली याबद्दल माफ करा. मी दिलगीर आहे, भिडे हात जोडून म्हणाले व त्यानीं त्यांना चांदीच्या पेल्यांतून मसाल्याचें दूध दिलें व शोफरला हांक मारून मास्तर मजकूरास व डॉक्टर साहेबास त्याच्या घरीं पोहांचवून येण्याचा हुकूम केला !



# न्याय ?

बापुरावानीं आपल्या नोकरीचे खडतर दिवस लोटून फंडाचे चार हजार रुपये घेतले होते. इतकी मोठी रक्कम त्यांना उभ्या आयुष्यात दिसली नव्हती ! त्यांचें सबंध आयुष्य अगदीं काटेकोरपणांत गेलें होतें. दर महिन्याला एखाददुसरें बील मागें ठेवल्याशिवाय त्यांच्या खर्चाची तोंडमिळवणी त्याना केव्हाच करता आली नाहीं. पगार मोजका, वाढ अशी क्वचितच झालेली; पण तेवढया अवधींत खर्च मात्र बेसुमार वाढून राहिला होता त्याचा ! त्याला मात्र त्याना आळा घालतां आला नाहीं. प्रसंगहि तितकेच हात धुवून मागे लागले होते त्याच्या. त्यांना दैव अनुकूल नव्हतें, तरीपण त्यानीं त्या सर्वांना तोंड देऊन आपल्या आयुष्याची कालक्रमणा सुखासमाधानात व अब्रूनें चालविली होती. मैत्री बहुतेक समसमानाची असावयाची ! पण प्रत्येक गोष्ट नियमाबरहुकूम घडतेच असें कुठें असतें ? कधी कधी कांहीं गोष्टी अपवादांत मोडत असतात. बापूचीहि गोष्ट तशीच अपवादात मोडत होती. त्याचे सुखात्मे नांवाचे एक बालपणींचे स्नेही होते. वयाने बापुरावांइतकेच म्हणजे पन्नास पंचावन्नाच्या घरांत होते ते. त्याची शरीरयष्टी धिप्पाड व साधारण स्थूल होती. डोकीस टक्कल पडले होतें त्यांच्या. बापुराव वयाच्या अठरा वर्षांपासून कारकुनी करीत होते व सुखात्मे एका किराणामालाच्या दुकानांत दुकानदारी करीत होते. हळुहळू त्यानीं दुकानांत आपला चार आणे भाग ठेवला. पुढें अर्धी भागिदारी केली. धंद्यात दोन पैसे मिळूं लागले व एक काळ असा आला कीं, ते सबंध दुकानाचे मालक होऊन बसले !

बापूराव गरीब कारकून--कसा बसा संसार चालवीत होता. दोघाच्या दिशा भिन्न; पण बहुतेक रोज ते एकमेकांस भेटल्याशिवाय राहिले नाहींत. एकमेकांची गुपितें एकमेकास माहीत. सुखात्म्याचीं बरींच वर्षें भरभराटींत गेलीं होतीं. त्यांनीं

आपला व्याप आटोक्याबाहेर वाढविला होता. उधारी बेसुमार वाढली होती. बापुरावाची नोकरी पुरी होऊन त्यांनीं फंड घेतला होता. फंड हातीं आल्यावर बापुरावास कांहीं सुचत नव्हतें. त्यांना वाटत होतें आपण सुखात्मेच्या पेढीवर पैसे व्याजीं लावावे कीं, बॅंकेची सर्टीफिकीटें घ्यावीं की, आपली रक्कम सरळ पोष्टांत ठेवावी. त्यांना नक्की असें कांहींच ठरविता आलें नाहीं. या बाबतींत त्यांनीं सुखात्मेचा सल्ला घेतला.

' फंड तर आला, पण त्याचें काय करावें हें कळत नाहीं बुवा आपणाला ' ते सुखात्म्यास म्हणाले.

सुखात्म्यांनाहि मोठा प्रश्नच पडला. ते म्हणाले,

' घेतलास फंड, सुटलास दगदगींतून एकदा ! '

' किती आला फंड ? '

' आला चार हजार '

' बघ हो टाकशील खर्च करून आणि पडशील पंचाइतींत ! आहे कीरे तुला आतां खर्च ! मुलींचीं लग्नें, मुलाची मुंज, माझें ठीक कीं नाहीं ? आहे का कांहीं यातायात ही, तुझें संसारचित्र पाहिलें कीं, मला वाटतें मी फार सुखी. '

' हो तुला आपलें एकच दुःख. माझ्या पाठीमागें हजार विवंचना. बरें, तें राहूं दे. काय करूं पैशाचें सागना ? म्हटलें, तूं व्यापारी–घ्यावा तुझा सल्ला. रात्रंदिवस लोळतो आहेस पैशांत तूं, सांगशील बरोबर, हातात पैसे असले कीं जातील खर्च होऊन.'

' हो ते खरं आहे. पैसा हातात असला कीं, त्याला वाटा फार. तो कुठें तरी अडकवला पाहिजे. सागितलें असतें तुला कीं, ठेव माझ्या पेढीवर–पण नको. माझें फार येणें झाले आहे. व्यापारी पैशाकरिता थांबत नाहींत. माल तर पुरा पाडावा लागतो सर्व ! धंद्यात मुळी कसा तो राम नाहीं राहिला आतां. अब्रूसाठीं चालवावा लागतो धंदा. पहाना या लश्यात पूर्वी अवघें एक दुकान होतें. आज शेंकडो झालीं आहेत दुकानें ! नोकऱ्या मिळत नाहींत, जो उठला तो लागला आहे तागडें घ्यायला ! त्यानें व्यापाराची अगदीं घाण होऊन गेली आहे. गिऱ्हाईक तरी काय ? थकवतात बाकी आणि पैशाची मागणी केली कीं, जातात दुसरीकडे. तुला पैसे लागले की मोजावे लागतील ताबडतोब मला. असले हातांत तर ठीक; नाहीं तर तुला व्हावयाची रखड. तूं ठेव आपला पोष्टात कसा. '

' नोकरी नाहीं आतां, पण स्वस्थ बैसूं नको हो घरीं. कांहीं तरी काम कर नाहीं तर पहा, पडशील आजारी. आहे काय तुझ्यांत ? आहेस जन्मापासून तसा आहेस बारीक.' हें ऐकून बापूराव मनापासून याच वेळीं काय तो हंसला. मित्राचा सल्ला त्याला पटला. त्यांनीं पोष्टांत रक्कम ठेविली.

थोडे महिने गेल्यानंतर सुखात्म्यांना पैशांची जरूर लागली. त्याना व्यापाऱ्यांचा तगादा लागला होता. त्यांनीं बापूजवळ पैशाची मागणी केली. तो म्हणाला,

' बापू, तुला तूर्त तीन वर्षें पैशाची जरूरी दिसत नाहीं. मला थोडी रक्कम हवी आहे. तूर्त दोन हजार रुपये दे. मी तुला रीतसर प्रॉमिसरी देतों...दुसरा व्याज घेणार, तूंच घेईनास परता तें ! '

बापूंनीं पाहिलें, पोष्टापेक्षां व्याज जास्त मिळेल व मित्राची गरज भागून त्याच्यावर उपकार केल्यासारखेंहि होईल. त्यांनीं आपले पैसे सुखात्म्यास दिले. धंद्यांत सारखी बुड येत होती. व्यापार सुधारणेचीं चिन्हें दिसत नव्हतीं. परिस्थिती दिवसेंदिवस बिकट होत चालली होती. सुखात्मेचा पैसा दुसरीकडे अटकला होता तोही हातीं येत नव्हता. कोर्ट कचेऱ्या कराव्या तर वेळ नाहीं आणि खर्चाला पैसाही नाहीं अशा अडचणींत बिचारा सुखात्मे सांपडला होता. एका परगांवच्या व्यापाऱ्यानें त्याच्या नांवाची एक हजाराची हुंडी दिली होती. ती त्याला ताबडतोब द्यावयाची होती. त्याचीही तेवढीच रक्कम एक दोन दिवसांत येणार होती म्हणून त्यानीं बापुरावाजवळ आणखी एक हजार, चार दिवसाच्या बोलीनें घेतले. बापूचा मित्रावर पुरा भरंवसा होता. त्याला त्यांत कांहीं दगलबाजी वाटली नाहीं. बोलल्याप्रमाणें त्यानेंहि बापूची रक्कम चेक देऊन परत केली. त्यांत त्याचा कोणताहि उद्देश नव्हता. देवघेवीचा हा आधुनिक सुधारणेचा सुलभ मार्ग होता. त्यानें ती रक्कम बँकेतून उचलली ! पुढें घडणाऱ्या गोष्टी अगोदर कळत असत्या तर, कोर्ट, कचेऱ्या सर्व ओस पडल्या असत्या आणि दैव ही काय चीज आहे हेंही कुणास कळलें नसतें. होणारें आपोआप घडत असतें म्हणतात, तें खोटें नाहीं. याच वेळीं बिचारा सुखात्मे कोणत्या तरी आजारानें कालवश झाला ! सर्व व्यवहार त्याच्या मुनीमाकडे गेला. मुनीमास शेटजींचें अखत्यारपत्र होतेंच. तो धूर्त होता. त्याचा कृष्णवर्ण त्याच्या सर्व कृत्यांस शोभून दिसत होता. बुटका होता तो. बुटके लोक मोठे घातकी असतात म्हणे. त्यामें प्रत्येक बाबतींत अडथळे

उत्पन्न केले व रुपयांतील चार आणे देऊन जेवढयांचा निकाल पटवून टाकतां आला तेवढा पटवून टाकला होता. कांहीं भानगडी कोर्टापर्यंतही गेल्या होत्या.

दैवाची लीला विचित्र असते ! कर्ता मनुष्य उठून गेला कीं, त्याच्या मागें नसती कुलंगडीं उभीं राहतात–नसत्या लोकास महत्त्व प्राप्त होतें व असल्या लोकांच्या अधमपणामुळें गरीब गुरीब, अनाथ बाया, पोरकी पोरें भरडून निघतात–नुकसानींत येतात असा जगाचा चमत्कारीक व्यवहार दृष्टोत्पत्तीस येत असतो !

बापूरावाचें दुर्दैव पुरें ओढवलें होतें. त्यांची इह लोकची यात्रा संपली ! मुलें पोरकीं झालीं ! त्याचा आधार तुटला. परमेश्वर कुणाला टाकीत नसतो, मुलाचा मामा चांगला कर्ता सवरता होता. तो प्रसंगाच्या वेळीं धावून आला. त्यानीं सव मदत केली. बापूंचा व्यवहार, सुखात्म्यांखेरीज प्रत्यक्ष त्यांच्या बायकोसही माहीत नव्हता ! ते कधींही घरांत कांहीं बोलत नसत. कागदपत्रें शोधतां शोधतां पेटींत सुखात्म्यांची प्रामिसरी नोट त्याच्या हातीं आली. ती मुदतींत होती. ती पाहून तो हंसला, त्याला धीर आला. तो म्हणाला,

‘ मुलांचा वाली परमेश्वर आहे खरा. पैसे मिळतील.’ ही गोष्ट त्यानें आपल्या बहिणीस सांगितली. ती म्हणाली, ‘ बाबा हपीसचा फंड असेल तो. एक दिडकी त्यातली खर्च नाहीं केलीन ! जन्मभर कपडे असे तसेच वापरले. सोनीनं बांगड्यासाठीं जीव जीव काढला, पोलक्याला रेशमी कापड मागितलं पण ’–पुढें तिच्याच्यानें मुळींच बोलवलं नाहीं. ती पदरानें डोळे पुसूं लागली. मामाचेही डोळे पाण्यानें भरले. तो म्हणाला, ‘ सुखात्मे मरून इतके महिने झाले तरी त्याच्या मुनीमानें घैसासनें दाद दिली नाहीं.’ पक्का वस्ताद दिसतो तो.

‘ त्यानीं कितीकांना बुडवलं म्हणतात. परवां त्या पार्वती काकू हात चोळून शंख करीत होत्या त्याच्या नांवांनीं ! तो अशी दाद नाहीं लागूं द्यायचा. तूं कागद त्याच्या हातीं जाऊं देऊं नको हो ! फक्त जाऊन पहा काय म्हणतो तें ! ’ बापूंच्या पत्नी भावास म्हणाल्या.

‘ पक्कें काम आहे हें. तो काय फसवतो ! आले पाहिजेत फसवायला त्याचे ! माझ्याशीं आहे गांठ, पैन पै वसूल करीन तरच मी नांवाचा ’ असें म्हणून पोषाख करून तो सुखात्मेच्या दुकानांत गेला. घैसास चोपड्यांत डोकें खुपसून बसला होता. त्याला पाहिल्या बरोबर तो चपापला तरी पण, तें कांहीं न दाखवितां त्यानें सफाईत बाजूला होऊन आपल्या शेजारीं जागा करून दिली

व म्हणाला ‘ कांहो तुमच्या मेहुण्याना काय झालें ? इसम चागलें होते. रोज यायचे आमच्या दुकानीं. आमच्या शेटची व त्यांची चागली दोस्ती होती.

‘ हो होती खरी, मी कांहीं कामाकरितां आलों आहें. ’ बहुतेक पैसे पाहिजे असतील असें समजून घैसासनें आधींच रडकथा सुरू केली.

‘ काय करावें वसुली होत नाहीं. दहा हजार रुपयाची बाकी निघते तरी अजून किती निघेल कुणास ठाऊक ! सर्व खातीं तपासून झालीं नाहींत अद्याप.

‘ निघत असेल; पण आमचे पैसे आम्हांला हवेत आता ’ असें मामा म्हणाले.

घैसास आश्चर्यानें म्हणाले, ‘ आमचे पैसे ! तुमचे पैसे आमचेकडे कां ? काय तुमचा मेहुणा सावकार होता कीं नाहीं मोठा ! अहो, खायची पंचाईत. रोज येऊन बसायचा रडत शेटजवळ. ’ हे शब्द कानीं पडताच मामाच्या चेहऱ्यावर रक्ताची उसळी मारली. तो लाल झाला. त्यानें बोलण्याचा आवेग आवरला व शातपणें म्हणाला,

‘ काय म्हणता ! माझा मेहुणा गरीब कबूल, पण तुमचे जमाखर्च तर पाहाल कीं नाही ? जरा घ्या तसदी आमच्यासाठीं. आमचा गरीबांचा पैसा अडकला आहे म्हणून तुमच्या सारख्यांजवळ इतकी मिनतवारीनें विनवणी करावी लागते, नाहींतर कोण येणार होतें तुमचें तोंड पाहयला इथे ? ’

‘ जरा सांभाळून बोला, जास्त बोलायचं असेल तर खुशाल रस्ता सुधारा. असेल कांहीं तर पाठवा कायदेशीर नोटीस. देऊं तिचें उत्तर ’ घैसास रागानें म्हणाले व डोकींत टोपी टाकून उठून जाऊं लागले इतक्यांत, ही बाचाबाची ऐकून सुखात्म्याचे कुटुंब दाराआड आलें व त्यानीं घैसास यास हाक मारिली व त्या जोरात म्हणाल्या ‘ होतां काहीं त्याचा व्यवहार. पहा तुम्हीं चोपडे ’ त्यांनीं चोपडे पाहिले. त्यांत बापूंचें खातें होतें. घैसास वरमून गेला; पण त्याच्या पोटांत सारखी चळवळ चालली होती. घाव कुठें घालावयाचा तें त्याला माहीत होतें. ‘ किती पैसे निघतात ’ बाईनीं चौकशी केली.

तो म्हणाला ‘ दोन हजाराची रक्कम आहे. त्यावर तीनदा सहा सहा महिन्याचें व्याज दिलें आहे शेटनीं. ’

‘ देण्यासारखे असतील पैसे तर देऊन टाका त्याना; त्याचे पैसे ठेऊं नका ’ असें बाई त्यास निक्षुन म्हणाल्या. बाईचें म्हणणें घैसास यास रुचलें नाहीं; पण त्याच्यानें त्याना कांहीं बोलता आलें नाहीं. त्यानें फक्त गुमींत मान हलवली व

म्हणाला ‘ मला काय करायचं आहे त्यांना अडवून ! तूर्त पैसे कुठें आहेत ? चार दिवसानीं पाहूं जमल्यास. ’ मामा रागानें तेथून घरीं आला व झाली हकीकत बहिणीस सांगितली.

ती म्हणाली ‘ बिचारा सुखात्मे मरून गेला पण तो सरळ मनुष्य होता. हा मेला घैसास सगळ्या गांवचा लुच्चा ! तो सरळ पैसे देणार नाहीं. तूं आपला पाहा काहीं तरी पुढचा मार्ग. पैसे आपले हातीं पडतील तेव्हां खरे ! ’

‘ हो, आता आलंच तें. त्याचा अर्थ तोच, पाहतों प्रथम नोटीस देऊन. नाहींच दिली दाद नोटीशीला तर मग आहेच दावा. प्रॉमिसरी नोटीचा दावा काहीं भानगडीचा नसतो. डिक्री सरळ व्हायाचीच ! कांहीं भानगड दिसत नाहीं. मी आपल्या दामुअण्णा परांजपेकडे जातों. झाला आहे तो वकील नुकताच आणि करतो आहे वकिली स्मालकॉजेस् कोर्टांत, त्याला विचारतों काय करायचें ते. ’

बहीण बापडी काय करणार ? तिला काय कळत होतें यात ! तिला ठाऊक होतें, अशी काहीं भानगड झाली की, आपल्यातर्फे एक वकील लागतो ! तिनें रुकार दिला. मामा तरी काय त्याला अनुभव होता थोडाच ? तोहि अननुभवीच. त्यानें, परांजपेकडून नोटीस देवविली. नोटिशीला जबाब मिळाला नाहीं. मुदतीत रीतसर दाव्याची नोंद झाली.

घैसास यास समन्स लागलें व केस सुनावणीस निघाली.

वादीचे वकील परांजपे यांनीं, प्रॉमिसरी नोट कोर्टांत हजर केली. दावा मुदतींत असल्याची कोर्टानें खात्री करून घेतली.

प्रतिवादीच्या वकिलानें देणें कबूल केलें, पण हजार रुपये वादीस पोहोंचले आहेत व फक्त एक हजार व व्याज इतकी रक्कम आमचे अशीलास कबूल आहे असें सांगितलें.

‘ प्रामिसरी नोटीवरून दोन हजार रुपये व त्यावरचें व्याज देणें निघत आहे ’ कोर्टानें आपलें मत व्यक्त केलें व ‘ तुमच्याजवळ काहीं पुरावा असल्यास हजर करा ’ असें कोर्ट प्रतिवादीच्या वकीलास म्हणालें.

प्रतिवादीच्या वकीलानें पुरावा देण्याची तयारी ठेविलीच होती त्यानें बँकेच्या मॅनेजराची साक्ष दिली !

बँकेच्या मॅनेजरनीं सुखात्म्यांच्या खातीं एक हजाराचा चेक बापूसाहेब भिडे यांच्या नांवें खर्च झाल्याची नोंद लेजरमधून दाखविली. शिरस्तेदारांनीं त्याची एक्झीबीट म्हणून नोंद करून उतारा घेतला.

हा व्यवहार दुसरा असावा व याचा या देण्याशीं कांहीं संबंध नाहीं असें न्यायाधिशास वाटलें व म्हणून त्यानीं शेवटचें व्याज किती रकमेवर जमा केलें होतें व केव्हां केलें होतें तें पाहिलें; पण दुर्दैवानें शेवटचें व्याज दोन हजारावर जमा झालें असून त्यानंतर चेकची रक्कम खर्चीं पडली होती. यावरून कांहींच स्पष्ट होत नव्हतें ! कोर्ट म्हणालें ' रक्कम दिली तर ती प्रामिसरी नोटींत कां जमा केली नाहीं ? ' असा संशय प्रदर्शित केला व त्यांनीं वादीस विचारलें ' दोघेहि हयात नाहींत वादीचा जमाखर्च तरी आहे काय ? '

वादी जमाखर्च ठेवीत नव्हता असें वादीच्या वकीलानें कोर्टास कळविलें. पुढें आलेल्या पुराव्याप्रमाणें निकाल देणें न्यायाधिशास प्राप्त होतें.' त्यानीं फक्त एक हजारांचें देणें निघतें असें प्रतिवादीस सांगितलें.

प्रतिवादीच्या वकीलानें आपल्या धंद्यास अनुसरून आपल्या अशिलाचा जेवढा जास्त फायदा करून देतां येईल तितका द्यावा या हेतूनें ते म्हणाले, ' आपल्या कुळाची सांपत्तिक स्थिति चांगली नाहीं. वसुली बरीच थकली आहे. देणें आम्हांस कबूल आहे. पण तूर्त एवढी रक्कम एकदम देतां येणार नाहीं तरी, कृपा करून थोड्या रकमेचे हप्ते दिल्यास माझ्या अशिलावर उपकार केल्यासारखे होतील.'

कोर्टानें एक हजार रुपायांची रक्कम, त्यावरचें व्याज व कोर्टाचा सर्व खर्च लक्षांत घेऊन हप्ते पाडून दिले !

मुलाचा मामा न्याय घेऊन मंद पावलानीं घरीं आला. तेव्हांः—

जगाच्या अंधःकारावर प्रकाश पाडणारा सूर्य अस्तास गेला होता. आशेचा एकच किरण बाळगून बसलेली मुलांची आई जुनेरें नेसून केसचा निकाल ऐकण्याकरितां आतूर झाली होती. घरांत समईचा प्रकाश मीण मीण करीत होता. मुलें कुणी भुकेसाठीं तर कुणीं नव्या कपड्याकरितां, आकांत करून चिमूटभर मीठ व पांढराफट्ट भात घेऊन जेवीत बसलीं होतीं !

---

# अन्याय

खंडोजी वर्षांतून मुंबई सोडून कमीतकमीं एक महिना तरी वाईस जावयाचाच ! तेथें गेल्यावर तो स्वस्थ बसे काय ? नाहीं. तेथें तो आपल्या शेतीवाडीची व्यवस्था पाही. गावात फिरून गोरगरीबाची चौकशी करी. त्याचें हृदय फार दयाळू होतें. कुणी प्रसंगात सांपडल्यास तो कोणत्या संकटांत आहे, त्याला आपल्याकडून कोणती मदत होईल ह्याचा विचार करी. तिथेंच त्यांना कांहीं धंदा लावता येण्यासारखा असला तर तो त्यांना धंद्याला लावी. तो गांवीं आला कीं, गांवच्या लोकास आनंद होई. त्याला भेटण्याकरिता त्याच्याच जातीचे लोक हौसेनें जमत. त्याचें दुकान कुंभारतुकड्यात होतें. त्याचा चाळीस वर्षांचा होता धंदा. त्याला त्याच्या धंद्याचा पूर्ण अनुभव होता. त्याच्या समोर पुष्कळांनीं इर्षेनें दुकानें घातली होतीं व अगदीं त्याच्या बरोबर स्पर्धा केली होती; पण कुणीही त्याचा पाडाव करूं शकला नव्हता !

शरीरानें सकस होता तो. त्याची उंची साधारण मध्यम, असेल पांच साडेपाच फूट. वयमानाप्रमाणें तो म्हातारा दिसे, पण त्याचा एकही दात पडला नव्हता! तो सुपारीचे मोठाले खाण्ड खाई. तालमी होता गडी तो. तो डोक्यात घाटी पागोटें घाली. त्याच्या अंगांत फक्त एक सदरा असे. सदऱ्याला चांदीच्या गोफात गुंफलेलीं बटणें असत. सदऱ्याच्या बाह्या वर चढवलेल्या असत व पुढला घेर किंचित सुरकतलेला मळकट व लालट दिसे. धोतरही मळकट असून त्यालाही लालसर झांक मारी व तें ढोंपरापर्यंत चढलेलें असे. त्याला दोंद आलें होतें. तो धोतर बेंबी खालीं नेसे व त्यावरून कमरेंतील रेशमी करगोटा ओढून मग निऱ्या खोंवी. तो तेजवान दिसे.

दरवर्षी तो एक दोन पोरकीं पोरें आपल्या दुकानीं घेऊन येई. त्याच्या

पदरीं दहा पंधरा माणसें नेहमीं खपत. तो रोज पहाटे उठे व मुखमार्जन करून भुपाळ्या म्हणूं लागे. बाकीचे लोक उठून तोंड धुवून कामाला लागत. म्हाताऱ्यास त्याचे नोकर बाबा म्हणत. झुंजुमुंजु होण्यापूर्वीच आंघोळ नळाखालीं उरकून घेई. तो चंदन उगाळून दुकानांतील देवांच्या तसबिरींना टिळे करी. त्यांना फूल चढवून निरंजनी लावी. उदबत्ती लावून तिचा धूप सर्व दुकानाला दाखवी व स्वतः कपाळाला नाम लावून मधोमध अबीराचा टिळा करी. गंधाचे बोट, दंडावर उभें ओढून दोन्ही बाजूला तें तो गळ्यावरही ओढी. नंतर सदरा पागोटें घालून तो बाजूच्या अडीच चौरस फुटीच्या भेणकापडाच्या गादीवर बसे इतक्यांत् साफ उजाडे.

खंडोजीनें आपल्या गांवच्या बऱ्याच मुलाना आणून धंदा शिकवून पोटापाण्याला लाविलें होतें.

सांवळ्या त्याच्या दुकानांत दोन तीन वर्षें राहिला होता. धंद्याची चागली माहिती होती त्याला. तो न्याहारी झाल्यावर फेरी करूं लागला होता. दोन तीन दिवस तो फेरीला गेला नव्हता. तो निजून राहिला होता. त्याचा आजार दिसून येण्यासारखा नव्हता. त्यामुळे तो ढोंग करून राहिला आहे असें गिरजाबाईस वाटलें ! दोन तीन दिवस त्या गप्प होत्या; पण काम करता करता त्या धुसपुसत व त्याच्याकडे तिरस्कारानें पहात. घरात त्याची सारखी आदळ आपट चाललेली असे. त्यांची समजूत कीं, हा टाळाटाळी करतो, त्याला काम नको आहे. बसून रेठायला हवें फक्त !

सावळ्याच्या पाठींत एकाएकीं कळ उठली होती ती गिरजाबाईस कशी दिसणार ? सावळ्याला वाटलें, पाठींत अवघडलें असेल ! त्यांनीं पाठ दाबवून घेतली; पण कळ कमी न होतां ती जास्तच वाढली !

दिवसा जो तो कामाला जाई. त्याच्याजवळ कुणी नसे. तो एकटाच पोटमाळ्यावर पडून राही. रिकामें मन सतावून सोडी त्याला. तो म्हणे कीं, आई असती तर तिनें विचारपूस केली असती. चैन पडलें नसतें तिला. तिनें उपाय केले असते, औषध देवविले असतें. मायेशिवाय कळ नाहीं, हें खोटें नाहीं. बाबाचा स्वभाव गोड; पण गिरजाबाई ढुंकूनही पहात नाहीं. त्यांना तरी काय दोष द्यावयाचा ? आजारच विलक्षण ! ताप असता तर त्याच्या हाताला लागला असता, खात्री पटली असती त्याची ! पण ही पाठींतली कळ, त्यांना कशी खरी वाटणार ?

त्यांत त्यांनां ढोंग वाटलें तर आश्चर्य कसलें ! पांढूनें रात्रीं पाठ दाबली तेंही सहन कुठें झालें त्यांना ! त्या त्याच्यावर रागावल्या, त्याच्याबरोबर बोलायच्या राहिल्या. कोण कशी मदत करणार त्याला ? सर्व त्याचे आश्रीत. त्याना कुठची स्वतंत्रता ? परक्या ठिकाणीं, परक्या घरांत, पोरक्या पोराला दिवस काढायचे ज्याच्या नशिबीं येतें त्याची स्थिती काय होते, हें प्रत्यक्ष अनुभवल्याशिवाय कळायचें नाहीं ! तीन दिवस तो निजून आहे, त्यांना वाटलें त्यानें ढोंग केले आहे. त्याला कामाचा कंटाळा आहे. वास्तविक त्याने कधीं कामाचा कंटाळा केला नव्हता ! झालें तोंपर्यंत कण्हत कुंथत तो काम करीत होता. नाहींच होत तेव्हाच झोंपला ! पण त्या काय म्हणत होत्या !

‘ बसूनशान भाकर खायला मिळते, कशापायीं करील तो काम ? ’

कसे होतील त्याला हे शब्द सहन ? तो म्हणायचा,

‘ अशा स्थितीत बी काम करूनशान दावलं असतं पर बसवतच नाहीं करूं काय ? देवा ! इठोबा, पांडुरंगा, मला ताप का नाहीं आणलास ? दुसरा आजार कां नाहीं आला. आई मेली, बाप मेला, मी का नाहीं मेलों ! कसा मी सुटेन यांच्या हातून.’ अस म्हणून तो जोरानें हुंदके देऊं लागला.

दुकानांत गिऱ्हाईकांची गर्दी होती. सावळ्या रडतो आहे. खंडोजीस समजले ! तो जोडा आपल्या बाहीवर पुशीत पुशीत आत गेला. त्यांनीं गिरजाबाईस ताबडतोब वर जाण्यास सांगितलें व तो गिऱ्हाईकाच्या मागें लागला.

गिरजाबाई जोड्याची किनार रेशमानीं शिवीत होत्या; त्या तशाच वर चढल्या. त्यांना पहाताच सावळ्यानें डोळे पुसले ! त्या म्हणाल्या,

‘ का–रे ! उगचच रडतोस ? उद्योग नाय व्हय आम्हांला ? असल दुकत तर व्हईल बरं त्येचं एवढं काय ? दुखनं कुनाला येत नाहीं व्हय ? ’

सावळ्या अधिकच खिन्न झाला व म्हणाला,

‘ रडलों व्हय मी ? कवा रडलों ?–टिपुस तरी हाय काय डोळ्यास्नी पाहवा तरी ? उगचच आपलं बोलायचं म्हणून बोलतां व्हय ? ’

गिरजाबाई थोडावेळ उभ्या राहिल्या व त्याची स्थिती पाहून म्हणाल्या.

‘ डाग दिला तर कसं व्हईल ? थांबेल नव्हका कळ ? ’ बिचाऱ्याच्या कळीवर

हा डागच नव्हता का ! दुकानांतील गिऱ्हाइकी निघून गेली होती. बाबा काढलेला माल नीट जागच्या जागीं रचून ठेवीत होता. त्यानें गिरजेस विचारलें,

' कां रडत व्हता सावळ्या ? कळ जास्त उठली व्हती व्हय ? गरीब प्वार, आजारी झाला. काम कसं झट शिकला. त्याच्या हातचा जोडा, बूट, गिऱ्हाइक मायंदळ पसंत करत्यात. तो निजूनशान हाय चार दिस, त लईच पंचाईत झालिया माझी ! '

' हेंच-हेंच तें ! कुनाची स्तुती करायची म्हणजे, त्याला काय हाय का सुमार ? अशानच तो शेंफारून गेलाया. डोकं दुखनं, पोटांत दुखनं न पाठींत दुखनं हा काय आजार व्हय ? सांगतायसा काय ? मी-बी बसते असा आजार घेऊनशान्, मग पहातें, लागतय का कुनी माझ्या पाठीं तें ! ' गिरजाबाई उसळल्या.

' बायका तुम्हीं, एखांद्याचा मुडदा जरी पडला तरी इश्वास नाहीं वाटायचा तुम्हांला ! काय जात हाय पन ! तो ढ्वाग करूनशान् बसलाय् व्हय ? त्याच्या बापाला नव्हती व्हय अशीच कळ उटत ? मी जाऊनशान पाहतो त्येला.' असं म्हणून खंडोजी शिडीची दोरी हातीं धरून वर चढून गेला.

'वारसा मिळवायला विस्टेट नाही पण बापाच्या रोगाचा वारसदार झालास हो ! ह्यो रोग वाईट, बरा नाहीं झट व्हायचा !' खंडोजी त्याला पाहून म्हणाला. त्यानीं गिरजेकडून तेल आणविलें व शेक केला. सावळ्यास जरा आराम वाटूं लागला होता. त्याची कळ सरकत सरकत मानेच्या सांध्यात गेली होती व दोन तीन दिवसानंतर तो तशा परिस्थितींत थोडें काम करूं लागला होता. मानेला मधून मधून आचके द्यावे लागत त्याला ! तो तसाच काम रेटीत असे. फेरीला चांगले बरें वाटल्या शिवाय जाऊं नकोस असें बजावून ठेवलें होतें बाबांनीं त्याला. पण फेरीला बाहेर पडल्याशिवाय दोन पैसे त्याच्या हाताला लागणार कुठून ? पैशाची त्याला जरूर होती ! मुंबईचा खर्च तो ! शेणा मातीलाही मोल मोजावें लागतें तिथें ! आपल्या पडत्या काळांत ज्यानें मदत केली, ज्यानें आधार दिला, त्याला कोणत्या तरी रूपानें मदत करून उपकाराची फेड करणें त्याचें कर्तव्य होतें म्हणून तो दोन पैसे मिळविण्यास अधीर झाला होता.

शिकले सवरलेले लोकही केव्हा केव्हा खुळ्या खेडवळ समजुतीला बळी पडतात तर, सांवळ्याची गोष्ट काय ? सांवळ्यानें रोजच्याप्रमाणें आपलें काम आटोपलें, न्याहारी केली, थाळी धुतली, शर्ट घातलें, त्यावर कोट घातला, पालीसच्या डब्या

खिशात टाकल्या व चामड्याची वळकटी पाठीवर टाकून एका हातांत त्या वळकटीची वादी धरली व दुसऱ्या हातांत ऐरण घेतली व फेरीला निघाला.

आजारीपणानंतर तो प्रथमच निघाला होता. त्याचा चेहरा त्रासिक दिसत होता. त्याचें मन संशयित झालें होते. त्याचे पाय उचलत नव्हते! यापूर्वी पुष्कळ वेळां त्यानें फेरी केली होती; पण असे कांहीं तरी चमत्कारिक त्याला केव्हाच वाटलें नव्हतें! तो विचारात होता. तो आपला पाय बाहेर टाकतो न टाकतो तोंच, त्याला कोणता तरी अपशकून झाला होता. तो चपापला—थांबला. त्याची दृष्टी घरात गेली. तेथेंही त्याला विलक्षण दृश्य दिसलें!

आजारामुळें तो घरात बसून होता हें एका व्यक्तीला पसंत नव्हतें. खपत नव्हते! तीच ती व्यक्ति त्याच्याकडे चोरून तिरस्कारानें बघत असलेली त्याला दिसली. तिनें आपलें तोंड चटकन फिरविलें व ती आपल्या कामाला लागली. सावळ्या त्याचा अर्थ ताबडतोब समजला. तो तडक बाहेर पडला व वाट चालूं लागला; त्याचे मन थाऱ्यावर नव्हते! मनेचा त्रास होतच होता त्याला. निघताना अपशकून झाल्यामुळे दिवस कसा जाईल ही भीति वाटत होती त्याला. तो कोणत्या रस्त्यानें जात होता, त्याचें त्याला भान राहिलें नव्हतें! तो वाट चालत होता. त्याच्या चेहऱ्यावर निरनिराळे विकार उमटत होते. मुंबईचे गजबजलेले रस्ते, पण त्या गजबजाटाची, गाडी घोड्याच्या वाहतुकीची बिलकूल दाद नव्हती त्याला. तो आपला ' जोडा–बूट–शिवाय—बूट-पालीस शिवाय ' ओरडत जात होता. तसाच तो एका वाडींत शिरला. चवथ्या मजल्यावरून एका गुजराथ्यानें त्याला हांक मारली व त्यानें त्याला वर बोलाविलें.

' वर नाहीं यायचा मी–शेट. असल काम ते खाली टाका–करून देतो.' तो म्हणाला. तो गुजराथी त्याला खालीं काम देईना म्हणून तो वाट चालूं लागला. त्याच वाडींत, त्याच चाळीच्या जिन्यासमोर त्याच्या बापाला बेदम मार बसला होता व त्याच कारणावरून तो बिचारा जिवाला मुकला होता. त्याला त्या वाडीच्या माळ्यानें मारलें होतें! तो काळा भिल्ल माळी तेथेंच झाडू मारीत होता. त्याला पाहून तो मनात म्हणाला,

' हाच–तो! यानंच माझ्या बापाचा जीव घेतला! माझ्या बापानें ह्याचे चार चव्वल खाल्ले व्हते काय? कशापायी यानं माझ्या बापाला मारलं? त्यानं कोनता गुन्हा केला व्हता? हो गुन्हा केला व्हता. तो चांभार व्हता–चाळीवर चढला

होता हा त्येचा गुन्ह्या व्हता. सात भैय्ये व आठ चुली मांडणाऱ्या भैय्यापैकीं एक इरसाल भैय्या–त्याचा उपरी होता. ‘ हकाल देव उस्कू ’ त्याचा हुकूम सुटला होता—त्याचा बाप,

‘ चूकी झाली. नाही चढणार फिरूनशान माफ करा ’ असें म्हणून मार चुकविण्यासाठीं गयावया करीत होता. माळी रागाने त्याच्या अंगावर ओरडत होता. चाळीचे लोक बाहेर येऊन बघत होते. माळ्याला त्वेष चढला होता. राग आला होता. त्याचे हात शिवशिवत होते नुसते ! त्यानें त्याला खरपूस चोपून काढला !

सावळ्या विचार करीत होता. ‘ हे समदे लोक दुकानात येतात. जोडबूट घेत्यात. तवां इटाळ होत नाही त्यास्नी. रस्त्यांत महार मागाना ठेपा देत्यात तवा त्यांना बाट होत नाही. आगिनगाडीत, बोटीत खांद्याला खादा लावूनशेन बसतात तवा त्येना चालतं ! त्येना इरानी चालतो, मुसलमान चालतो; पण आम्ही ‘ हिंदू ’ ! आमचा इटाळ व्हतो ! ’

ज्या माळ्यानें त्याच्या बापाला मारलें होतें त्याच्यावरही उच्च जाती होत्याच ! ते काय त्याला पंक्तीला घेऊन बसत होते ? प्रत्येक वरिष्ठ जात, कनिष्ठ जातीतील माणसाला तो लायक असला, हुषार असला, विद्वान असला तरी, कमीच लेखते ! त्याच्या मनःस्थितीचा कोणीही विचार करीत नाहीं. केवळ आमच्या समाजातील या वेडगळ समजुतीमुळे–चालीमुळे, अज्ञानामुळे त्या बिचाऱ्याचा बाप प्राणास मुकला होता !

बारा वाजून गेले तरी सांवळ्या फीर फीर फिरत होता. त्याची बोणीच झाली नव्हती ! परमेश्वर त्याचा अंत पहात होता. तो तोंड आंबट करून घरीं आला. झांकून ठेवलेलें जेवण जेवला, विश्रांति घेतली अन् पुन्हा बाहेर पडला.

त्याला ताबडतोब गिऱ्हाईक मिळालें; पण तें त्याला नाकारावें लागलें होतें ! या लोकांना सुरवातीस वहाणेचा आंगठा लावणें अपशकून वाटत असतो !

संध्याकाळपर्यंत त्याला काही काम मिळालें नव्हतें. तो थकला होता. वर्षासारखा दिवस गेला पण एक पैसाही कपाळांत मारायला त्याला मिळाला नाहीं, याची त्याला जाणीव झाली. आपल्या पाठीवरचा बोजा त्यानें उतरला व तो एका इमारतीच्या बाजूला टेंकला ! मान दुखतच होती त्याची. तो समोरच्या सार्वजनिक नळावर गेला, त्यानें तोंड धुतलें, पाण्याचा हात मानेवर फिरवला व आपलें सामन फिरून

पाठीवर मारणार इतक्यांत् ‘ माझे चप्पल दुरुस्त कर ’ असें एक लेंगा घातलेला काळा सांवळा मरतुकडा पोऱ्या, आपली तुटकी चप्पल पायानें त्याच्यापुढें सारीत म्हणाला.

दोन पैसे मिळतील या आशेनें त्यानें–तें चप्पल दुरुस्त करून दिलें व पैशाकरता हात पुढें केला. दैवाचा खेळ निराळा होता ! तो भला गृहस्थ पैसे न देता पुढेंच चालू लागला !

‘ शेट ! व्ह–शेट पैसे टाका ’ सांवळ्या ओरडत होता. स्वारी निसटून जात होती. सावळ्यानें त्याला धरलें तोंच, त्यानें आपलें अंग खालीं टाकलें. व–‘ आई–आई–हात पिरगटला ’ अशी एकच ओरड केली. मुंबईचे रस्ते ते ! लगेच लोकाची गर्दी जमली ! लोक सावळ्यावरच तुटून पडले ! ते म्हणाले, ‘ साला मोचीच लबाड आहे. ’

पोऱ्या म्हणत होता ‘ लबाड साला मोची. पाडलं मला ’

‘ मी व्हय ? मी कशापायीं त्याला पाडूं ? इचारा त्येला, चप्पल दुरुस्त करून घेतला-माझे पैसे दिले व्हय ? मोफत काम करूनशान् घेतो व्हय ? माझ्या मेहनतीचे पैसे मला नग ! तुम्हास्नी दया येत असल तर तुम्ही द्या दोन पैसे, मी आपला गुमान जातो. हा पोरच लबाड हाय. दिडक्या नाहीं अन काम करून शान घेतो ! हायका दुनिया ! इश्वास कसा ठेवावा मानसानं ? ’

पोऱ्याचा बाप सट्टेबाजांच्या अड्डयांतून उठून झिंगत झिंगत व विडी ओढीत त्याच रस्त्यानें जात होता. गर्दी पाहून तो थांबला. त्याला गर्दीत त्याचेच राजश्री दिसले ! ‘ काय काढली कळ पोऱ्यानें ’ तो मनात म्हणाला व भितीनें ‘ कायरे झालं ? ’ चौकशी केली.

‘ मोच्यानें माझा हात पिळला–मला पाडलं; चिरंजीव रडत म्हणाला ! ’

बापाला पाहताच पोऱ्याला धीर आला होता. बापाला मोच्याचा राग आला. तो मोच्याबरोबर शिरा ताणून भांडूं लागला व त्याला पोलीसचा दम देऊं लागला ! गर्दी झाल्यामुळें पोलीस तिथें हजर झाले व मोच्यालाच त्यांनीं हाकून दिला !

अर्थात् सावळ्याला घरीं जाण्यास उशीर झाला. गिरजाबाईचा जळफळाट झाला होता.

‘ मच पैसा मिळ्ळा असल नव्हका आज? घरी यायची बी सई नाहीं राहिली. सांज झाली नाहीं व्हय ?’

सावळ्याचा चेहरा उतरला–खिन्न झाला. तो निराशेनें म्हणाला,

‘ काय सांगू, पै बी नाहीं मिळ्ळी आज ! ’

‘ हात्तीच्या नाहीं मिळ्ळी त नाहीं, बलाय गेली. त्येचं काय इतकं ! तुला कुठं त्रास नाहीं झाला म्हंजी झालं ! कशी हाय तुझी मान ?’

बाबांचें भाषण ऐकून गिरजा म्हणाली ‘ व्हत काय मानेला ? दिडक्या मिळतात व्हय ? निजला असल कुठं जाऊनशान दुसरं काय ?

सांवळ्याच्या डोळ्यांतून टप टप–टिपं ओघळलीं !



# बंधना पलीकडे

केव्हां केव्हा अगदीं अकल्पित गोष्टी घडत असतात. पावसाळा संपला कीं, पहांटेला रोज फिरायला जायचा माझा क्रम असे. मी व माझ्या शेजारचे एक वकील असे आम्हीं फिरायला जात असूं. आमचे दोघाचे पोशाखही सारखेच होते. बूट, सॉक्स, खाकी निकर, ओपन कॉलरचा हाफ शर्ट, त्यावर गरम गंजीफ्रॉक व कधी डोकीवर हॅट तर कधीं बोडके, हातात एक छोटीसी काठी असा आमचा सरंजाम असे.

आम्हीं निघालों कीं, आमचीं तोंडें कांहीं गप्प रहात नसत. निरनिराळ्या विषयावर आमच्या गोष्टी होत. आणि गप्पाकरिताच आम्हाला एकमेकांची जरूरी असे.

कधीं प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें जर आमच्यापैकीं एखाद्याला बाहेर पडता आलें नाहीं तर, एकट्या एकट्याला फिरून यायला कंटाळवाणें होई. एके दिवशीं एक विलक्षण प्रकार घडला. मी म्हणालों, 'जग हें त्रिविध आहे.'

माझा मित्र थट्टेच्या स्वरानें म्हणाला, 'हो आहेच तें ! जगांत तलाव आहेत, डोंगर आहेत, समुद्र आहेत, झाडें आहेत, रत्नें, हिरे, माणकें, बुद्धी चालत नाहींत अशा अनेक गोष्टी आहेत.' त्यावर मी म्हटलें,

'जगात तसेच हरतऱ्हेचे लोकही आहेत. आणि म्हणूनच वैचित्र्य आहे, सुख आहे, सर्व कांहीं आहे.'

बोलत बोलत, आम्ही आमच्या निवासापासून ते क्विन्सरोड ठाकुरद्वार समोरील ब्रीजवरून उतरून, मरीन ड्राईव्हवरून थेट कुलाब्यापर्यंत चाललों होतों. रेक्लमेशनची जमीन संपून पुढें जो समुद्रात सिमिटाचा धक्का बांधलेला आहे, त्या धक्क्याच्या शेवटपर्यंत जाऊन तिथें दोघांनीं चिरूट शिलगावायचे, थोडा समुद्राचा तर थोडा शहराचा देखावा पहायचा, नवीन नवीन इमारती कोणत्या

पुऱ्या झाल्या, कशा झाल्या त्यावर टीका करायची व मग स्टेडियमवरून परत फिरायचें असा आमचा क्रम होता. नुकतेंच तांबडें फुटत होतें. धुकें बरेंच कमी झालें होतें. धक्क्याच्या तिथला भाग चांगलाच स्वच्छ झाला होता. तिथें थोडी गर्दी दिसत होती. त्यातच पिवळ्या पगड्याही चमकत होत्या. तिथें कांहीं तरी गडबड झाली होती यांत शंकाच नाहीं. आम्हीं दोघे आश्चर्य-चकित झालों! आमच्यासारखे दुसरेही कांहीं लोक फिरायला जात होते. त्यांतील काहीं, ती गर्दी पाहून तिथें धांवत जात होते. आम्हीं आपले रोजच्या गतीनें जात होतों. तिथें गेल्यावर दोन तीन पोलीस समुद्रांतून एक प्रेत काढीत असल्याचें आम्हांला दिसलें ! समुद्राच्या लाटा धक्क्यावर जोरजोरानें आदळत होत्या.

'कोण हो !' मी घाईघाईनें माझ्या मित्रास प्रश्न केला.

'कुणी बाई दिसते आहे !' ते म्हणाले. आम्हीं जवळ येऊन पोहोंचलों. ती एक पांढरपेशापैकीं मुलगी होती. तिच्या डोक्यावर जखम दिसत होती. ती पाण्यांत दहा बारा तास असावी असा पोलीसांचा तर्क होता. पोलीसांनीं तिला प्रेत नेण्याच्या हातगाडीत घालून मॉर्गवर नेलें.

ती आत्महत्त्या असावी.

आम्हांला तोच विषय पुरे होता. प्रेत पाहिल्यावर आणि ते सुद्धा अपघाताचा मृत्यू पाहिल्यावर पाहणाऱ्याला किळस वाटतेच. तें प्रेत पाहून आम्हाला वाईट वाटत होतें. आम्हीं हळहळत होतों. 'बिचारीनें उगीच कां जीव दिला ?' मी स्वतःशींच पण मोठ्यानें म्हणालों.

'कदाचित् तो खूनही असूं शकेल !' माझ्या सोबत्यानें संशय व्यक्त केला. 'तिनें जीवच दिला असेल. ती कुमारिका आहे. प्रौढ आहे. कुणीं सांगावें ? रूढीचीं, जातीचीं बंधनें कदाचित् तिच्या प्रेमाच्या आड आलीं नसतील !' मी माझें डोकें चालविलें.

वकील साहेब म्हणाले,

'अक्कल नाहीं म्हणून तिला जीव द्यावा लागला असावा ! टेंम्पररी इनसॅनीटी ( क्षणिक वेड ) ज्याला म्हणतात ते हेंच !'

'मग तुमचे मत काय ? तुम्हीं एकदम अक्कल नाहीं म्हणतां-तें कां ?'

'बरोबर आहे माझें म्हणणें; तुम्हाला सोनगांवची गोष्ट सांगतों ती ऐका म्हणजे पटेल !'

' थोड्या दिवसांपूर्वी मी सोनगावांस गेलों होतों. माझें कोर्टांत काम होतें. तिथें माझे एक स्नेही वकीलच आहेत. त्यांच्या इथें मी नेहमीं उतरतों. त्यांच्या शेजारी, धर्मशाळेच्या पाठीमागें एक बैठें घर आहे. त्यांत एक पारशी रहातो. त्याची गोष्ट त्यानें मला सहज सांगितली. तो पारशी त्या धर्मशाळेची व्यवस्था पाहतो. तिथें तो बरींच वर्षें आहे. साधारण साठीच्या वयाचा तो असावा. त्याचे केंस पिकले आहेत. त्याचें शरीर सुटलेलें आहे. त्याचा पोशाख — तो सपात घालतो, पाढरी इजार, तीवर लाब सदरा व त्यावर एक वेस्टकोट व डोकीवर एक काळी मखमलीची वाटीसारखी टोपी. त्याच्या मिशा कल्लेदार आहेत व त्याची दाढी कातरलेली असते. तो तिन्हींत्रिकाळ कस्ती सोडून ती सूर्याला दाखवीत डुल्त मोठ्यानें मंत्र म्हणत असतो.

त्याला पिरोजबेन नावाची एकुलती एक मुलगी होती. ती त्याला त्याच्या बऱ्याच उतारवयात झाल्यामुळे व ती त्याची एकटीच लेक असल्यामुळे, तिला त्याने मोठ्या लाडात वाढविली होती. तिला त्यानें शाळेंत घातली होती. ती तिथल्याच हायस्कुलांतून मॅट्रिक झाली.

परीक्षा झाल्यावर तो पारशी तिचे लग्न करून टाकणार होता. सेंट्रल बँकेंतल्या एका कारकुनाला तिला देण्याचें त्यानें ठरविलें होतें. तो मुलगा देखणा नव्हता अन् गरीब होता. गरीब पारशाबरोबर लग्न करणे तिला आवडलें नाहीं. तिनें ते लग्न नाकारलें. तिला पुढें शिकावयाचें होतें. ती पहिल्यापासूनच शात, मित-भाषणी आणि नखरेल होती. तिची आई तितकीच जुन्या वळणाची होती. ती केसावर सफेत फडका बाधी, लाब हाताचे सदरे, त्यावर कबजा, व मोठ्या सल तुमानी घालून त्यावर ओढणी घेई. तिच्या घरात फरशी धुवून त्यावर रोज रांगोळी घातलेली असे. सदोदित चंदन धूप घालून ती घरात अग्नी जळत ठेवी. मुलीला तिच्या बापाने कॉलेजच्या शिक्षणाकरिता मुंबईस पंडिता रमाबाई हॉस्टेलमध्यें ठेविली होती. तिला टेनीस वगैरे खेळण्याचा नाद होता. ती रोज कॉलेजच्या अंगणात प्रॅक्टीस करी. ती सुंदर होती; मोहक होती. ती बॉब करी, झगे घाली व अप-टुडेट राही. ती गोरी असल्यामुळें ती पारशीण आहे असे कुणाला ओळखतां येत नसे. तिथेंच एक नवसारीच्या श्रीमंत बोहऱ्याचा मुलगा होता. तो चागला सुंदर, जाडजूड व तसाच मोहक होता. त्याचें नाव हबीब होतें. तो हुशार असून टेनीस, फुटबॉल व हॉकी वगैरे खेळात प्रवीण होता. तो स्पोर्ट होता. पिरोजबेन नेहमीं

त्याच्याबरोबर खेळे; फिरायला हिंडायला जाई. तीं दोघें पहिल्यापासून एकाच क्लासमध्यें होती. ती ज्युनियर बी. ए. च्या क्लासमध्यें असताना परीक्षेनंतर घरीं आली होती. हबीबला तिनें मोठ्या आग्रहानें बोलाविलें होतें. हबीब रॉयल हॉटेलमध्ये उतरला होता. पिरोजबेनही तिथेच होती. तिनें हबीबला तिच्या घरीं नेलें व त्याची आईबापाशीं ओळख करून दिली. नवसारीला त्यांना कोणत्याशा क्लबबरोबर टेनिसची मॅच द्यायची होती म्हणून तीं दोघेंही तिकडे गेलीं होतीं ! ते तिथें आठ दिवस राहिले.

कॉलेज उघडल्यावर तीं दोघें मुंबईस आलीं. नवसारीच्या काहीं उटाठेवी पारशाच्या ही गोष्ट लक्षात आली. त्यानीं तिच्या बापाला झणझणीत पत्र लिहिलें ! तसेंच दुसरें पत्र मुंबईस जमातीच्या सेक्रेटरीस लिहिलें !

पत्र पाहून बापाची धादल उडाली. त्याच्याही डोक्यात लख्ख प्रकाश पडला. तिला कॉलेजांत एकटीला ठेवून उगीच एवढें शिक्षण दिलें असें त्याला वाटूं लागलें !

वास्तविक अखिल मानव जात, प्रथम रानटी अवस्थेमध्यें होती असें इतिहास प्रसिद्ध असून देखील काहीं लोक रक्त शुद्ध ठेवण्याच्या बाता मारूं लागले कीं, त्यांची-त्यांच्या अज्ञानाची कींव करावीशी वाटते ! एखाद्या धनबाईला अगर शीरीनबाईला तिच्या इच्छेप्रमाणें अद्याप, सिनेमा अगर नाटकात काम करतां येत नाहीं. मागें एका कोणत्याशा फिल्ममध्ये एका पारशिणीनें काम केलें होतें; त्या वेळीं काहीं पारशांनी बरीच धामधूम केली. सेन्सारकडे त्या फिल्मला परवानगी देऊं नये म्हणून डेप्युटेशनें नेलीं. अखेर कांहींच जमलें नाहीं तेव्हा, थिएटरवर बेकायदेशीर जमाव करून त्यानी मोठेच बंड केलें !

बिचारा म्हातारा पारशी त्याच्या लोकाना भिऊन गेला. त्याला काहीं सुचत नव्हतें. तो म्हणाला,

' ती मॅट्रीक पास झाली तेव्हाच तिचें लग्न होऊन गेलें असतें म्हणजे कटकट गेली असती. '

त्यावर त्याची बायको म्हणाली,

' तें तर फार चागलं झालं असतं. येवकताला बाळ बचा बी झाला असता ! '

पेस्तनजी त्याही परिस्थितींत हंसला. त्यानें मुलीची भेट घेतली.

पोरगी हुशार होती. ती म्हणाली,

'काय ऐकता तुम्हीं लोकांचं ? हें सर्व खोटं आहे. लोक लबाड आहेत. उगाच त्यांना काहीं तरी उठाठेवी करायला हव्यात. हबीबची माझी दोस्ती आहे. म्हणजे आम्हीं लग्न करणार आहोंत असें नाहीं. मला जातीचा अभिमान आहे, शील, कूळ आणि रूढी न समजण्याइतकी मी खुळी नाही. तुम्हीं स्वस्थ रहा. काळजी करूं नका.'

पेस्तनजीला काहीच बोलता आलें नाहीं. त्यानें त्याच्या बायकोचा तिला निरोप सांगितला कीं, तिला जर लग्न करायचें असेल तर तिनें पारशाबरोबर करावें. भलते सलते, आपल्या पायरीला बट्टा लागेल असें करूं नये व तिच्यावर परिणाम व्हावा म्हणून तो म्हणाला,

'तुझी आई फार काळजी करते. ही गोष्ट समजल्यापासून ती जेवली पण नाहीं. सीकबीक झाली तर पंचाईत आहे.'

पिरोजबेन तितकीच वस्ताद होती. तिनें बापाला सांगितलें,

'आईला सांगा. तूं काळजी करूं नको. मी कुणाबरोबरच लग्न करणार नाहीं. माझी परीक्षा आता जवळ आली आहे. परीक्षा झाली कीं, मी सोनगावास येईन.'

तिच्या म्हणण्यावर बापानें विश्वास ठेवला व तो परत आला.

जमातीचे लोक कॉलेजमध्ये येऊन चौकशी करूं लागले. त्यानीं तिला कॉलेज-मधून काढण्याचा प्रयत्न केला; पण तिनें त्याना दाद दिली नाही. ती आपली हबीबबरोबर पूर्ववत् हिंडे फिरे. जमातीचे लोक त्यांच्या पाळतीवर होते. हबीबला हे समजलें. त्यानें पोलिसात अर्ज करून स्वसंरक्षणाकरिता रिव्हॉलवर घेऊन ठेवला. त्याची स्वतःची मोटर होती. सुट्टीच्या दिवशीं बहुतेक ते कुठें ना कुठें तरी जायचेच ! हबीब श्रीमंत आणि खानदानी घराण्यांतला होता. तो स्वभावानें दिलदार, मन-मिळाऊ होता. त्याच्या जातीतील पुष्कळ श्रीमंत लोक त्याला मुलगी देण्यासाठीं मागें लागले होते. त्याचा बाप मुलाच्या विरुद्ध जाणार नव्हता. परीक्षा झाल्याशिवाय लग्नकर्तव्य नाहीं असें त्यानीं सर्वांस कळविलें होतें.

पेस्तनजी काकाला त्याच्या जातीच्या लोकांनीं सतावून सोडलें होतें. ते त्याला हंसत होते. त्यानें व त्याच्या बायकोनें जवळ जवळ जातीचा संबंध सोडला होता. जमातीचे लोक त्याला हुसकून लावणार होते. तो भिऊन गेला व त्यानें मुलीला पत्र लिहिलें. तिनें पत्राचा जबाब लिहिला.

'जातीचे लोक वेडे आहेत. हबीब श्रीमंत आहे. त्याच्या जातींत पुष्कळ

सुंदर व शिकलेल्या मुली आहेत, लोक त्याला मुली द्यायला तयार आहेत. त्याची सोयरीक झाली आहे. आणि त्याचें लग्न पुढच्या महिन्यात होणार आहे. हे लोक माझ्याबरोबर विनाकारण त्याचीही नालस्ती करीत आहेत. एखाद्या चागल्या माणसाचें नाव बद्दू करणें चागलें नाहीं! आपण लोक सुधारलों आहों, पण केव्हां केव्हा धर्माच्या नावाखालीं अंधश्रद्धेनें, अडाणीपणानें वागतों. आपण या लोकाच्या डुरकावणीला भीक घालूं नये. माझें पत्र धर्मशाळेच्या पंचाना दाखवा. त्यांची खात्री पटली नाहीं आणि त्यानीं तुम्हाला काढून टाकलं तर, तुम्हीं ताबडतोब भाड्याची जागा घेऊन बिऱ्हाड करा व मला कळवा.

मी कुठें तरी मास्तरणीची नोकरी करीन, पगार कमावीन व तुम्हाला खर्चाला पैसे पाठवीन. पैसे कमावण्याइतकें माझें शिक्षण झालें आहे. मी तुमचा मुलगाच आहे असें समजा.

मुलीचें तें पत्र पाहून आईबापाला समाधान वाटलें. त्यांना गहींवर आला.

तें पत्र त्यांनीं धर्मशाळेच्या पंचाना दाखविलें. धर्मशाळेच्या पंचानी त्याला काढणार नाहीं असें आश्वासन दिलें. काकाची काळजी दूर झाली.

पण उपद्व्यापी लोक स्वस्थ नव्हते! त्यानीं एक कट केला आणि एका पारशी बाईला कॉलेजात पाठविली. ती दोन तीन वेळा तिला उगीचच भेटून गेली. ती आली कीं, तिच्या नातेवाईकाच्या ओळखी द्यायची व गोड बोलायची. ती अविवाहित होती म्हणून पिरोजबेनने तिला विचारलें,

'तुम्हीं लग्न का केलें नाहीं?' ती म्हणाली,

'आपले लोक कसे आहेत? मी एका हिंदूबरोबर लग्न करणार होतें. पण त्या मुलाला जातीच्या लोकानीं चर्नीरोडवर त्याच्या खोलींत ठार मारून टाकला! तेव्हापासून लग्न लावायचं नाहीं असं ठरविलं आहे.'

तिनें जातीची निर्भत्सना केली. पिरोजबेनने स्वत:बद्दल तिला कांहींच सांगितलें नव्हतें कीं, जातीच्या विरुद्धही ब्र काढला नव्हता. ही बाईमात्र वारंवार तिथें जाई व तिच्याकडे पिरोजबेनला येण्याचा आग्रह करी. पिरोजबाई तिच्याकडे कधीं गेली नव्हती एके दिवशीं दोन प्रहरीं ही बाई कॉलेजांत आली. तिला भेटली व तिनें आपल्या मोटारींतून घरीं येण्याचा तिला आग्रह केला. पिरोजबेन तिच्याबरोबर गेली. तिनें तिला पारशी कॉलनींत नेलें. तिथें जमातीचे काहीं लोक होते. त्यांनी तिच्याजवळ तिच्या लग्नाबद्दल स्पष्ट खुलासा विचारला.

तिनें शांतपणें सर्व गोष्टी ऐकून घेतल्या व त्यांस तिच्याजवळचें नवसारीहून आलेलें हबीबचें पत्र दाखविलें.

पत्रांत त्याचें लग्न ठरल्याची माहिती होती. लग्न पुढल्या महिन्यात होणार होतें असें लिहीलें होतें. पत्रावर नवसारीच्या पोस्टाचा छाप होता.

पत्र पाहून त्याची खात्री पटली तरी पण, त्यानीं एकंदर सुधारणेवर एक मोठें लेक्चर दिलें व म्हणाले, 'आतांच्या मुली वाटेल त्याच्या बरोबर लग्न लावायला तयार होतात. कांहीं जातपात पहात नाहींत. सिनेमा नाटकांत त्याना काम करायला पाहिजे असतें.'

पिरोजनें तें सर्व थट्टेवारी नेऊन त्यांची हंसत रजा घेतली.

पिरोजनें ही हकीकत हबीब यास कळविली व त्याच्या पत्रामुळें तिचा बचाव कसा झाला तें सांगितलें. तीं दोघेंही पोटभर हंसलीं. मात्र तिनें यापुढे कुठेंही कुणाबरोबर जाऊं नये असें हबीबनें सुचविलें.

दोघांचाही कसून अभ्यास चालला होता. परीक्षा संपताच पिरोजबेनने बापास पत्र लिहिलें. ते असें होतें :

'माझं पत्र पाहून तुमची स्थिती काय होईल हें मी जाणून आहे. त्याबद्दल मला मनापासून खेद होत आहे. त्या एकंदर विचारानें माझें डोकें भणाणून गेलें आहे. मला कांहीं सुचत नाहीं. माझ्या विरुद्ध उठलेल्या सर्व कंड्या खोट्या नव्हत्या. मी तुमच्याशीं, आईशीं प्रतारणा करीत होतें, खोटें बोलत होतें, थापा देत होतें.

हबीबइतका उमदा तरुण माझ्या पहाण्यांत आला नाहीं. तो सुंदर आहे. अंतःकरणाचाही तसाच गोड व थोर आहे. स्वभावानें दिलदार व मनमिळाऊ आहे. जातीच्या बंधनामुळे मला त्याच्याशी लग्न करतां आलें नाहीं. माझं कॉलेज शिक्षण पुरं झालं आहे. मी परीक्षेत पास होईनच.

माझ्यासाठीं हबीबनं थोरामोठ्यांच्या मुली नाकारल्या व तो अविवाहित राहिला. माझ्यावर त्याचे निस्सीम प्रेम आहे. मीही त्याच्यावर अलोट प्रेम करतें. माझ्या जातीच्या माणसानीं माझाच छळ केला असें नव्हे, तर त्याच्यावरही बरींच संकटें आणलीं. माझा त्याचा तीन वर्षांवरचा संबंध आहे. माझ्याशिवाय त्याला कुणाबरोबरही लग्न लावायचें नाहीं.

मला जसं तुमच्याबद्दल, आईबद्दल वाईट वाटतं तसंच त्यालाही सोडायला दुःख होतं !

तुम्हीं मला लाडानं वाढवलीत, शिक्षण दिलंत, याबद्दल मी तुमची फार फार ऋणी आहें.

माझ्यामुळं तुम्हांला त्रास झाला. मी तुम्हाला सूख दिलं नाहीं. मी योजलेल्या मार्गाशिवाय मला दुसरा मार्ग राहिलेला नाहीं.

मी लहान, अजाण नाहीं. माझं हितानहित मला चांगलं समजतं.

आपणातील काहीं लोक वाटेल त्याच्याशीं वाटेल तसं मन मोकळीनं वागत असलेले पहातात तरी. आमच्या सारख्याच्या मागे लागून ते आमचा छळ कां करतात ? आम्हीं गरीब म्हणून ? माझ्यासारख्या सुशिक्षित मुलीला माझ्या मनाप्रमाणें, एका चांगल्या लायक माणसाबरोबर राजरोस लग्न लावतां येऊं नये, ही मोठ्या खेदाची गोष्ट नाहीं का ? धर्माच्या बाता मारणारे लोक धर्माच्या आज्ञा किती अक्षरशः पाळतात तें मला माहीत आहे.

माझ्याप्रमाणें बऱ्याच बाया या दुष्ट चालीला बळी पडल्या आहेत. त्यांचा तो मार्ग मला खुळेपणाचा वाटत होता. त्या खुळ्या होत्या असं मी म्हणत असें; पण नाहीं. त्यानीं जे केलं तेंच बरोबर होतं. त्याच्या भावना काय असतील त्या मला आता समजून आल्या आहेत.

मनुष्य प्रेमासाठीं सर्वस्वाचा त्याग करील; पण त्याला प्रेमाचा त्याग करतां येणार नाहीं ! आठव्या एडवर्डनें प्रेमासाठींच राज्यत्याग केला ना ? प्रेमाचं महत्त्व किती आहे, हे ज्यानीं प्रेम केलं असेल त्यानाच कळेल. जातीबंधनें मला तोडता आलीं नाहीत.

मी तुम्हाला झालेंच नाहीं. तुम्हीं निपुत्रिक आहांत असं समजा. जगात मुलं होऊन मरतात त्याचे आईबाप काय करतात ? तुम्ही तसाच विचार करा. तुम्हाला मुलगा नाहीं, त्याचं नाहीं का दुःख होत ? माझ्यासाठीं शोक करूं नका. आईला ही गोष्ट ऐकवूं नका. तिला धीर द्या. तुम्हाला या वयात असलं दुःख देऊन कष्टी करणं मला जिवावर येतं. हें कृत्य मी अविचाराच्या भरांत वेडेपणात करतें आहें असं तुम्हाला वाटेल. मी वेडीच आहें. जातीचा मनुष्य सोडून परजातीच्या मनुष्यावर प्रेम केलं, त्याच्याशी संबंध जोडला, मी वेडी नाहीं का ? पण मनुष्याकडे–तो मनुष्य आहे ही दृष्टी ठेवा, मग वेडे कोण, हें तुम्हाला कळेल.

माझ्या जातींतील अनेक भगिनींना दिव्य करावं लागलं, पण अद्याप जातीची

अंध–श्रद्धा, त्याचे कोते विचार नाहींसे झाले नाहींत. माझ्या या उदाहरणानें त्याचे डोळे उघडतील अशी आशा नाहीं.

मी जातीचीं, धर्माचीं बंधनें पाळलीं नाहींत. मी जगात देव मानला नाहीं. नीति, अनीति, आचार, विचार यांचा विचार केला नाहीं. रूढि, चाल, सांप्रदाय मानला नाहीं. त्याबद्दल मला मुळींच कांहीं वाटत नाहीं. मी जातपात पाळीत नाहीं. जगातील मनुष्यमात्र एक असला पाहिजे. त्याला मनुष्यमात्राशीं कोणताही संबंध ठेवण्याची पूर्ण मुभा असली पाहिजे. मला जास्त लिहवत नाहीं. माझं पत्र वाचून तुमच्यावर दुःखाचें आकाश कोसळेल !

तुमच्या प्रेमाची मला जाणीव आहे. मी लहानपणीं जेव्हा आजारी होत्यें तेव्हां तुम्हीं व आईनं माझी जिवापाड सेवा केली. मी बेशुद्ध होत्यें तेव्हां आईन फार शोक केला. ती माझ्या अंथरुणाजवळून हलली नाहीं. तिला खाणंपाणी गोड लागलं नव्हतं ! तिनं बेचाळीस दिवस जागून काढले होते. आईचं हृदय काय आहे, त्याची महती काय, हें मला तेव्हां कळलं. आईची आठवण झाल्यामुळें माझ्या डोळयातून अश्रू गळत आहेत व ते अश्रू पत्रावर पडल्यामुळे पेनची शाई फांकली आहे. त्या अश्रूंचे डाग आईच्या प्रेमाची साक्ष देत आहेत. आई, तूं प्रेमळ आहेस. तुझ्या मातृहृदयाचं काय होईल ? तूं आपला जीव कसा ठेवशील ? आई ! दुःख करूं नको. काका ! धीर सोडूं नका. आईला धीर द्या. या वयांत तुमचा धीर तुम्ही खचूं देऊं नका. तुमच्या जेव्हां हें पत्र हातीं येईल तेव्हां मी कुठे असेन ? तुम्ही माझा वेड्यासारखा शोध कराल, पण मी काय करूं ? मला सर्वांचा वीट आला. मी तुम्हांला मुकल्यें. तुमच्या जातीला मुकल्यें. आईबापाला मुकल्यें, मायभूमीला मुकल्यें. आई, तुझं प्रेम मला कुठं मिळेल ? बाबा, तुम्हीं काय कराल ? दुःख करूं नका. शोध करूं नका. माझ्यावरचें प्रेम तसंच अढळ ठेवा. मला वेडी म्हणूं नका. मी वेडी नाहीं. जातीबंधनें वेडीं आहेत. आता जातीचीं बंधनें काय करतील ? जातीचे लोक काय करतील ? मी आतां बंधनापलीकडे गेल्यें आहे. मला त्वेष सहन होत नाहीं. मला लिहवत नाहीं. शेवटीं मी तुम्हाला, आईला, मायभूमीला हात जोडून तुमचा सर्वांचा निरोप घेत्यें. ’

पत्र बापाला मिळालें. तें तो वाचताना थरथरत होता. त्याच्या तोंडांतून शब्द

फुटत नव्हता. तो हुंदके देऊन रडत होता. आईला मूर्च्छा आली होती. लोकांनीं तिला सावध केलें. घरांत रडारड झाली. बाप म्हणाला,

'वेडे पोरी–हें तूं काय केलेंस ? तुझ्या शिकण्याचा हाच काय उपयोग केलास ? तुला त्या मुसलमानाबरोबर लग्न लावायचें होतें तर, तें कां लावलें नाहींस ! '

पत्रावर तिनें गांवाचें नाव मुद्दाम चुकीचें घातलें होतें ! त्यामुळें, ' माहीत नाहीं ' अशा शेजाऱ्यांनीं तें पत्र डेडलेटर ऑफीसमध्यें गेलें. तिथून आंतल्या पत्रावरील पत्त्यावर तें पुन्हां रवाना झालें ! ज्यावेळीं हें पत्र आईबापाला पोहचलें, त्याचवेळीं तीं दोघें हंसत खिदळत, आफ्रिकेच्या किनाऱ्यावर हातात हात घालून बोटींतून उतरलीं होतीं. त्यांनी तिथें जाऊन सरळ आपलें लग्न उरकून घेतलें !



# विषम विवाह !

कचेरींत गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणूनच अर्जून वेळ होताच आपली खुंटीवरची तेलकट झालेली टोपी डोक्यात टाकून रस्ता चालूं लागला होता.

त्याची मनःस्थिति ठिकाणावर नव्हती. जगाच्या सर्व व्यवहाराना तो पारखा झाला होता.

मुबईच्या बकाली वस्तींतून जाताना त्याच्या ओळखीचे लोक त्यास मधून मधून भेटत होते. त्याच्याबरोबर इथल्या तिथल्या गोष्टी करण्याच्या तो मनः-स्थितींत नव्हता. त्याला आपल्या चाललेल्या विचारांत त्यामुळें अडथळा होत होता.

तो पोस्टांत पांच सहा वर्षे नोकरी करीत होता. त्यानें त्या अवधींत कुणाकडून क्वचितच बोलून घेतलें होतें !

कामात तो अगदीं चोख असल्याची सर्वांस खात्री होती. म्हणून बारीक सारीक कामावर देखरेख ठेवण्याची जरूरी तिथल्या कारकून मंडळीस भासत नव्हती.

पोस्टाच्या कोणत्याही खात्याचें काम म्हटलें म्हणजे केवढें जोखमी ! त्यात तो इन्लंड पार्सल खात्यात काम करीत होता. तिथें नेहमीं पार्सलेंच फुटकीं मिळा-वयाचीं, अगर काहीं तरी घोंटाळा व्हावयाचा !

हिशेबाची बरोबर ताळबंदी झाल्याशिवाय त्या खात्यांतील माणसास, तिथून हलताच येत नसतें. तें काम फारच जोखमी असल्यामुळें अत्यंत कसोशीनें करावें लागतें.

अर्जुनची पाळी दोन प्रहरीं दोन वाजतांची होती. तो नेहमींप्रमाणें अर्धातास अगोदर कामावर हजर झाला होता. दरवाज्याच्या बाजूच्या धक्क्यावर त्याच्या जोडीदारांपैकीं पांडू सिग्रेट ओढीत बसला होता. त्याला आलेला पाहून तो ओरडला,

'कायरे ! काल तूंच व्हतासना कामावर ? जा, जा बघ, घोंटाळा केला हायस.'

अर्जुनच्या छातींत धस्स झालें ! तो तडक वर गेला; पण तेवढया अवधींत त्याची चूक झाल्याबद्दल पाडूला मनापासून समाधान झाल्याचें त्याच्या विकट हास्यावरून त्याला समजून चुकले. तो खिन्न झाला.

सकाळच्या पाळींच मास्तर आपलें काम संपवून घरीं जाण्याच्या तयारींत होते.

साठे मास्तर व मिस्कीटा साहेब सुपरवायझर कालच्या कामाबाबत काहींतरी इंग्रजीतून बोलत असलेले त्याला दिसले !

त्यांच्या संभाषणावरून ब्यागेचें लेबल चुकल्याचें त्याच्या ध्यानीं आलें. तार बडोद्याच्या मास्तरकडून मिळाली होती. सुरत आर. एम्. एसची बॅग बडोद्यास डायरेक्ट ब्यागातून रवाना झाली होती. विशेष असा घोंटाळा झाला नव्हता ! पण चुकीचें लेबल लावण्याची चूक, अर्जून प्याकर कडून घडली होती. त्याचा दोष सुपरवायझर व साठे मास्तर यांवर आला होता. तारेचा खर्च त्याच्याकडून वसूल व्हावयाचा होता. अर्थात् वरिष्ट अधिकाऱ्यांनीं, आफिसच्या पद्धती प्रमाणें त्यांच्याकडून लेखी जाब मागितले होते.

गुन्हा अर्जूनचाच झाला होता म्हणून, मास्तर व साहेब त्याच्यावर घसरले होते.

आजपर्यंत त्याच्या हातून कधीं अशी चूक झाली नव्हती. म्हणून साठे मास्तर म्हणाले,

'कायरे काल तूं, असें काय केलेंस ?'

'उगीच आम्हाला भूर्दंड आणलास ना ?'

'कुठे होतें तुझें डोकें ? कसल्या विचारांत होतास तूं !'

त्याच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. त्याची स्थिति चमत्कारिक झाली होती. त्यानें आपल्या कर्माला हात लावला. तो म्हणाला,

'कालचा दिवस मास्तर लईच वंगाळ व्हता.'

'कसा काय ?'

'बाब–घरगुती हाय. येळ आलीच म्हणून सांगतोया' असें म्हणून त्यानीं सागितलें,'

त्याचें लग्न त्याच्या लहान वयात झालें होतें. तेव्हां लग्नाला वयाची आडकाठी नव्हती. त्याच्या आईनें त्याच्याच नातलगापैकीं एक मुलगी पाहून लग्न लावून

दिलें होतें ! तो तेव्हां साधारण किती लहान असावा ? त्यांचीं लग्नें कडेवर घेऊन लावलीं होतीं म्हणजे समजा त्याचें वय काय असेल तें !

मुंबईला राजा आला त्यावर्षी तो तापानें आजारी झाला होता. तो ताप कोणता तरी विषारी होता. त्यांतून तो कसाबसा वाचला; पण तो ताप अंगावरून गेल्यामुळे तो असा खुरडा, खुजट राहिला !

त्याची बायको वाढली, मोठी झाली. त्याचें जोडपें विषम झालें !

त्याची बायको सुंदर नव्हती तरी ती नीटस व देखणी होती. ती नशीबाला हात लावून पुष्कळ वर्षे त्याला देवासारखें पूज्य मानून राहिली होती. पुढें दुर्दैवाने ती मुंबईस आली !

तीं चंदनवाडींत एका चाळींत रहात होतीं. त्यानें दोन वर्षे टाईम्स प्रेसमध्यें हमालाचें काम केलें. नंतर तो पोस्टात प्याकर म्हणून राहिला.

पोस्टात दिवस पाळ्या रात्र पाळ्या कराव्या लागत त्याला. खालच्या लोकांच्या बायका काम धंदा करतात. कुणी विड्या करतात, कुणी गिरणींत जातात, कुणी घरकाम करतात. त्याची बायको काविल स्ट्रीटमध्ये एका गुजराथ्याकडे घरकामाला राहिली होती तो एकटाच होता. अंगा बाध्याने बरा होता तो. तो गरीब होता.

काहीं गुर्जर लोकात लग्नाला फार पैसे लागतात. त्यामुळें कित्येकांचीं लग्नेच होत नाहीत. तो रात्रीचा दहा दहा अकरा अकरा वाजता कामावरून घरीं जावयाचा, तरीहि त्याची बायको घरीं येत नसे. तो चौकशी करी. ती त्याला थापा देत असे व तिच्या शेठबद्दल त्याचें मत चागलें व्हावें, त्याला संशय येऊं नये म्हणून त्याच्या चांगूलपणाबद्दल ती त्याचे गोडवे गाई. ती तिचे जेवण नेहमी त्याच्याकडेच करीत असे. केव्हां केव्हा ती नवऱ्याला देखील जेवण तिथूनच घेऊन येई. तिला लागणाऱ्या वस्तू ती खुशाल त्याच्याकडून घेऊन येई.

सुभद्रेच्या पेहरावांत हळू हळू फरक झाला. त्याच्या तें लक्षात येऊं लागलें; पण त्याला वाटलें, तो मुंबईच्या रहाणीचा परिणाम असेल ! तिला जुन्या पद्धतीचीं सुती लुगडीं व खणाच्या चोळ्या आवडेनाशा झाल्या. ती पातळे व चिटें वापरूं लागली. ती घरात बेपर्वाईनें व बेफिकीरीनें वागूं लागली. त्याचा तिच्यावर बिलकूल ताबा राहीना ! अब्रूसाठी तो तें सर्व निमूट सहन करीत होता. शेजारपाजारचे लोक मात्र कुजबुजत, हंसत व टीका करीत. त्यांनीं तिच्यावर पाळत ठेवली. तिला त्यांनीं तिच्या त्या गुजराथी शेठबरोबर हिंडताना व कानगोष्टी करतांना अनेक वेळा पाहिलें ! नवऱ्याच्या ही गोष्ट कशी ध्यानांत येत नाहीं याचें त्यांना

ाश्चर्य वाटलें ! त्यांनीं त्याला नांवें ठेविलीं ! कित्येकानीं उघड त्याला आपल्या ायकोला त्या गुजराथ्याची नोकरी सोडायला लावण्याचा सल्ला दिला.

त्यानें तिला धाक दिला व दुसरी नोकरी शोधण्यास सांगितलें. तिला त्याचा ाग आला. नोकरी सोडायची तिची तयारी नव्हती. ती उलट लोकानाच शिव्या ऊं लागली ! ती ज्याचा त्याचा संशय घेऊन सर्वांबरोबर भांडली. नवऱ्याबरोबर ोटपणें तिला राहता येणें अशक्य झालें. तिचें तन मन धन त्या गुजराथ्याकडे होतें. ला संधि मिळताच ती त्याच्याकडे जाई. तिला त्याचा सहवास आवडे. तिला वऱ्याचा कंटाळा आला होता. वीट आला होता. ती त्याला वारंवार जीव ायची अगर कुठेंतरी निघून जायची वारंवार भीति घाली. एके दिवशीं ती ारोखरच निघून गेली !

ती ज्या दिवशीं घराबाहेर पडली त्या दिवशीं त्यानें बरीच धांदल केली. ाच्या गांवचे लोक पोलिसात होते. त्याच्या सहाय्यानें त्याने पोलिसांत तक्रार केली ! पोलिसांनीं विवाहित स्त्रीस फूस लावून नेल्याच्या आरोपाखालीं त्या गुजराथ्यास टक केली.

पोलिसांनीं त्याला धाक दिला व मारण्याची भीति दाखविली. तो पोलिसाच्या ांगला ओळखीचा होता. ' हिरालाल गांधी ' म्हणजे प्रसिद्ध व्यक्ति होती ती. ंबईत त्याच्या पानाच्या बऱ्याच गाद्या होत्या. सर्व व्यसनी लोक त्याच्या मागें सत. पोलीस जेव्हा त्याला मारण्यास सरसावले तेव्हा त्याच्या बायकोनें त्यास ळखा दिला ! पोलिसाचे एकदोन फटकेही तिच्या हातावर बसले !

ती ओरडूं लागली. 'नका नका, त्याना मारूं; त्यांचा अपराध नाय. त्यानीं य मला पळवली. सोडा–सोडा त्याना. अन्याव माझा हाय. मला मारा–माझ्या- ; खटला भरा. पाहिजे तर फासावर चढवा मला.'

पोलीस थांबले व म्हणाले,

' तूं नवऱ्याकडे जा–याला सोड. या सटोडियाच्या ( सट्टेबाजाच्या ) मागें ाला लागतेस ? '

तिनें उत्तर दिलें 'तो चोर असला सटोडिया असला तरी बी हरकत न्हाय. मी ्याकडच जाईन; पण नवऱ्याकडे राहणार नाय. पहा, पहा ! नवरा काय र तो ! मी कशी त्याच्याजवळ राहूं ? '

' अग, त्याच्याबरोबर तूं लगीन केलें हायस ना ? '

' असल. '

'असल काय? त्याच्याबरोबर तुला राह्यलं पाहिजे.'

'मी साफ सांगते. मी नाय राह्याची त्याच्याकडे?' व ती रडूं लागली.

तिचा निर्धार पाहून पोलीस चपापले. त्याना त्या बाबतींत कांहींच करतां येत नव्हतें! त्यानी हिरालालला सोडून दिलें!

कायदा व शिस्त पाळणारे एवढे बलाढ्य पोलीस; पण या बाबतींत त्यांना कांहींच करता येत नव्हतें! हें पाहून अर्जूनला विस्मय वाटला! ते त्याला मदत करण्याऐवजीं त्यालाच हंसत होते. त्याची टर उडवीत होते. त्याला कांहीही करता येण्यासारखें नव्हतें. त्या दिवशीं त्याची मनःस्थिति ठिकाणावर नव्हती म्हणून त्याच्या हातून चूक झाली.

ही त्याची हकीकत ऐकल्यावर साठे म्हणाला, 'कळलें का बाबा, हा कशाचा परिणाम तो? हा मुंबईच्या रहाणीचा परिणाम. मुंबईचें वातावरण असेंच आहे; जिथें पहावें तिथें प्रेम, भपका, नाच, रंग अन् तमाशा. आपण तर या मुंबईच्या विरुद्ध आहों! तुझी बायको तुला टाकून गेली हें आम्हाला पाडूनें केव्हाच सांगितलें होतें!'

'तो पांड्या व्हय?—हायच माझ्या हितावर! मास्तर याला नोकरी मिलत नव्हती. खायाला काय बी नव्हतं. तवा मी माझ्या घरीं ठेवला, खायाला घातला. त्यानं मला एक दिडकी पण दावली नाय बघा!'

'दुनिया अशीच आहे. आज काल कुणाचें बरें करूं नये म्हणतात-तें उगीच? नशीब तुझं!'

'नशीब—नशीबच लई वाईट हाय. मास्तर तुमचें बी नशीब कस हाय तें बघा. तुम्ही वकीलीची परीक्षा देऊन पन्नास तोळे कराची, ऐंशी तोळे अमदाबाद करीत बंग्या तोलण्याची पाळी हाय का तुमच्या नशिबांत! ब्यागा तयार नव्हत्या. चार पाच ब्यागाना सिलें करायचीं होतीं. तुम्हीं मेललिस्ट व लेबलं माझ्या हातात दिलींत व मी धादलीनें या ब्यागेचें लेबल दुसरीला लावलें. इतक्यात सुपरवायझरची घंटी वाजली व तो निघून गेला.'

मास्तर अर्जूनकडे पहात मनांत म्हणाले, 'त्याची बायकोच काय, पण कोणतीही जाणती स्त्री असल्या अष्टवक्रावर भाळली नसती हे खरें, पण आपल्या समाजात अशीं कितीतरी जोडपीं निरनिराळ्या व्यंगांनीं, निरनिराळ्या कारणासाठीं अहर्निश दुःखांत होरपळत आहेत व जोपर्यंत कायद्यांत दुरुस्ती होत नाहीं तोंपर्यंत, असल्या गोष्टी घडल्या नाहींत तरच आश्चर्य!'

*

# ' शंभर वर्षांपूर्वी '

साष्टी तालुक्यात एक खेडें आहे. त्या खेड्यांत बहुतेक ख्रिस्ती लोकांचीं वस्ती आहे. हे ख्रिस्ती लोक मूळचे हिंदु होते; पण अगदीं अखेर अखेर त्यांना पोर्तुगीज लोकानी बाटवून टाकलें होतें. ख्रिस्ताच्या आज्ञेप्रमाणें त्याना त्यांच्या धर्माचा प्रसार करावयाचा होता. आणि त्याच हेतूनें त्यानीं आपलें काम चालविलें होतें !

त्या काळचे लोक धर्मभोळे असल्यामुळें, मनुष्य खाण्यापिण्यानें बाटतो, अधर्मी होतो, या समजुतीनें ते विधर्मी बनले होते. त्याच्या रीतिभाती, बरींच वर्षें ब्रिटीशअमदानी खालींही, हिंदूंच्याच होत्या. अद्याप देखील तिथले बरेच लोक धोतरें व लुगडीं वापरतात. त्या काळीं तिथे ख्रिस्ती देवालयें नव्हती. त्याचे धर्मोपदेशक नव्हते. शुद्धी करून त्याना पुन्हा हिंदुधर्मात घ्यावें, असें त्यावेळच्या हिंदू धर्मगुरूंस वाटलें नव्हतें. आणि कुणाला वाटलें असले तरी, तसें करायला सत्ता नव्हती ! सत्तेशिवाय काय करता येतें ? पोर्तुगीजाची सत्ता नामशेष झाल्यावर देखील काही वर्षें ख्रिस्ती धर्मोपदेशक जोंपर्यंत तिथें एकसूत्री अंमल झाला नव्हता तोपर्यंत, तिथे जाऊन धर्माचे संघटण करण्यास धजत नव्हते ! मात्र, जेव्हा त्याना सत्ता होती तेव्हा, त्यांनीं हिंदूंस खासगी देवालयात पूजाअर्चा करण्याची मनाई केली होती. देवालयें मोडून टाकलीं होतीं. वेदपठण, होम, याग, सार्वजनिक उत्सव बंद केले होते. प्रत्येक घराची झडती घेऊन तिथून देवांच्या मूर्ती हुसकून टाकल्या होत्या. मनाई केलेले धर्मसंस्कार करतांना व मूर्तीपूजा करताना कुणी आढळला कीं, त्याला ते देहांत शिक्षा देत होते व त्याची मालमत्ता जप्त करून त्यांतील अर्धा भाग ते जेसुइट पाद्र्यांस देत होते व अर्धा हिस्सा तसली बातमी देणारास बक्षिस म्हणून देत. अशा रीतीनें धर्म-

च्छलाचा त्यानीं अतिरेक केला होता. लोक असंतुष्ट झाले होते म्हणून चिमणाजी अप्पानें लोकांच्या आग्रहावरून वसईवर स्वारी करून वसई व त्यालगतचे प्रांत काबीज केले होते. पुढें लवकरच दुर्दैवानें त्यांची सत्ता विलयाला गेली व ब्रिटिश साम्राज्यशाही स्थापन झाली व सर्व स्थीरस्थावर झाल्यावर गोव्यांचे धर्मोपदेशक या भागांत येऊन धर्माचें शिक्षण देऊं लागले. त्यानीं पाहिलें कीं, या लोकांना धर्माचें शिक्षण देणारा कुणी नाहीं, हिंदु लोक त्यांना हिंदू म्हणत नाहीत. आणि ते स्वतः किरिस्तांव म्हणून म्हणून घेत होते. ही गोष्ट प्रचारकांनीं त्याच्या मुख्य धर्मोपदेशकास कळविली. त्यानीं या ठिकाणीं त्याचीं देवालयें स्थापन केलीं व त्या देवळात पाद्रीची नेमणूक करून, त्याला जोडून शिक्षण देण्याकरिता शाळा घातल्या. पाद्री गावांतून जाऊं लागले म्हणजे हिंदू लोक भीतिनें आपले दरवाजे बंद करून घेत.

पाद्री लोकांनीं घरोघर जाऊन लोकांस रविवारीं काहीं करूं नये, बायका मुलानी सकाळीं देवळात येऊन प्रभूच्या मिसाला-मासला जावें, मुलांना देवळाच्या शाळेंत घालावें असे सांगितलें. त्यानीं घरोघर ख्रिस्तवासी प्रभूचें चित्र त्याना प्रत्येकाला गळ्यात बांधण्याकरिता दिलें.

पाद्री लोकाना सत्ता नसल्यामुळें कुणावर सक्ती करता येत नव्हती. तरी पण ते चोरून हिंदूधर्म कोण पाळतो, मूर्तिपूजा कोण करतो याची चौकशी करीत.

चहाड बुचके लोक प्रत्येक काळात आढळावयाचेच ! त्या काळींही असले लोक होतेच ! मतेस हिंदुच्या पोथ्या वाचतो, हिंदूचे सण करतो, देव पुजतो, हें अंतोनला ठाऊक होतें. अंतोन चहाडबुचका होता. त्याला ती चहाडी त्याच्या पाद्रीला करावयाची होती. तो मिस आटोपलें म्हणजे थाबून राह्यचा, पाद्रीबरोबर इकडतिकडच्या गप्पा करायचा; पाद्रीकडे चहापाणी घ्यायचा. गप्पा करतां करतां पाद्री त्याला विचारी,

‘ गावांमंधी हिंदूचा घरम कोणीं किरिंस्तांव–पालते काय– रें ? ’

तो म्हणायचा ‘ मतेसच्या घरीं हिंदूच्या पोथ्या वाचतात, हिंदूचे सण करतात. मूर्तींची पूजा करतात. ’

‘ हिंदूंचें देव पूजून त्यें हिंदू होंतील कांयरें ? येंडे हांयत. मेंल्यावर प्रभूच्याच मेंरे येंवाला लागेल नां– रें त्येना ? आपुंन-तेंच्या घराला जाव–त्याच्या मेरच्या पोंथ्या घेऊन येंव. उंद्याला सवारूच यें. मंडपेसरचा, गोंरायचा, उत्तनचा पाद्री येंवाचा हाय. सगळे मिळून तवार जाव. ’

ठरल्याप्रमाणें दोन तीन पाद्री व कांहीं गांवचे लोक मतेसच्या घरीं अचानक आले. मतेस त्याच्या आईला पोथी वाचून ऐकवीत होता. पाद्री गेले तरी मतेसनें वाचन तसेंच चालू ठेवलें होतें. पाद्रीला तो अपमान वाटला. त्यानीं त्याला दरडावून विचारलें, 'ये काय वाचते–रे –आं ? तुजा धरम काय हाय ? प्रभूचं गींत गा. मेल्यावर सर्गाचा दरवाजा खुला राह्याला पांयजे का नाय तुला ? येड्या कोंकरा-हिंदूची पोंथी वांचून तुला सर्ग जायंत कांयरें ? अवार हान ती पोथी. अंतोन, बघतेस काय घे त्याचे मेरची पोथी न त्याचे मेरे मूर्ती हान का पहा.'

अंतोन घरात गेला. त्यांनीं त्याच्या आईकडून देवाच्या मूर्ती घेतल्या. मतेस गप्प उभा होता. अंतोननें पाद्रीला हळूच घरातली साधूची तसबीर दाखविली.

पाद्री म्हणाला,

'—यें रे कोनांचं चित्र ? हिंदूचा साधू हाय ओ ! तुंला कशाला पायजेरे तें ! ते पन हान अवार.'

मतेस म्हणाला,

'साहेब पोथ्या न्या, सगळं न्या, देव न्या,; पण हे चित्र राहूं द्या. हें चित्र नेऊं नका.' त्यानें ते चित्र घट्ट धरलें व तो रडूं लागला.

पाद्री म्हणाला,

'तुम्ही हिंदू न–व्हा. तें चिंत्र काढून टांकलं पांयजे. अंतोन, बंगतेंस काय तेव ( ते सुद्धा ) काढ.'

अंतोननें मतेसला बाजूला ढकललें व ती तसबीर काढून घेतली !

पाद्री त्याला म्हणाले,

'दुमचां धरम खिश्चन हाय. तुमी खिंताला भजा. त्याचें गींत गा. देवला मधें या.'

मतेसला ते खिश्चन कसे झाले होते ती हकीकत त्याची आई पावलोवा–पावली हीजकडून कळली होती. अग्निहोत्राचें त्याचें घराणें होतें. त्यांचें नावही तेंच चालत होतें. त्याचे घराणें नामांकित असून त्यातील कांहीं लोक पिढीजात वैद्य होते. कुणी भिक्षुक होते, कुणी ज्योतिषी होते. मतेसचा चुलता आनंदराव साधारण मध्यम वयाचा होता. मतेसच्या आईचें लग्न नुकतेंच झालें होतें. ती दहा वर्षांची होती. त्याचें घर उत्तन येथें होतें. तिथें पोर्तुगीजांचा हल्ला गेल्यामुळें त्यांच्या आजोबा खापरपणजोबांनीं अग्निहोत्र सांभाळण्यासाठीं, शेती, भाती, घरदार

यांवर लाथ मारून ते तिथें येऊन राहिले होते. हें खेडें बाजूला होतें. ते जवळ पासच्या हिंदु लोकांत वैद्यकी व भिक्षुकी करून त्यांचा उदरनिर्वाह करीत होते.

आनंदराव आषाढी एकादशीनिमित्त पंढरपूरास निघाले. त्याच्याबरोबर त्याचे यजमानही होते पंढरपूरला जायला तेव्हा आतासारख्या सुखसोई नव्हत्या. त्यांना खुष्कीच्या मार्गानें बैल गाडींतून प्रवास करून जावें लागे. त्यामुळें यात्रेच्या सुमारे दोन महिने ते आगाऊ निघाले होते. वाटेंत मुक्काम करीत करीत त्याना पंढरपूर गाठावयाचे होतें. पोर्तुगीज लोकाचे जुलूम बहुतेक अस्तित्वांत नव्हते. ब्रिटिश सत्ता आल्यामुळें, सर्वत्र शांतता झाली होती. पण दुर्दैवानें त्याच वेळीं, काहीं पोर्तुगीज लोक रात्रीस खाडींतून उतरले व त्यांनीं तेथील लोकांना लुटले ! त्यानी लोकाना जुलमानें धरलें, त्यांच्या शेंड्या कापल्या, तोंडात पावाचे तुकडे कोंबले व त्या गावचीं पाच पंचवीस कुटुंबें बाटवून टाकलीं व तेथून ते निघून गेले. तिथे सर्व आहाक्कार उडाला. ते लोक खिस्ती झाले !

आनदराव तीन चार महिन्यानें परत आले. घरातल्या मंडळीनें त्याना सर्व हकीकत सागितली. घरच्या मंडळींना वाटले, काहीं लोकाचे दूर गेलेले नातेवाईक परत आल्यावर त्याची मंडळी बाटलेली पाहून त्यात मिसळून बाटून गेले तसेच आनंदरावही खिश्चन होतील; पण आनंदराव खिस्ती धर्म स्वीकारण्यास बुद्धीपुरस्सर कबूल नव्हते. त्याना परधर्म भयावह वाटत होता. ते म्हणाले, ‘ मर्जी पाडुरंगाची ! आमचा धर्म रहावा, अग्निहोत्र रहावे म्हणून आमचे वाडवडील मालमत्तेवर लाथ मारून इथे या खेड्यांत येऊन दारिद्र्यावस्थेत राहिले; पण अखेर तो प्रसंग आमच्यावर कल्पना नसताही येऊन ठेपला. तुमच्यावर जुलूम होऊन तुम्ही भ्रष्ट झाला, माझी गोष्ट तशी नाहीं. मी आता या घरीं पाणी ग्रहण करणार नाही. मी घराला मुकलों. त्याच्या बरोबरचे लोक त्याच्या कुटुंबांत जाऊन मिसळले. ते त्याना म्हणाले, ‘ तुमची सर्व मंडळी बाटली आता तुम्हीं बाजूला राहून काय करणार ?’

‘ काय करणार ?—हा पहा–मी चाललो ! ’ त्यांनीं त्याचें जानवें तोडलें, अंगाला राख फासली व ते रस्ता चालूं लागले. या लहानशा गावात सहा सात जातीचे लोक होते. ते बाटल्यामुळे त्याची एकजात झाली. त्याचीं धर्माचीं बंधनें एकदम सुटली गेलीं. जेव्हां असले प्रसंग येतात तेव्हा, उच्च कुळातल्या बायका हीन कुळात मिसळतात व त्यामुळें, त्या दुर्वर्तनी, अनाचारी, व्यभिचारी, शीलभ्रष्ट

अशा होतात पण मतेसची आई सुशील होती. ती जरी बाटली होती तरी, तिला कुणाचे वाईट गूण लागले नव्हते. तिचा आचारविचार भ्रष्ट झाला नव्हता. भागेत तुळस ज्याप्रमाणे शोभते त्याप्रमाणें ती त्या भ्रष्ट लोकात शोभत होती. ती देखणी होती. तिचा नवरा मात्र, धर्माचीं बंधनें सुटल्यामुळें, उच्चनीच एक झाल्यामुळें व खाण्यापाण्याचा विधिनिषेध न राहिल्यामुळे दुर्वर्तनी व छांदिष्ट निघाला. तो दारू पिऊं लागला. त्यानें मतेसच्या आईस फार त्रास दिला. मतेसच्या आईला बरींच वर्षे मूल झालें नव्हते. पण ती सुमारे वीस वर्षांनीं गरोदर राहिली होती. तिच्या गर्भार अवस्थेंतच तिचा नवरा दारूच्या व्यसनाला बळी पडला! ती विधवा झाली!

आनंदराव विधूर होते, त्यांना मूल बाळ नव्हतें. त्यानीं संन्यास घेतला व ते तीर्थाटण करीत फिरत होते. ते चांगले वैद्य होते. त्याचा साधू व तपस्वी लोकाबरोबर परिचय झाला होता. त्याच्याकडून त्यानीं वनस्पतींचा व योगाचा अभ्यास केला होता. ते गावोगाव श्रीमंत, गरीब, जातपात याचा भेद न मानतां गरजूंस औषधें देत प्रवास करीत असत. त्याचा चेहरा छाप पाडणारा, डोळे अधिकारी, सतेज, वर्ण गौर, बांधा मजबूत, उंची भरभक्कम अशा तऱ्हेचा होता. ते फिरत फिरत या खेड्यात येऊन दाखल झाले होते. त्यानीं दुसऱ्या साधूंबरोबर या गावीं चार दिवस वास्तव्य केलें.

हे साधू जिथें जात तिथें त्याच्या मागें पिंडीत लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटत. ते त्या सर्वांना शांतपणें पाहून औषधे देत. रोग्याच्या अंगावर हात फिरवीत. कित्येकाच्या अंगावर मंत्रून पाणी मारीत. कित्येकास अंगारा देत.

मतेसच्या आईला तीन चार दिवस कष्ट पडले होते. ती व्याकूळ झाली होती. शेजारच्या लोकानीं एक बाई अडली आहे अशी माहिती त्या साधूला दिली. तो साधू तिथें गेला. साधूनें त्याचें घर ओळखिलें. बाईला पाहिली. ती बाई हात जोडून त्याच्याकडे निरखून पहात होती व रडत होती. त्यानीं तिला अगदीं लहान असताना पाहिली होती. तिचे त्यानींच लग्न केलें होतें व तिला आपल्या मांडिवर आणली होती. तीच ती मुलगी होती! ती विधवा होती हेही त्यानें जाणलें! त्यानें घरात सभोंवार नजर टाकली. एक पेला मागितला त्यांत कमंडलूतलें पाणी ओतून त्यांत राखेसारखी पूड सोडली

व तें पाणी तिला पाजावयास सांगितलें. तो अंगणात जाऊन आंब्यांच्या झाडाखालीं आसन ठोकून डोळे मिटून ध्यानस्थ बसून राहिला. सुमारें तासाच्या आंत त्या बाईची सुखरूपपणें प्रसूती झाली. मूल रडूं लागलें. मुलाचा आवाज ऐकल्यावर साधूनी डोळे उघडले, सूर्याला अर्घ्य दिले व औषधांची योजना केली.

त्यानी जातांना त्याच्या बटवीतून त्याचें स्वतःचें दंडधारी चित्र काढून त्यावर ' आनंद मूर्ती ' म्हणून लिहीले व तें चित्र आठवण म्हणून त्याना साभाळून ठेवण्यास सांगितलें !

मुलगा सतेज, सुंदर होता. तो वाढला त्याला देवळांत नेऊन त्याचा बाप्तिस्मा केला व त्याचें नाव म्याथ्यू असें ठेविलें. त्याला मतेस म्हणून म्हणत. तो मोठा झाला. शेजारच्या त्याच्या जातभाई जवळ मराठी शिकला. त्याच्या घरात हरीविजय, रामविजय, पाडवप्रताप वगैरे ग्रंथ होते. त्याचें त्यानीं अध्ययन केलें. गीतेचे श्लोक पाठ केले. रामदासाचे श्लोक, तुकारामाचे अभंग त्याला मुखोद्गत येत होते. तो व त्याची आई त्या साधूला नेहमीं नमस्कार करी. दर गुरुवारी त्याला हार घाली.

मतेस मोठा पुरुष झाला होता. त्या गावांत नुकतेंच पाद्री लोकानीं देवालय बांधलें होतें. त्या देवळात गावातल्या लोकाना प्रार्थनेसाठीं सामुदाईक रितीनें जमावें लागे.

मतेस व त्याची आई पावली तिथें प्रार्थनेसाठीं जात असे. मतेस तिथें गेला म्हणजे (किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वाद्रष्टुमहं तथैव) वगैरे श्लोक डोळे मिटून म्हणे. तेव्हा त्याच्या चक्षूं पुढें श्रीकृष्णाची सावळी मूर्ती दिसे व तो सद्गदीत होई.

तो हिंदूचे श्लोक म्हणतो. तुकारामाचे अभंग म्हणतो. हिंदूच्या देवळापुढें जाऊन लाब उभा राहून देवाचें दर्शन घेतो, त्या देवाची प्रार्थना करतो, घरात हिंदूच्या देवाची चोरून पुजा करतो हें अंतोनला माहीत होतें. अंतोनला तें आवडत नव्हतें ! अंतोन पाद्रीला सागेल ही त्याना भिती होतीच. अंतोन पाद्री-बरोबर जात होता येत होता. तिथें त्याची चंगळ झाली होती. गांवच्या सर्व चहाड्या तो पाद्रीला सांगत असे. आणि त्याच्याच सागण्यावरून पाद्री त्याच्या घरीं गेले होते. त्यानीं त्याच्या घरच्या पोथ्यापुराणें नेल्याबद्दल त्याला वाईट वाटत नव्हतें; पण त्या साधूचें चित्र नेल्याचें दुःख होत होतें. त्यानीं त्याकरितां अन्न पाण्याचा त्याग करून उपोषण सुरू केलें होतें. तो कांहीं खात नव्हता म्हणून, पावलीही उपास

करीत होती. उपासाच्या तिसरे दिवशी ती पाद्रीकडे गेली व त्याला पदर पसरून म्हणाली,

' चित्र नेल्यापासून माझ्या मुलानीं अन्नपाणी घेतलें नाहीं. कृपा करून तें चित्र देऊन टाकाल तर माझ्यावर अनंत उपकार होतील ' तिने पाद्रीस तें चित्र त्यांना कुणी दिलें होते, कसें दिलें होतें ती सर्व हकीकत सांगितली. पाद्री ती गोष्ट ऐकून थक्क झाला ! त्यानीं विचार केला.

येशू असाच मुलाबाळावर ममता करीत पिडीतास कवटाळीत व त्यांचीं दुःखें हलकी करीत फिरत होता. तो म्हणाला, 'बाई येशूच तो. तुझी सोडवण करायला आला बघ ! चित्र मिळाल्यावर तुझा सोकरा ( मुलगा ) उपास सोडील असा असेल तर त्ये चित्र गेऊन जा. ' त्याच्या आईला आनंद झाला. तिनें प्रभूची प्रार्थना केली व ती तें चित्र घेऊन हंसत घरीं आली. त्यानें उपास सोडला. आईनेंही पेज घेतली.

ते पाद्रीच्या सांगण्याप्रमाणे दर रविवारीं देवळात जात. पाद्रीचे मास (प्रवचन) सुरू झाले कीं, तो भजन म्हणे. टाळया वाजवी. त्याचे लक्ष त्या प्रवचनाकडे लागत नसे. तो आईला सांगे,

' मी देवळात गेलों की, मला अंगणातला क्रॉस दीपमाळीसारखा दिसतो. मावलीचा चेहरा मला अष्टभूजादेवीसारखा वाटतो, खिस्ताजवळच्या मेणवाती मला पाजळत असलेल्या चकचकीत समया वाटतात. क्रॉसवरला प्रभू मला मुकुट घातलेली व मुरली वाजवीत असलेली श्रीकृष्णाची सावळी मूर्ती दिसते. येशूच्या जवळचे कुत्रे व मेंढरें मला गोकुळातल्या गाई वाटतात. व्यासपिठावरचा पाद्री पाद्री नसून आनंदमूर्तीचा भास होतो. मी झोपलों की, स्वामी स्वप्नात येतात. माझ्या डोक्यावर हात ठेवतात मग मला स्वर्ग दिसूं लागतो.'

आई तें ऐकून हंसे व कांहींच म्हणत नसे.

अंतोन त्यांच्या पाठी होताच. त्याने मतेस भजन करतो, मास ऐकत नाहीं असे पाद्रीला सांगितलें. पाद्रीला त्याचा राग आला. एके दिवशीं देवळातले सगळे लोक घरीं गेले तरी, मतेस आपला तिथेच भजनात दंग झाला होता पाद्री त्याच्या व्यासपिठावरून उतरला व त्याच्या पुढें येऊन उभा राहिला. त्याच्या डोकींत कांहीं नव्हतें, अंगांत गळ्याभोंवतीं पांढऱ्या झालरीचा काळा पाया पर्यंत लांब असा झगा

होता. पायांत बूट होते. मतेस ईश्वर भजनांत इतका गुंग झाला होता कीं, त्याला कशाचेंही भान राहिलें नव्हतें ! पाद्री तो काय म्हणतो तें लक्ष लावून ऐकत होता.

मतेसनें ब्रह्मानंदांत ' आनंदमूर्ती आनंदमूर्ती–आनंद... ' असें त्रिवार म्हणून समोर असलेल्या पाद्रीस घट्ट मिठी मारली व तिथेंच आपला देह ठेवला ! त्याला मुक्ती मिळाली अशी त्याकाळच्या लोकाची समजूत झाली पण, आत्तांचे लोक म्हणतात कीं, मतेस पाद्रीला भ्याला असावा व त्याची हृदयक्रिया बंद पडली असावी !



# दोन समंध

**मी** कचेरींतून घरीं येत होतों. मला आज रोजच्यापेक्षां अमळ उशीर झाला होता. घराजवळ आल्यावर लांबून घराकडे पाहण्याची संवय होती मला. मीं घराकडे पहात होतों. माझी स्नेहलता तान्ह्या शरदला घेऊन रोजच्या थाटांत मोठ्या आतुरतेनें वाट पहात होती.

मला पहातांच तिनें मुरकून, हळूच हास्य केलें व ती शरदच्या गालाला बोट लावून म्हणाली,

'तें पहा कीं–कोण रे आलं ? खाऊ आणला असेल हं बाळाला.'

मी वर आलों. माझे कपडे काढणार इतक्यात, माझ्या सौभाग्यवती हातांत तार घेऊन मोठ्या आनंदानें म्हणाल्या,

'दादासाहेब यायचे आहेत बरं का आज, अन् बोलावलंय आपणाला स्टेशनवर. गाडी साडेसातला येतेय, आणखी पांच मिनिटें वाट पाहून मीच जायचा विचार केला होता स्टेशनवर.'

'मग मला जरा उशीर झाला असता तर माझा त्रास चुकला असता. अजून जा कीं तूंच.'

'हं–हं आता बरी जाईन—जा तुम्हींच.'

'अच्छा–चला तर मग, निघालें पाहिजेच.',

मी जायला निघालों.

'नाहीं. चहा घेऊन जायचं !—आधण ठेवलंय.'

'छे–छे, आहे कुठें वेळ इथें. चहाबिहा काहीं नाहीं. घेऊं तो दादासाहेबांबरोबरच' असें मी घाईघाईनीं म्हटलें, शरदचा गालगुचा घेतला, अन् स्टेशनची वाट धरली.

स्नेहलता शंकरपाळ्यांची बशी झांकून ठेवण्याकरितां स्वैपाकघरांत गेली! बशीला शरदचा धक्का लागला अन् ती पालथी झाली, खाली पडली व फुटली. सौभाग्यवतीच्या मतानें तो अपशकून झाला होता. ती एकदम म्हणाली,

'अवखळ कुठचा! काय हें भलत्या सलत्या वेळीं! अगदीं स्वस्थ नको राह्यला कार्ट्याला; सदानकदा माझ्यामागें पाहिजे मरायला.'

पायांत वाळे व कमरेंत साखळी असलेला शरद, सांखळीचे वाल एका हातानीं चुरीत ओशाळा झाला व त्यानें आईच्या कमरेला विळखा दिला.

गाडी अन् मी एकदमच स्टेशनमध्ये शिरलों. उतारू भराभर आपआपलें सामान काढून उतरत होते. दादासाहेबाचा कुठे पत्ताच नव्हता! मी काळजींत पडलों व विपण्ण मनानें घरी परतलों! रात्र काळोखी होती. अंधार पडला होता. ब्रिजवर दिवे होते. दोन्ही रेल्वेच्यामध्यें टिळक ब्रिजकडे जायला एक वाट होती. त्या गल्लीच्या तोंडावर एक शंकराचें देवालय होतें. एक लायब्ररी होती व थोडीं फार झाडें दिसत होतीं. जरी तेथे गुडूप अंधार नसला तरी, मनुष्य अगदीं पुढें आल्याखेरीज ओळखण्याइतका प्रकाश खास नव्हता!

मला याच रस्त्यानें टिळक ब्रिजवर जाण्याची कुबुद्धी झाली.

मी देवालयास नमस्कार केला व वाट चालत होतों. इतक्यात 'साल्या थाब' असे दांत ओंठ चावून एक मनुष्य माझ्या मागून धांवत आला व त्यानें माझी मान पकडली. मी त्याला एक पेंच टाकून खालीं पाडला पण तो लगेच उलट फिरला व माझ्या छातीवर बसला. मी 'आई' ओरडलों!

माझें भान क्षणभर नष्ट झालें. पुन्हा मी शुद्धीवर आलो, पहातों तों. माझीं आंतडीं कापलेलीं!

'दुष्टा, काय मिळवलेंस मला मारून?' आता या चांडाळाबरोबर बोलून काय अर्थ? मी आपलें परमेश्वराचें चिंतन चालू ठेवीत या जगाचा निरोप घेतला!

* * * *

माझ्या आत्म्यानें लगेच तसेंच रूप धारण केलें. पण ती छाया होती त्या छायेला माझें शरीर तिथें टाकून जाववत नव्हतें! ती त्या देहाच्या भोंवतीं, सारखी घिरट्या घालीत होती. तिला विचार होता, भावना होत्या, द्वेष होता सर्व कांहीं होतें.

महाराज, आपण वर्ष सहा महिने ज्या भाडोत्री घरांत रहातों, तें घर सोड-तांना सुद्धां आपणांला वाईट वाटत असतें. मग ज्या सुंदर तनूंत माझ्या जिवानें अत्यंत सुखानें, आनंदानें दिवस काढले होते त्या जिवाला तें शरीर सोडताना दुःख झालें, तर आश्चर्य कसलें !

माझ्या आत्म्याला जाणीव होती. त्यानें विचार केला, 'आता या शरीराच्या मागें लागून काय उपयोग ?' एक विचार आला, ज्यानें माझा जीव घेतला त्याच्याच मानगुटीवर जाऊन बसावें. एकदां वाटलें, माझ्या बायका मुलांकडे जावें, पण लगेच, मला माझ्या कर्तव्याची जाणीव झाली, अन् तेंच कार्य पार पाडावें असा विचार करून मी त्या चांडाळाचाच पाठलाग केला.

तो चाडाळ हें दुष्ट कृत्य करून काळोखात पन्नास साठ पावलावर बसला होता. त्याच्या डोळ्यावरचा खून उतरला नव्हता. ज्या चाकूनें त्यानें माझ्यावर वार केला होता त्या निर्दय चाकूकडे तो भेसूर दृष्टीनें पाहात होता. आता त्याला भय वाटत होतें. तो तिथून उठला, उजेडात आला. तेथें पडलेली आरशाची फुटकी काच उचलली व त्यांत त्यानें आपलें क्रूर रूप पाहिलें ! त्याचे हात रक्तानें माखले होते. रक्ताच्या अंगावर चिरकाड्या उडाल्या होत्या. तसलें रूप घेऊन सडकेवर पडण्याचें धाडस होत नव्हतें त्याला ! त्या बेरडाला—तो खून पचवावयाचा होता. त्यानें तो चाकू मातीनें पुसला व दूर फेंकून दिला. कोट काढला व त्यानें हात पुसले, कोटावरच्या डागावर धूळ चोळली व त्याचा चोळामोळा करून टाकून दिला. सदऱ्यावर कुठें रक्ताचा डाग नसल्याची खात्री केली व डाव्या हातांनीं घाम निप-टीत जणूं आपण काहीं केलेंच नाहीं अशा आविर्भावानें तो रस्ता चालूं लागला. तो बावरल्यासारखा आवतीं भोंवतीं पहात जात होता. त्याला समाधान वाटत नव्हतें. दुकानें बंद व्हायला बराच अवधी होता. माझ्या खिशातले सुटे पैसे आपल्या कनवटीला लावले होते त्यानें. अट्टल तो ! दुकानात शिरला व मनाला शात करण्यासाठीं मनसोक्त दारू प्याला. कित्येक दारुडे नशा केल्यावर बडबडत राहतात. हा तर झाला कीं, झोपून जायचा. कलालाच्या दुकानातून घेतलेले चण्याचे चार दाणे तो एकामागून एक तोंडात टाकीत खुषाल घरीं आला व झोंपला.-

हा झोपला म्हणजेच आपण आपलें भक्ष शोधण्यासाठीं जवळपास फिरायचें असें मी ठरवलें व रोज रात्रीं बारा वाजता पिंपळाला प्रदक्षिणा घालायच्या ठरवून सदोदीत त्याच्या बरोबर राह्यचें, तो जाईल तिथें जायचें असें ठरविलें !

अंजनी माझी बहीण तिच्या जवळ थोडी पुंजी होती. दागदागिने होते. याची नजर तिच्यावर होती. तिला तो थापा मारून बनवीत होता. लुबाडीत होता. याला एका पाठी एक असे सर्व नाद लागले. त्याच्याच गुणाचे त्याला स्नेही मिळाले. तो सट्टे रेस खेळू लागला व वेळोवेळीं पठाणाकडून रकमा उचलू लागला. अजनीला त्यानें पार मारून टाकली ! त्याचे व्यवहार इतके गुंतागुंतीचे झाले कीं, त्याना एकमेकांना एकमेकांपासून सुटणें अगदी दुरापास्त झालें ! त्याने पैशासाठी तिला छळ छळ छळली आणि तिच्या जवळची माया संपल्यावरही ती पैसे देत नाहीं म्हणून, तिचा त्याने एके दिवशी खून केला ! सर्वच गोष्टी मी पहात होतो. तिचा खून केलेलाही मी पाहिला होता. तिचा खून झालेला पाहून, मला अतोनात दुःख झालें. मी रड रड रडलों ! माझा आक्रोश पाहून, माझ्याच सारखी दुसरी एक व्यक्ती माझ्या जवळ आली आणि माझी पाठ थोपटून म्हणाली,

‘ धन्य आहेस ’ अंजनीनें याच्या नादी लागू नये म्हणून तूं कसकसे प्रयत्न केलेस हे मी प्रत्यक्ष पाहिलें आहे. तिनें त्याची पर्वा केली नाहीं. त्याला इलाज नाही. त्याचे तिला प्रायश्चित मिळालें आहे. आज माझ्या अंजनीचा या दुष्टानें बळी घेतल्यामुळें माझें कार्य संपलें आहे पण, दक्षिणायन असल्यामुळें आणखी थोडे दिवस मला असेच कुठे तरी भटकून काढावयाचे आहेत, ते मी या पिवळ्या घरासमोरच्या पिंपळावर बसून काढणार आहे. तिथें येऊन मला भेटत जा.

‘ का—बाबा ? आमच्याबद्दल आणि आमच्या कुळांतील प्रत्येक माणसाबद्दल जिवंतपणीं तुझें काय मत होतें, तें आम्हीं विसरलों असूं काय ? प्राण्या, तुमचें आम्हीं कोणतेहि वाईट केले नसतां, तूं आपल्या बायका मुलांना आमच्याबद्दल द्वेष भरवून दिलास, आमचें तोंड पाह्यला तयार नव्हतास, आमच्याशीं अकारण शत्रुत्व केलेंस आणि आज पाठ थोपटून मारे माझी मैत्री जोडायला तयार होतोस ? काय-काय याचा अर्थ ? ’

‘ विजयकुमारा, दुःखावर डागण्या देण्यात काय अर्थ ? मला माफ कर. मी तुझा अपराधी आहे. ती माझी भूल होती. तो माझ्या स्वभावाचा दोष होता. मी माझ्या कुढया स्वभावामुळें, रोगग्रस्त झालों व अकालीं मेलों ! मला माझ्या बायका मुलांची काळजी राहिली व म्हणून ही योनी प्राप्त होऊन, मी माझ्या बायकोच्या सान्निध्यात अहर्नीश वास केला.

मला हरघडी माझ्या घरांतील वागणूक पाहून वीट येई. राहूं नयेसें वाटे; पण माझी सुटका मला करून घेतां येत नव्हती ! जे चाळे मी कधीं बापजन्मीं केले नव्हते; ते मला बघवत नसत. माझ्या निढळ्या कमाईचा नाश, मला पहावत नव्हता ! मी दुःख करून घेत असे. डोळ्यातून सहस्र टिपं गाळीत असे. मी स्वतः हाल भोगून, बायका मुलाच्या हितासाठी, कुटुंबद्रोह करून भोळ्या भावा-बाधवांना फसवून पैसा ठेवला. अरेरे ! माझ्या बायकोनें माझा उपदेश, पुरता सहा महिनेही पाळला नाहीं. ती त्या कर्म चांडाळाच्या आहारीं गेली, कुमार्गाला लागली व तिनें सर्वस्वी माझ्या घरादाराचा सत्यानाश केला. तुला ही गोष्ट कळली तेव्हां, तूं तिला परावृत्त करण्यासाठीं, निस्वार्थीपणानें शिकस्त केलास पण, तिनें त्या हरामखोराचा नाद सोडला नाहीं. तिचा गुरू तो होता. तिला तो सांगेल तें खरें वाटत होतें. आणि जसें बगळ्याचें बकध्यान व त्याचा स्वार्थ, पाण्यात मोकळेपणानें संचार करणाऱ्या गरीब भोळ्या मासोळींना कळत नसतो आणि त्या जशा पटापट एक एक त्याच्या भक्षस्थानीं जाऊन पडतात तशी माझी बायको, या चाडाळाच्या भक्षस्थानीं पडली ! नशीब तिचें अन् तिच्या मुलाबाळाचे ! मी काय करूं ? मीं माझ्याकडून काळजी घेतली आणि नीट व्यवस्था केली कीं, त्यांनीं हयातभर पोटभर अन्न आणि अंगभर वस्त्र वापरून दिवस आनंदात लोटले असते.

त्याना त्याच्या सुखात तुझी अडचण होऊं लागली व त्यामुळे त्यांनी तुझा काटा काढून टाकला ! अंजनीच्या खुनाचा आरोप त्याच्यावर शाबीत झाला आहे व तो लवकरच फासावर चढणार आहे. तो फाशीं गेल्यावर यम धर्माकडे सर्व गोष्टींचा बरोबर न्याय होणार आहे हे तुला ठाऊक आहे ?

त्याचा खटला चालून त्याला फासीची शिक्षा होईतों, दक्षिणायन संपलें व उत्तरायन लागताच, रात्रीं बरोबर बारानंतर आकाशवाणी झाली. भटकत असणाऱ्या सर्व पिशाचास एकत्र जमून यमदूताच्या मागून येण्याचा हुकुम झाला ! गुन्हेगाराना यमदूतानीं बाधून काट्याकुट्यातून, दऱ्याखोऱ्यातून, पावसापाण्यांत मारीत, फरफटत घाणेरड्या नदी नाल्यातून आणण्यात आलें व त्यांना यमधर्माच्या दरबारात नंबरवार हजर करण्यात आलें.

यमधर्म न्यायासनावर आरूढ झाले होते. पुढें चित्रगुप्त आपल्या वह्यांसह व परिवारासह तयार होता. यमदूत एक एक गुन्हेगार दाखल करीत होते. त्याना

त्यांनीं केलेल्या प्रत्येक पापाची आठवण करून दिली जात होती व पापपुण्याचा हिशेब पाहून प्रत्येकास यमधर्म शिक्षा देत होते.

अंजनीचा खटला चालला होता. तिच्या पदरीं पुण्य बिलकूल नव्हतें ! पुण्य मिळण्याची तिला अंधुक आशा होती. तिनें प्रश्न केला,

'हिंदु शास्त्राप्रमाणें स्त्री ही नवऱ्याच्या पुण्याची भागीदारीण असते ना ?'

धर्मराज म्हणाले 'असा कायदा नाहीं. नवरा स्वखुषीनें पुण्य देत असेल तर त्याचा भाग तुला मिळेल. बोलवा तिच्या नवऱ्याला.'

नवरा हजर झाला. चित्रगुप्तानें विचारलें,

'अंजनी तुझी धर्म पत्नी ना ?'

'धर्म पत्नी ?'

'अवदसा ती ! सदोदित घरादारांना आग लावायची माझ्या !'

'पण ती तुझ्या पुण्याची अपेक्षा करते आहे. कितीसं पुण्य तूं तिला देतोस ?'

नवरा थर थर कांपूं लागला व म्हणाला,

'माझ्या पदरीं फक्त एकचतुर्थांश पुण्य आहे त्यांतून तिला तें काय देऊं ? त्यांतूनही थोडेंफार दिलें असतें पण, ती माझ्या पश्चात् माझ्या आज्ञेप्रमाणें कुठें वागली ? स्त्रीनें पतीच्या आज्ञेप्रमाणें वागायला नको होतें का ? मला तिला मुळींच पुण्य देतां येत नाहीं. कारण तिनें माझ्या मुलांच्या आयुष्याचें मातेरें करून टाकलें !'

'स्त्रियांनीं मात्र पत्नीधर्म पाळला पाहिजे व पुरुषांनीं पतीधर्म झुगारून वाटेल तसें वर्तन करावें ना ?' अंजनी चिडून म्हणाली.

यमधर्म हंसले व तिच्या हुषारीची त्यानें तारीफ केली.

विनाशची चौकशी याबरोबरच चालू होती. यमदूत त्याला कंटाळून गेले होते. तो पक्का बेरड होता. मार मारुनी केला जर्जर। परी तो निर्लज्ज न बोले वचन। शेवटीं यमदूतांनीं आणला बांधून चौकशी कारणें.

मलाही हजर करण्यांत आलें होतें. कारण, या विनाशनें माझा जीव घेतला होता व त्याची मृत्युलोकांत कुणाला दादही लागली नव्हती ! चित्रगुप्तानें तें सर्व उघड करून समजून दिलें आणि म्हटलें,

'या विनाशनें ऐहिक सुखोपभोगाकरिता पाप, पुण्य, न्याय, नीति कांहींही न पाहतां मिळतील त्या बाया बहिणींना नादीं लावून आपल्या मार्गांतील अडचण

दूर करण्याकरतां, विजयकुमारासारख्या परोपकारी, सच्छील, कर्तव्यनिष्ठ, सत्यप्रिय माणसाचा—त्याचें आयुष्य शिल्लक असता, त्याला नाहक मारून टाकलें व तो अपघातानें मेल्यामुळें त्याला निष्कारण पिशाच्चयोनींत हाल अपेष्टात दिवस काढावे लागले. याच्याहि पदरीं पुण्य बिलकूल नाहीं. तो इतका निगरगट्ट आहे कीं, ऐकतो सर्व वृत्तांत । परी न बोले एकही वचन.

'ऐशीया बेरडाशीं कुंभींपाकीं टाका नेऊन' धर्मराज बोलले व पुढें अंजनीला शिक्षा देणार, इतक्यांत विजयकुमार ईश्वराचें नामस्मरण करीत पुढे झाला व म्हणाला,

'हे धर्मराज, माझा खटला चालून माझें शिल्लक राहिलेलें आयुष्य पुन्हां भोगण्याकरता मला पुनर्जन्म मिळणार आहे; पण देवा ! मला माझे पुण्य कुणाला द्यायचे असेल तर देता येईल का ?

देव म्हणाले, 'कां नाहीं ?'

'देवा, ऐका ! अंजनी माझी बहीण आहे. तिच्या पदरीं पुण्य बिलकुल नाहीं. तिला पुढला जन्म उत्तम मिळावा, तिचे हाल होऊं नयेत म्हणून माझें सर्व पुण्य तिला द्यावे व तिला ती पुढील जन्मीं भगवंताची भक्ती करील, सज्जनाच्या उपयोगी पडेल, तिची अंगकांती मोहक व उत्तम होऊन ती सुखी होईल असा आशिर्वाद द्यावा !'

'विजयकुमारा, तूं वेडा तर नाहींस ? पुण्य तिला देवून तूं काय करणार ?

'मी काहीही करीन. तुम्ही 'द्या' म्हणा मग मी काय करणार तें सागतों.'

धर्मदेव तथास्तु म्हणण्यापूर्वी म्हणाले 'बाळे, विजयकुमारासारखा तुला भाऊ लाभल्यामुळें तूं नशीबवान तर खरीच ! नाहींतर या विनाशाच्या नादाला लागल्यामुळे तूं पापांची इतकी जोड करून ठेवली आहेस कीं, मला तुला कमींत कमी दहा वर्षे पिशाच्चयोनी द्यावी लागली असती. या योनींत थंडी, वारा, ऊन, पाऊस, वीज याचा त्रास तुला सहन झाला नसता. त्यानंतर तुला मनुष्यजन्म मिळाला असता, पण तुम्ही सर्वांच्या डोळयांत धूळ टाकल्यामुळें, सात जन्म अंधपणा आणि दारिद्य प्राप्त झालें असतें ! जा—बाळे, जा–आता तुला कर्तव्यनिष्ठ विजयकुमाराच्या स्वार्थत्यागी वृत्तीनें, चांगला उत्तम जन्म लाभला आहे.'

अंजनी तावडतोब एक सुंदर स्त्री झाली व उत्तम जन्माला गेली.

विजयकुमारास आनंद झाला व तो म्हणाला,

‘ गीताप्रमाण ग्रंथ मानतां ना ? ’

‘ हो ’

अन्तकाले च मामेव या श्लोकाची आठवण देऊन म्हणाला,

‘ मरताना परमेश्वरचिंतन केलें तर प्राण्याला वैकुंठ प्राप्त होतो ना ? ’

तें ऐकून चित्रगुप्ताची धादल उडाली व तो एकदम म्हणाला !

‘ महाराज, चुकलों, क्षमा करा. याला जन्म नाहीं. याची स्वर्गात रवानगी करण्याकरिता विमान तयार आहे.

* * *

माझें विमान आकाशांतून स्वर्गात आलें. तिथें मला सुंदर सुंदर दृश्यें पहायला मिळालीं. तिथले बागबगीचे, चिमणबाग, मुंबईचा हँगींगगार्डन, पुण्याचा बंडगार्डन याना खालीं पहायला लावणारे आहेत. तिथलीं सरोवरें मोठमोठालीं असून, रमणीय आहेत; झाडे फळाफुलांनीं युक्त असून तशीं फुलझाडें पृथ्वीवर कुठेंही पहायला सापडणार नाहीत तिथें इंद्राचा दरबार भरतो. सर्व पुण्यवान् लोक त्यात भाग घेतात. यक्ष, किन्नर गाणीं गातात. अप्सराचा नाच होतो. परी गोप विणतात. श्रीकृष्ण भगवान् स्वतः सर्वांस भेटतात व लक्ष्मी सर्वांना प्रसाद देते. पृथ्वी, आप, तेज, वायु हे आपआपले प्रतिनिधी पाठवून आपआपल्या तर्फे गायन करतात लक्ष्मी नारायणासह मोठ्या थाटानें क्षीरसागरात प्रवेश करते. अखेर सर्वांस शेषशायीचें दर्शन होतें. सर्व देवाचे स्तवन करतात व विमानातून पुष्पवृष्टी होते. त्या पुष्पवृष्टी करणाऱ्या विमानांची केवढी ती घरघर ! त्या घरघराटानें मीं जागा झालो. मी माझ्या खोलींतच होतों. एकदरींत मी आतांपर्यंत पाहिलें—अनुभवलें तें स्वप्न होतें तर ! याचवेळीं माझ्या घरावरून दोन विमानें घरघर करीत चालली होतीं.



# गृह-रत्न ?

साळूबाई दुःखी कष्टी झाली तर नवल नाहीं. तिला कसें वाईट वाटणार नाहीं! जरूर वाईट वाटेल. तिची स्थिति होतीच तशी. तिचें लग्न वयाच्या नवव्या वर्षी झालेलें! ती जुन्या काळात वाढलेली. तिची पहिलीं दहा वर्षे सुखा-समाधानांत गेली होतीं. नवरा चांगला म्हणजे, कुणी कल्पना करील कीं, असेल इस्टेटवाला अगर मोठा पगारदार आणि ठेवली असेल आपल्या बिबीला राणी-सारखी; पण तसें होतें का? नव्हतें!

गरिबांना वाटत असतें, श्रीमंत सुखी असतील! कारण, गरीब—त्यांना लांबून पाहतात आणि दुरून दिसणाऱ्या डोंगराप्रमाणें, त्याची फसगत होते! लहानपणी कुणाला काय कळत असतें? प्रत्येक वडिलांच्या जिवावर मजा मारतात. तीं तशीच होती. तीं एकमेकांना लाजत मुरडत इतकेंच! पण मोठीं होताच, म्हणजे त्यांच्या तारुण्याच्या कळया बहरल्यावर ती एकमेक गुण्यागोविंदानें काम करीत आणि मिळेल ती मीठ भाकर आनंदानें खाऊन लग्नानंतरचा बराच काळ त्यांनीं मजेंत घालविला होता. पुढें त्याना एक उणीव भासूं लागली!

मूल म्हणजे गृहरत्न, आणि तें नसल्यामुळें त्यांना कसेंसेंच वाटे! त्याचें तें चंद्रमौळी घर ओसाड भासे, भयाण भासे. जिवापाड मेहनत करून घरीं आल्यावर त्यांना घरांत समाधान, करमणूक अशी नसल्यामुळें, त्याच्यांत चुरस उत्पन्न झाली! रोज एकमेक एकेरीवर येत व साळूबाई स्त्रीस्वभावास अनुसरून शेवटीं रडे! वास्तविक मूल नव्हतें हा तिचा अपराध होता का? ती बिचारी काय करणार त्याला! जेवढे म्हणून उपाय करतां आले तिला तेवढे नव्हते का केले तिनें! उपास केले, वड पिंपळ पुजले, अंगारेधुपारे, नाडेदोरे सर्व कांहीं केलें! औषधेंही झालीं. बुवाच्या गांठीसुद्धां घेतल्या; पण व्यर्थ!

बिचारी साळू वैतागून गेली. जीव नको झाला तिला. शेजारपाजारच्या बाया अलग अलग राहूं लागल्या तिच्यापासून ! त्यांतच एखादी आजीबाई, एखाद्या बाईस वीस बावीस वर्षांनीं मूल झाल्याची बातमी देऊन तिला निरर्थक आशा दाखवी ! तिच्या तोंडावर लगेच समाधान व्यक्त होई; पण तें थोडा वेळच टिके ! तिला आपल्या परिस्थितीची आठवण झाली कीं, ती खिन्न होई व नवऱ्याला ऐकवण्याच्या उद्देशानें म्हणे,

' समद्यानां होतील पन आमचंच नशीब नाहीं येनार उदयाला. आमच्याच नवसाला देव न्हाई पावनार ! ' अन् नाहीं तें बी म्हनत्यें बरंच ! योकच दुःख–कुसंताना परीस निसंतान बरं ! नव्हका ? '

ती असं म्हणायला अन् तिथें पिवळें पागोटें घातलेला व हळदीची पिशवी गळयांत अडकवलेला वाघ्या घंटीचा आवाज करीत यायला एकच गाठ पडली ! तो तिच्या नवऱ्याला पाहून म्हणाला,

' तुम्हास्नी पघा ! योक चिंता हाय. हा वाघ्या समद समजतो. योक नड हाय –मंगळाची नड हाय तुम्हाला. द्याल का, वाघ्याला मागल तें ? हत्ती घोडे नाहीं मागणार हां—कां ? येतं ध्येनामंदी ? पघा, नाहीं म्हणूं नगा. हीत हाय. योक तांबडा फडका घ्या. सव्वाशेर गूळ, एक वाटी गोडं तेल आज मंगळवारच्या दिशीं या वाघ्याला द्या. पघा–म्होरच्या वर्षी हालेल का नाय पाळणा हथ तो ! माझं वाघ्याच म्हनन–खंडोबाच्या कुरपेनं कंदी खोटं पडायचं नाय. पडताळा आला तर बांधशीलका पागोटं ? '

मुलांसाठीं वेडी झाली होती मंडळी ती ! वाघ्याची मागणी त्यानीं केलेल्या खटपटीपुढें कांहींच नव्हती ! वाघ्यानीं मागितलेल्या सर्व वस्तू त्यानीं त्याला दिल्या व पागोटेंही बांधायचें कबूल केलें ! बोलाफुलाला एकच गाठ पडली. त्यांना मुलगा झाला !

* * *

त्यानीं त्याला मोठ्या कष्टानीं वाढवला. तो मोठा झाला त्याला मोठ्या कौतुकानें शाळेंत घातला. शिकण्याला चांगला निघाला तो ! सरकारांतून मागासलेल्या वर्गांतला म्हणून मदत मिळत होती त्याला. तो इंग्रजी शिकत होता. त्यांच्या आसपास लिहावाचायला त्यालाच काय तें समजत होतें ! त्याचें सर्वांना कौतुक वाटे. त्यामुळें तो चढून गेला होता ! आईबापाला जुमानीत

नेस तो ! त्याला वाचायचा नाद लागला. मिळेल तें पुस्तक व हातीं येईल तें वर्तमानपत्र तो वाची ! मोठे मोठे गहन विषय गर्दी करून सोडीत त्याच्या डोक्यांत ! स्पृश्य हिंदूकडून घडलेल्या जुलमाची, भडक हकीकत वाचून तो भडकून जाई व आईबापाबरोबर व शेजाऱ्यापाजाऱ्याबरोबर नसता वाद घालीत राही.

खालच्या वर्गांत वाडीवाडींतून, चाळीचाळींतून सार्वजनिक सत्यनारायणाच्या पूजा होत असतात. तसलीच पूजा तिथें होती ! लगेच हा म्हणूं लागला; कुठली पूजा नी कुठलं काय ! हट–आपण नाय येणार पुंजेला.'

बाप माघारणीस म्हणाला,

' नाम्याला देव नाय धरम नाय. काय लक्षण चांगलं हाय व्हय ? काय करावं त्यास्नी ? वाच वाच वाचितो न शिकणं शिकतो ! ' लिह्ण्यापाई संबद नुसकान हाय बरका ? मला म्हनतो, एकादस करू नको. आतां काय म्हनावं त्येला ! मी म्हटलें, हाय मी एक येडी तवा तो काय सांगतो,'

' येडी न्हाईत काय शेणी ? काय चाललें हाय ते समजतं हाय व्हय तुम्हास्नी. जावा पहावा ही बामणं कशी वागवतात तुम्हास्नी–आम्हास्नी तीं ! '

बाप आपला एकटाच पुजेला गेला. नाम्या आईजवळ आला व म्हणाला,

' काय–जा पुंजेला ! आम्हीं शिवलों तर पाणी बाटतं ! देवाचं देवपन जातं '

आईला चीड आली ती म्हणाली,

' चीप बस. लईच फाजील झाला हायस रे तूं ! तुझ्या संग काय बोलायचं ! '

' काय फाजीलपणा केला मी ? मी खरं बोलितों. आमच्या धर्मांत हाय कुठें किंमत आम्हांला ? इषमता हाच आमच्या धर्माचा आत्मा ! आमच्या धर्मांत हाय का किंमत व्यक्तीला ? एकानें दुसऱ्याशीं कसें वागावें हें ठाव हायका कुनास्नी ? म्हने बामणानीं इद्या करावी, क्षत्रियानीं शस्त्र धरावें, वाण्यानीं व्यापार करावा व शूद्रानीं वरिष्ट जातीची सेवा करावी ! हा आमचा धरम ! माझे आई– तुम्हास्नी नाय कळायचं तें. त्याला इद्या करावी लागते ! '

' नाम्या, मग तुला कोनता रे आवडतो धरम ? दुसरा धरम तरी हाय का एखादा चांगला ? '

' न्हांइत काय ? परवां चौपाटीवर एक मिशनरी आमच्या धर्माबद्दल काय सांगत व्हता ते सांगतो बघ अक्षी ऐकण्याजोग हाय. तो जस म्हणला तसच सांगतो बघ. '

'तो म्हनत होता, 'आमचा धर्म अमक्यानींच ईद्या शिकावी, अमकाच पोषाक अमक्या जातीनें करावा, अमक्यानेंच लढाई करावी. अमक्यानें व्यापार करावा. अमक्यानेंच मलमूत्र काढावा असें आमचें पवित्र शास्त्र सांगत नाहीं. माणसाचें मनुष्यत्व हीच महत्त्वाची गोष्ट. कोणी कोणाचा अपमान करूं नये. प्रभूच्या ठिकाणीं सर्व सारखे–कारण तीं त्याचीं लेंकरें–कोकरें. जीं कोकरें बहकतात, त्यांना कळपात आणण्यासाठीं, बुडत्यांना तारण्यासाठीं आमचीं मिशनगृहें असावींत ! आमचीं तत्त्वें फार मोठीं. लोकांस तीं पटतात. म्हणून सर्व धर्माचे लोक आमचा धर्म कवटाळतात. आमच्यांत भेद नाहींत.' ऐकलस त्या धर्मात मनुष्यांना कसें सारख्यापणानें वागवतात तें ? नाहींतर आमची गोष्ट. आम्हांस्नी हरघडी अपमान.'

'काय तुझं डोकं झालया ! असला मुलगा काय कामाचा ? तुला कायबी कळत नाहीं. खुळा हायस. वगाळ कल्पना डोक्यात भरून घेतोया. त्या बाटग्यांची भाषनं कशापायी ऐकतोस–हाय काय ? तुझा जलम कोणत्या जातींत हाय. आपला धरम तुला आवडत नाय ? नाम्या, काय सांगाव तुला. रोहिदास कोन व्हता रे ? मी एक हाय येडी. तुझा सारखं लिहिनं नाय झालं माजं. मला काय समजूत हाय व्हय ? पण चोख्या कसा संत झाला रे ! साधू झाला, देवपन आलं त्याला. देव नाय मानला तर बरं व्हईल का आपलं ? पोटाला तरी मिलल का आह्मास्नी ? गुमान बस.'

'झालं, येड्या बायका तुम्ही ! तुमचा हट तुम्ही सोडाल व्हय ?'

इतक्यांत–त्याचा बाप आला. त्यानें नाम्याला हांक मारली व म्हणाला,

'परसाद घे.'

'नाय पाहिजे परसाद मला. खावा तुम्हींच'

'येड्या, परसाद हाय तो ! घे कीं अदुगर, न्हाई म्हणूं नये' आई म्हणाली. त्यानें डावा हात पुढें केला.

'डावा हात ?' बाप ओरडला.

'द्यायचा असला तर द्या. नायत जरूर हाय कुणाला इठं !

बापानं चमत्कारीक नजरेनें त्याच्याकडे पाहिलं व रागानें त्याच्या हातावर प्रसाद ठेवला.

नाम्यानें तसाच तो खालीं टाकला व पायामें तुडवला !

बापाला जास्तच राग आला; पण त्याला बोलता आलें नाहीं. त्याला वाईट वाटलें. तो प्रसाद त्यांनीं गोळा केला व बाजूला टाकला व देवाला हात जोडून म्हणाला,

'देवा माझा पोर येडा हाय. अपराध पोटांत घाल.' व त्यानें आपलें तोंड फोडून घेतलें! रात्रभर त्याला झोंप आली नाहीं. सकाळ होतांच तो कामावर गेला. विठोबाची मनःस्थिती ठीक नव्हती. त्याला मुलाची काळजी वाटत होती.

'कां विठोबा, आज काळजींतसा?' कारकुनानें प्रश्न केला.

'नाहीं. काल वाडींत पुंजा होती. वाईच उजागरा (जाग्रण) झाला हाय.'

'काय शिकतो आतां तुझा मुलगा?'

'नसता शिकला तर चांगलं झालं असतं.'

'कां–असं का म्हणतोस?'

'नको तसं म्हणूं तर काय? ऐकतोय व्हय तो माजं? लिहणं बी नीट नाहीं करीत आतांशीं. तुमच्या घरीं पाठवतो तुम्हीं तरी सांगा त्येला कांहीं.'

'अरे! तो माझें ऐकणार? बरें. पहा पाठवून.'

बाप घरीं गेल्यावर नाम्याला म्हणाला,

'माझ्या हपीसातले कारभारी इचारपूस करतात तुझी. भाऊसाहेबाम्नी बरं वाटलं तूं चागला शिकतोस तर. त्यांनीं तुला त्यांच्या घरीं बोलावलें हाय.'

'कशाला शोभा करून घ्यायला माझी!'

'सगळेच तुझी शोभा करणार! कशापायी करतील तुझी शोभा? भाऊसाहेब म्हणजे किती इद्वान, किती पोक्त. त्याच्या पायी नोकरी मिळाली मला. ये माझ्यासंग त्यांना भेट अन् मग बोल काय बोलतोस तें!'

सुट्टीचा दिवस पाहून ते त्याच्याकडे गेले.

साहेबानीं त्याना 'या'–सागितलें व खुर्च्या दिल्या व आपणही समोर बसले व म्हणाले,

'हा का तुझा मुलगा? ठीक–काय बुवा, कसा काय आहे तुझा अभ्यास? होशील ना पास यंदा?'

'आपल्याला आतां शिकायचंच नाहीं जास्ती. आमच्या लोकाला शिकून काय कराच हाय?'

'कां असा कां निराश होतोस?'

‘ आम्हाला कुणी मनुष्य आहोत असं समजून तरी वागतात कां लोक आमच्याशीं ? ’

‘ असं होय ? आलें माझ्या ध्यानांत.’

‘ ऐक ! तूं ईश्वराला मानतोस का ? ’

‘ हो.’

‘ मग देवाला काय म्हणतात ? पतित पावन–ना ? मग सुशिक्षित लोक तुम्हांला अपवित्र कां मानतील ? तुझा बाप माझ्या आफीसांत आहे त्याला नाहींका शिवत आम्हीं ? तूं शाळेंत जातोस, तिथें तुला शिवतात ना दुसरीं मुलें ? क्रिकेटमध्यें तुमचे लोक आहेत हे आहेना ठाऊक तुला ? ते कसे आमच्या पाढरपेशा बरोबर बसतात, उठतात, खातात, पितात. त्याना नाहीं कांहीं जातीची मोठी विषमता वाटत ती ! काल फार बदलला आहे आतां, नसत्याच कल्पना उराशीं बाळगूं नकोस, ‘ पन देवळांत कुठें जाऊं देतात आम्हांला ? ’ नाम्या मध्येंच म्हणाला. ‘ देवळातूनही जाऊं देतील. इतकी घाई कां करतोस ? अन् देवळांत गेल्यावर एवढें विशेष तें काय होणार आहे ? मुख्य गोष्ट आहे धर्माची. आपला धर्म किती उच्च आहे हें आहेका माहीत तुला ? अरे, ईश्वरासंबंधी चिकित्सा, तसेंच जिवाचें ध्येय, मुक्तीचीं साधनें याची माहिती, कर्मफळ व पुनर्जन्म याचा सांगोपांग विचार, हिंदुधर्मा शिवाय इतरत्र कुठेंही नाहीं. हिंदु धर्माची श्रेष्ठता, स्वामी रामतीर्थ, स्वामी विवेकानंद यानीं परकीयानां सुद्धा पटविली ती उगीच ! याच धर्मांत वीर माता झाल्या, वीर भगिनी झाल्या व वीर पत्नी होऊन गेल्या. ’

नाम्याचं समाधान झालें व तो म्हणाला ‘ बरं तर, आतां करीन अभ्यास व यंदा बसेन परीक्षेला.’

तप्त झालेल्या लोखंडावर जसें पाणी फार वेळ टिकत नाहीं, तितकाच तो उपदेश त्याच्या मनावर टिकला ! त्याचा आपला हेका तो सोडीत नव्हता. प्रत्येक सणावारी तीच कटकट. संक्रातीच्या दिवशीं सखाराम आपल्या रिवाजाप्रमाणें त्याला तीळ गूळ देऊं लागला. नाम्या तीळगूळ घेणार काय ? नाम्याच्या बापाला तें वाईट लागलें ! तो म्हणाला,

‘ आज चागला सन, घरांत गोड धोड केलं हाय. चांगलेपनी आनंदांत दिस

घालवायचा. याला तीळगूळ घ्यायचा नव्हता हे त्या सखारामास्नी काय ठाव ! घेतला असता तीळगूळ तर मेला असता व्हय ? '

' मला सण नको, वार नको, तुम्ही बी नको !

मुलाचा वैताग पाहून आई म्हणाली, ' नाम्या नगरे असं करूं ! वाघ्याच्या आशिर्वादानं तूं झालास. तुला साता सायासानें वाढवला आम्ही.'

' न्हाय–आई, लई झालं ! आता मला सहन नाहीं व्हत. मी जाईन म्हनतो कुठंतरी तोंड घेऊनशान. '

' बाबा—आम्हाला मारून टाक आनी मग जा कुठं जातोस तो !

घरांत त्याचें पटत नव्हतें हें त्याचा मित्र महंमद याला ठाऊक झालें ! त्यांनीं त्याला इस्लाम धर्मांची माहिती सांगितली ! त्याला पैशाचें आमीष दाखविलें ! त्याचा दुसरा मित्र गायकवाड त्याला ख्रिश्चन हो म्हणून आग्रह करीत होता. त्याला निश्चित कांहींच ठरवितां येत नव्हतें ! एके दिवशीं रात्रीं, घरात पुन्हा तंटा झाला. तो बापाला जायची भीति घालूं लागला. बापही कंटाळला होता त्याला. तो तितक्याच रागानें म्हणाला,

' जा कुठें जातोस तो ! तुझ्या नशिबांत असल तसं व्हईल.'

बापाची बेपर्वा, त्याचें तें बोलणें त्याला लागलें. त्यानें दार उघडलें. आई रडूं लागली. तो मागें फिरला, ' आई, रडूं नगस—माझी माया सोड—मी तुझा न्हायीं ! '

' चालता हो—कर काळं. कशाला थांबलास ? '

' नाहींच थाबत. पहा चाललोंच ! '

आई धांवली, तिनें त्याला घट्ट धरलें. तिला त्यानें दूर लोटलें. तिच्या बांगड्या टिचल्या. तिचा पाय उमरठ्यात अडखळला. ती पडली. तिला जखम झाली. जेव्हां मूल होत नव्हतं त्यावेळची परिस्थिती ती आठवीत होती ! ती शोक करीत होती. वेळ रात्रीची होती. तो महंमदकडे गेला. त्यानें त्याला त्याच्या फंडांतून पैसे देवविले, कपडे दिले. व तो राजीखुषीनें इस्लाम धर्म घेण्यास तयार आहे त्याच्यावर कोणी जोर जुलूम केला नाहीं अशी प्रतिज्ञा त्यानें त्याच्याकडून न्याया-धिशापुढें घेवविली व एका काझीकडून त्याला इस्लाम धर्माची दिक्षा दिली !

तो मुसलमान झाला ही गोष्ट भाऊसाहेबांस समजली. तिथें तो काय करतो ही

त्यानें चौकशी केली. तो त्यांच्या जमातींत शिपायाचेंच काम बजावीत होता. जातिवंत मुसलमान त्याला हलकाच लेखीत होते. भाऊसाहेब म्हणाले,

‘चांगला हुशार मुलगा पण फुकट गेला! अतो भ्रष्टः ततो भ्रष्टः अशी त्याची स्थिती झाली. धर्मांतर करून त्याचा कोणता फायदा झाला? थोडे दिवस जी कांहीं त्याची चंगळ झाली असेल तेवढीच!

ज्या समतेसाठीं त्यांनीं अकांडताडव केलें, ती समता त्याला अखेर तिथेंही मिळाली नाहींच!’

आईचा पाय दुखावला होता तो मात्र तिला वारंवार त्रास देत होता. तिच्या पायांत कळ आली कीं, तिला ब्रह्मांड आठवे! ती कष्टी होई आणि म्हणे,

‘कुसंताना परिस निसंतान बरं!’



# गोड स्वभाव

'मुली, हा तुझा गोड स्तभावच तुला नडेल बरं !' असं बापुराव शालिनीस वारंवार म्हणत.

बापूरावांना या मुलीबद्दल असं कां वाटावं ? तिच्या भावी आयुष्याबद्दल असें त्यानीं कोणतें अनुमान केलें होतें हें विनायकरावांस समजत नव्हतें !

विनायकरावांस जसें तें वाटलें, तसें कुणालाही वाटलें असतें.

अवघी सहा वर्षांची गोंडस बाळसेदार पोर, जवळ येते ' काका–काका ' म्हणते अन् ते तिला जवळ घेतात, काहीं खाऊं देतात आणि हा तुझा स्वभावच...!' म्हणून तिचा चेहरा न्याहाळीत राहतात.

हें–कां ?' असा ते पुष्कळ दिवस विचार करीत होते; पण त्यांच्या कांहीं लक्षांत येईना म्हणून त्यानीं त्याना स्पष्ट म्हटलें,

' काका, या पोरीबद्दल तुम्हांला काय वाटतंय् ?–तुमच्या तोंडून मी रोज हें ऐकतों आहे; आपणांला बुवा याचा कांहीं अर्थ कळत नाहीं. '

' नाहींच कळायचा त्याचा अर्थ तुम्हाला ! सगळे शोध लागले पण, कुणाच्या मनांत काय आहे याचा मात्र शोध लावणारा सुपीक डोक्याचा शास्त्रज्ञ अद्याप निघाला नाहीं. '

पाहूं गेलें असतां त्याचा अर्थ अगदीं सरळ आहे; पण तो तुमच्या ध्यानांत येत नाहीं ? मग तुम्हीं हे माझे शब्द फक्त लक्षांत ठेवा अन् पहा खरे ठरतात कीं नाहीं तें !

बापूराव आपल्या मनांतलें कुणाला कळूं देणार नाहींत, याची खात्री होती.

त्यांना अशीच लोणकढी झोंकून आपली सुटका करून घ्यायची खोड होती. विनायकराव हें जाणून त्यानीं त्यांना आग्रह केला नाहीं पण, ते शब्द मात्र हृदयांत कोरून ठेवले.

महासागरांत ज्याप्रमाणें कुठली तरी दोन लांकडें वहात वहात एके ठिकाणीं येऊन पुन्हां दूर जातात. त्याप्रमाणेंच या मुंबईच्या बकाली भिन्न वस्तींत कुठलीं तरी दोन कुटुंबें, कोणत्यातरी निमित्तानें कांहीं काल एकत्र येतात आणि कमि-जास्त परिचय होतो न होतो तोंच, दूर जातात. त्यांतलीच त्यांची अवस्था झाली. ते एकमेकापासून अलग झाले.

नोकरी पेशातले विनायकराव मात्र, वर्षांतून एकदां तरी एक महिना आपल्या मुंबईच्या नोकझोंकांत रजा घेऊन कुठें तरी बाहेर गांवी हवापाणी बदलण्याच्या हेतूनें जात.

शहरचा मनुष्य खेड्यात गेला कीं, त्याला तिथलें सर्वच वातावरण शांत व रम्य वाटूं लागते. तो प्रत्येक गोष्टीकडे मोठ्या कुतुहलानें व जिज्ञासेनें पहात असतो.

विनायकराव ज्या ठिकाणीं उतरले होते ते गृहस्थ खाऊन पिऊन सुखी असे होते. गाव—लहानच होता. वस्ती थोडीच होती. तेथें मुंबईच्या सुखसोई नव्हत्या व त्यांची जरुरीही कुणाला भासत नव्हती !

प्रत्येकाच्या घरापुढें चांगलें स्वच्छ अंगण होतें, पुढें मांडव होता. त्यावर गवत वगैरे ठेवलेलें असे.

तेथील लोकाचें सारें ऐश्वर्य म्हटलें म्हणजे, भाताचे कणगे, सारवटी गाडी बैलाची जोडी, पागा, घुंगुर, झुली, गाय, वासरूं, इतकें असावयाचें !

वाड्याभोंवतीचें तें मोडकेंतुडकें कुंपण; पण शहरच्या मंडळींच्या नजरेला तेंहि मोठें सुंदर दिसे !

प्रत्येकाची बैठक ओटीवर असावयाची व वाडयांत एक इझीचेअर, फळ्या मारलेल्या एकदोन जुनाट खुर्च्या, एखादें लेचेंपेचे बांक धूळ खात असलेले दिसावयाचे.

जेवणें झाल्यावर बहुधा रोज रात्रीं, शेजारपाजारचे लोक येऊन गप्पा करीत बसत असत. विनायकराव वगैरे मंडळी बसली होती. थोडयाच वेळांत शुभ्र खादीची टोपी, झब्बा, जाडें भरडें धोतर, पायांत कोंकणी वहाणा व हातांत वेताची जाड काठी घेऊन एक व्यक्ति आली.

'चर्चा मंडळाचा आज कोणता विषय चालला आहे' म्हणून बत्तिशीच्या खिंडी दाखवीत त्यांनीं चौकशी केली.

यजमानानीं त्यांना तितक्याच उल्हासानें अभिवादन केलें व हातांनीं जवळच्या खुर्चीत बसण्याचा इषारा केला.

‘ आम्हीं विचारांतच होतों कीं, आज अद्याप आमचे अध्यक्ष कसे आले नाहींत !

आज आपल्या मंडळांत एक नवे स्नेही आले आहेत.

—हे मुंबईस युनिव्हर्सिटींत असतात यांचें नांव विनायकराव’ असें ओळख करून देण्याच्या शिरस्त्याप्रमाणें ते म्हणाले,

‘ यांची ओळख ?—यांना कोण ओळखीत नाहीं ! हे बापुरावच ना ?—कां–बापूराव ! ’

‘ आ—कोण ?—विनायक ! ’ कमाल झाली बुवा. धन्य ! धन्य ! आम्ही ! किती वर्षांनी भेटतों आहोंत ! असें म्हणत ते विनायकरायाच्या शेजारीं टेकले. ‘ तुम्हीं इथें तर अगदीं थेट खेड्यांतल्या पद्धतीनें राहता ? ’

‘ कां ?–माझ्या या पोषाखावरून म्हणतां होय ? इथें हो काय करायचाय तो सूट अन् बूट ! खेड्यातल्या लोकांत मिसळायला हवें असेल, त्यांच्या अडी अडचणी समजून घ्यायच्या असतील, तर त्याच्याप्रमाणेंच नको का वागायला ? ’ असा टोला बापुरावानीं सहज ठेवून दिला.

जुने मित्र–पुष्कळ दिवसानी भेटले म्हणजे, जो आनंद होतो व एकमेकांबद्दल जो जिव्हाळा वाटतो तो पुसूंच नये !

त्यांना अनुपम आनंद वाटत होता. बापूरावांनीं विनायकरावास दुसऱ्या दिवशीं आपल्या घरीं बोलाविलें.

गप्पा करतां करतां, विनायकरावांस शालिनीची आठवण झाली.

ते म्हणाले, ‘ शालिनी कुठें आहे ? ’

‘ काय ?–थट्टा करतां कीं काय ? ’

‘ अहो ! ती इथेंच नाहीं का ? तुम्हीं उतरलां आहांत तिथंच ती आहे. ’

विनायकरावांस आश्चर्य वाटलें व ते म्हणाले ‘ त्या घरांत दोन बायका दिसतात. त्यांपैकीं एक ती सडपातळ गोरटेली बाई आहे तीच का ? ’

‘ हो–तीच ! ’

‘ तिच्यांत कोणता फरक दिसतो आहे तुम्हांला ? ’

‘ ती अगदीच वेगळी दिसते. ती अशी खिन्न व उदास कां ! ’

‘ नाहीं उदास दिसणार तर काय ? ती का सुखानें माहेरपणाकरितां आली आहे ? तिची हकीकत इतकी काहीं रोमांचकारी आहे कीं, तुम्हीं थक्क व्हाल ! ’

‘ विनायक, तुम्हाला ठाऊक आहे ना, जगांत विश्वास म्हणून काही चीज असते म्हणून ? ’

व्यापार जरी करायचा म्हटला तरी, विश्वासाशिवाय होईल का ? विश्वासाशिवाय कोणती गोष्ट आहे ? नवरा बायकोचा विश्वास एकमेकावर नसला तर, तो संसार कसा होईल याची कल्पना तुम्हाला शालिनीची हकीकत ऐकल्याशिवाय कळणार नाहीं.

‘ लहानपणी ती पोरगी किती गोड स्वभावाची होती. आपल्या वाडींत सर्वांना ती हवी हवीशी वाटे; पण ज्या घराण्याशीं तिचा संबंध आला, तें घराणें कमनशिबानें तिच्या स्वभावाला अगदीं विसंगत झालें !

...ात, तिच्या एका कवि मित्रानें तिला कविता अर्पण केल्या होत्या. तो मित्र तिच्याकडे जात असे. ती त्याच्या बरोबर गप्पा करी, त्याला चहा देई. ही गोष्ट तिच्या नवऱ्याला आवडली नाहीं. नवऱ्यानें तिला बंदी केली. तिच्याबद्दल त्यानें भलताच संशय घेतला. त्यानें तिच्यावर करडी नजर ठेवली तिच्या प्रत्येक गोष्टींत त्याला वैगुण्य दिसूं लागलें. ती त्याला अगदी घाबरत असे तिचें जरा काहीं चुकलें कीं, तिच्यावर तो तुटून पडे. इतका शिकलेला तिचा नवरा पण, एखाद्या दारुड्यासारखा मारीत सुटे तिला ! एकदां अशाच कांहीं नुसत्या संशयावरून तिला त्यानें खोलींत कोंडून देखील ठेवली होती !

जुलमी मनुष्य, एखाद्या व्यक्तीवर जुलूम करूं लागला कीं, त्याची मजल कुठपर्यंत जाईल याचा कुणाला कयास का करतां येईल ?

तिला कुणी फुले दिलीं; ती कुणाबरोबर बोलली, तिनें कुणाकडे जायची गोष्ट काढली की, तिचा तो अगदीं पाणउतारा करून टाकी तिला नाहीं नाहीं तें बोले. त्यामुळें ती दुर्मुखलेली, कुढी बनली तिच्या स्वभावांतला मोकळेपणा पार नाहीसा झाला. तेव्हांपासून ती अशी उदास व घाबरट दिसते आहे

मनुष्याचे स्वभाव कसे विलक्षण असतात म्हणून सांगू ? लग्नाच्यावेळीं पत्रिका ज्योतिष पहायचें नाहीं म्हणून ठरलें, आणि लग्न झाल्यावर मात्र त्यानें तिच्या बापाजवळ पत्रिकेची चौकशी केली. त्याच्याजवळ पत्रिका अशी नव्हती पण,

त्यानें तिच्या जन्मतारखेची व वेळेची नोंद त्याला दिली. ती तो घेऊन ज्योतिषाकडे गेला.

ज्योतिषी म्हणजे काय ? त्यांचें आपलें लक्ष प्रथम, जाया भुवनावर जायचें ! त्याला सप्तमांत शनी, मंगळ, राहू हे ग्रह आढळले !

त्यांनीं विकट हास्य केलें. नाकांत शिस्तवार तपकीर कोंबली व घसा साफ करून भुंवया आश्चर्यानें वर खालीं करून मान हलविली. ज्योतिषी संशयात पडलेला पाहून तिचा नवरा त्याला म्हणाला,

'संशय मनात धरूं नका. कांहीं असेल तें स्पष्ट सांगा. त्याचा राग नाहीं.'

'न करावें स्पष्ट वचन । तरी अंगीं येते मूर्खपण' अशी ओवी ज्योतिषानें आपलें ज्ञान दाखविण्याकरिता ऐकविली !

'कुंडली स्त्रीची आहे. तिचें वर्तन वागणूक कशी आहे ?' असा चाचरत त्यानें प्रश्न केला व म्हणाला,

'ग्रह थोडे चमत्कारिक दिसतात.'

आधींच नवरा संशयग्रस्त आणि त्यांत हा वृश्चिक दंश ! त्याला तें पटलें ! तो म्हणाला, वर्तनाचाच प्रश्न आहे मला.'

'असायलाच पाहिजे तसें ! हे—सप्तमातले ग्रह स्पष्ट सांगताहेतच काय आहे —तें ?' नंतर मामुली प्रश्नोत्तरें होऊन नवरा घरीं आला.

त्याचा अविश्वास जास्तच बळावला. त्यानें वट हुकूम काढले. नवरा आपल्याबरोबर असा कां वागतो याचा तिला मागमूसही लागेना. ती त्याला खोदून विचारण्याचा प्रयत्न करी. ती म्हणे,

'डोकं का दुखतय ? असं काय करायचं हें ?—नीट बोलायचं नाहीं, कांहीं नाहीं. असा का माझा नुसता छळ चालवला आहे तुम्ही ?'

तरी तो आपला तिच्याकडे तिरस्कारानें बघी आणि गप्प राही. कदाचित् कधीं बोललाच तर तें उपरोधिकपणानें बोले.

त्यावर ती माऊली म्हणायची,

'कसला संशय घेतां माझा ?—मी काय करते ?—मी कशी खात्री पटवूं ?'

'अहाहा ! फार चांगलं कूळ !' असं म्हणून तिला तो नेमकें एखादें तिच्या माहेरच्या कुळांतलें वाईट उदाहरण दाखवी. ती बिचारी काय करणार ? ती गप्प रहात असे. ती आंतल्या आंत जळे व म्हणे,

'नको हा संसार.'

नवरा नुसता खवीस होता. तिला तो सारखा छळ छळ छळी.

'बापानीं उगीच नाहीं पत्रिका दबडली. मला सगळें कळतें!'

बापाचें नांव निघाल्याबरोबर ती रागानें लालबुंद झाली व म्हणाली 'असें काय आहे पत्रिकेंत माझ्या ? कशाला दवडील पत्रिका माझा बाप ? मागायची होती पत्रिका अगोदर. कुणी नव्हती मनाई केली!' व रडूं लागली. तो पाषाण-हृदयी होता. तिच्या रडण्याला भीक घालणारा नव्हता. तो रोज तिला रडवी. ती कंटाळून गेली, वैतागून गेली. एकदा असें झालें कीं, शालिनीचा तो कवि मित्र आजारी झाल्याचें कळलें. त्याला शस्त्रक्रियेकरितां हॉस्पिटलमध्यें रवाना करण्यांत आलें होतें. शालिनीस बरोबर माहिती मिळाली नव्हती. तिला चैन पडत नव्हतें. तिला त्याची काळजी वाटत होती. तिचा त्याच्यावर लोभ होता. ती त्याला कसें भेटतां येईल याचा विचार करीत होती. अखेर तिनें नवऱ्याला नकळत त्याला जाऊन भेटण्याचें ठरविलें! तिनें आपल्या विश्वासातली एक मैत्रीण गाठली व ती तिच्याबरोबर त्याच्या समाचारास गेली.

ही गोष्ट नवऱ्याच्या कानावर जायला वेळ लागला नाहीं. त्यानें तिची ताबड-तोब माहेरीं रवानगी केली. तिला कशात गोडी वाटत नव्हती. ती सारखी झुरत चालली होती. ती मला म्हणाली 'काका फुकट माझा जन्म. माझ्यामुळें माझ्या आईबापाना त्रास होतो. त्यानीं कितीतरी पत्रें लिहिलीं तिकडे; पण एकाहि पत्राला उत्तर दिलं नाही. काय हो करूं मी ! नसत्या कल्पना माझ्या डोक्यांत येतात. माझ्या नात्याचीं माणसं माझ्यावरच आग पाखडतात. मला अगदीं जगूं नयेसं वाटतं. मला माझा अंत करून घेण्यापलीकडे दुसरा मार्गच दिसत नाहीं. असं आयुष्य मी कसं घालवावं ?'

मी तिला म्हटलें,

'मुली, निराश होऊं नकोस; धैर्य धर. जरी तुला नवऱ्यानें विचारलें नाहीं तरी त्याची पर्वा करूं नकोस. तुझ्या मनानें तूं शुद्ध आहेस ना ? मग तूं कां म्हणून घाबरतेस ? तुझें लग्न झालेंच नाहीं असें समज. आपल्या भावावहिणींना नदीकाठीं रोज फिरायला घेऊन जात जा. फावल्या वेळीं या कुळंब्याच्या मुलांना व स्त्रियाना लिहायवाचायला शिकव.'

त्याचा परिणाम तिच्या मनावर चांगला झाला. ती खेड्यांत प्रचार करूं

लागली. अन् आतां ती या खेड्यांत जें कांहीं काम करते आहे तें खरोखरीच अवर्णनीय आहे. तिनें या खेड्यांतील लोकांस आरोग्य रक्षण कसें करावें; बाल संगोपन कसें करावें, स्वच्छता कशी राखावी, आपले देशी धंदे कसे वाढवावे व टिकवावे, आपलीं घरें कशीं असावींत, आपण साधेपणानें आपल्या गरजा कमी करून कसें रहावें याचें ज्ञान देऊन ती ग्रामोद्धाराचें काम उत्तम रीतीनें बजावीत आहे.

विनायकराव स्तिमित झाले आणि म्हणाले, ' मला ज्या शब्दांचा अर्थबोध इतके दिवस झाला नव्हता त्याचा अर्थ, हें ऐकून पूर्णपणें झाला.

' मुली हा तुझा गोड स्वभावच तुला नडेल बरें ! ' असें जें तुम्हीं वारंवार म्हणत होतां-तेंच बरोबर होतें !



# दृष्टि-कोन

'तुमचें हें दुकान ?' अशी पृच्छा दुकानांत आलेल्या गृहस्थानें माझें नाव पाहून आश्चर्ययुक्त मुद्रेनें केली !

त्यांतील खोंच माझ्या लक्षात तेव्हाच आली; कारण, येणारे गृहस्थ त्यांच्या पेहरावावरून कोंकणांतून आलेले असावेत हें मी तेव्हांच ताडलें. मला कुणी एखाद्या कचेरींत खर्डे घासतांना पाहिला असता तर, त्याचें कुणाला नवल वाटलें नसते ! उलट तें भूषणावहच झालें असतें. हा काळाचा महिमा आहे. याला कुणी काय करणार !

मी त्या गृहस्थास म्हणालों,

'तुम्हाला आश्चर्य वाटल्यास नवल नाहीं. वस्तुस्थिति तशीच आहे. या माझ्या दुकानाच्या बुडाशीं मोठा इतिहास आहे. आहेका वेळ तुम्हांला बसायला ? असेल वेळ तर सागतों. मला कुठें असतो वेळ ? पण आज इटालिअन बोट उशिरा येणार आहे, म्हणून आहे थोडी फुरसत झालं !

'या असे-बसा चेअरवर' असे म्हणून चेअर मी पुढें ओढली.

गृहस्थ खुर्चीवर बसले. त्यानीं आपल्या डोकीवरचा साधारण मळलेला पटका काढला. खांद्यावरील उपरण्याने डोकीचा घाम पुसला. दाढी व हजामत वाढलेली होती त्याची. डोकीचे केस पांढरे झालेले दिसत होते. शेंडीच्या जागीं टक्कल पडलें होतें. कांहीं तुटक केंस पंख्याच्या वाऱ्यानें भुरूभुरू उडून आपलें अस्तित्व दाखवीत होते. मनुष्य जरी वयातीत होता तरी, त्याच्या शरिराचा काटकपणा, मजबुती व खेडेगावची रहाणी, त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट उमटून दिसत होती. त्याचें धोतर मळकटच होतें. अंगांत सुती बटणांचा सदरा होता. त्यावर आजूबाजूला गोडाउन सारखे भासणारे खिसे असलेला कोट होता. त्यानें लगेच आपल्या खिशातून चंची काढली व पान खाण्यास सुरवात केली.

*    *    *

मुंबई अगोदरच गजबजलेली ! तशांत नळबाजार ! अर्थात् तेथें नेहमींच वाहतूक जास्त आणि दुकान अगदीं रस्त्याच्या बाजूला; त्यामुळें तेथें गडबड जास्त होती. आम्हाला या गडबडीचें कांहीं वाटत नव्हतें; पण नवख्या मनुष्यास अगदीं कंटाळवाणें होऊन जाई व साधारण हळू बोललेलं ऐकायला जात नसे. ही सगळी परिस्थिति लक्षांत घेऊन, मी माझी खुर्ची पुढें ओढून, जवळच असलेल्या काव्याच्या दाड्यावर हात ठेवून बोलूं लागलों.

'आपण येथें पूर्वी कधीं आला होतां काय ?'

'हो बऱ्याच वेळा आलों होतों.'

'मग तुम्ही बटाटे कुणाच्या दुकानात घेत होता ?'

'माझें कांही ठरलेलें नव्हते; पण पूर्वींचीं दुकानें आतां दिसत नाहींत. आतां जुन्या इमारती जाऊन त्या जागीं बहुतेक नव्या झाल्या आहेत.'

'तें असो–पण ती साधारण कुणाच्या मालकीची होती तें सांगाल का ?'

'तें काय सागायचें ? होती मुसलमानाची'

'हं–तेंच मला हवें आहे. आजही तीच परिस्थिति आहे. हा व्यापार त्याचाच आहे. मीच काय तो इथें हिंदू व्यापारी आहे. आणि हिंदूच नव्हे तर ब्राह्मण आहें—चांगला बी. ए. आहें.'

तो गृहस्थ ही हकीकत एकाग्र चित्तानें व मोठ्या कुतुहलानें ऐकत होता. त्याच्या तोंडावर निरनिराळे भाव उमटत होते. त्याच्या शुभ्र भुंवया आश्चर्यानें वर खालीं होत होत्या.

माझे वडील सुमारें माझ्या वयाच्या पांचव्या वर्षी वारले. माझी आई विधवा झाली. तिला कुणाचा आधार नव्हता. माझ्या बापाला आपल्या आयुष्याचा विमा वगैरे उतरून कुटुंबाची व्यवस्था करून ठेवण्याची ऐपत नव्हती. त्यांचें शरीर मजबूत होतें. त्याना अकालीं मरण येईल ही कल्पना स्वप्नातदेखील शिवली नव्हती ! ते बेफिकीर होते आणि अगदीं अशाच वेळीं काळानें त्याच्यावर अचूक झडप घालण्याची घाई केली !

आईला माझ्यांशिवाय आधार नव्हता. वास्तविक मी म्हणजे, तिच्यावर पडलेलें ओझें होतें, घोंड होती; पण कोणत्या आईला आपल्या मुलाचें ओझें वाटेल ? मूल कसेंहि असलें तरी, ती त्याच्यासाठीं अनेक हालअपेष्टा सहन करील; वेळीं उपाशीं राहील व अहर्निश त्याच्या कल्याणासाठीं झटेल. त्याला कुणी टाकून

बोलले तर, तें सुद्धां तिला सहन होणार नाहीं. अशाच भावनेची माझी आई होती. ती असहाय्य परिस्थितींत सांपडली होती. मूळची ती भित्री; पण तिला त्यावेळीं अतोनात धैर्य आलें होतें ! ती शिकलेली नव्हती. शिकलेली असती तर, एखाद्या शाळेंत मास्तरीण झाली असती, शिवणकाम शिकली असती; नर्सपण केलें असतें व आपली त्या परिस्थितींतून सुटका करून घेतली असती. पण तिला काय शक्य होतें ? तिच्यापुढें फक्त दोनच मार्ग खुले होते. एक भिक्षा मागण्याचा व दुसरा पोळपाट लाटणें घेण्याचा. पहिला मार्ग तिला लाजिरवाणा वाटला. ती म्हणाली,

'मी भिक्षा मागूं लागेन तर माझ्या बाळाला चांगलें वळण लागणार नाहीं. तो ऐतखाऊ व आळशी बनेल. त्याच्यापुढें चांगला आदर्श रहाणार नाहीं. तो नावारूपाला चढणार नाहीं.'

दुसरा मार्ग तिला पसंत पडला आणि तिनें नोकरी मिळविण्याकरितां खटपट केली. नोकरी जातींतच केलेली बरी असा तिचा विश्वास होता. तिच्या जातींत श्रीमंत होते, सर होते, डॉक्टर होते, वकील होते. त्या सर्वांकडे तिनें नोकरी मिळविण्याचा यत्न केला पण, त्या सर्वांनीं तिला फेंटाळून लावलें. सगळे ठराविक उत्तरें देत. कुणी म्हणत,

'आमच्याकडे आचारी आहेत–आम्हांला बाई ठेवायची नाहीं.'

कुणी म्हणत,

'आमची जुनी बाई आहे, आम्हांला जरूर नाहीं.'

प्रसंग तर कठीण येऊन ठेपला. नोकरी मिळत नाहींशीं झाली. खायला नाहीं. जवळ कांहीं नाहीं. तिच्या अंगावर एक दोन दागिने होते त्याचाच आश्रय घेणें तिला जरूर होतें.

* * *

माझ्या वडिलांचा एक मित्र दैवज्ञ-सोनार होता. माझी आई त्याला ओळखीत असे. ती त्याच्याकडे गेली. तिनें सर्व हकीकत त्याला सांगितली. तो म्हणाला,

'हे दागिने माझ्याकडचेच आहेत. लग्नाच्यावेळीं बापूनें माझ्याकडूनच शंभर रुपये घेतले होते. त्याची फेड त्यांनीं हप्त्या हप्त्यानें केली आहे. तुमचा नवरा माझा बाळपणापासून स्नेही होता. आम्हीं दोघेहि पोतदार स्कूलांत होतों. तुमच्या जातींत तुम्हाला कुणी नोकरी देत नाहीं. पत्करल्यास आमच्या इथें रहा.

आम्हांला स्वयंपाक करून घाला व तुम्हीं खा. ठेवा हे दागिने—बापूची आठवण म्हणून राहूं द्या.'

त्या सोनारास त्याच्या घरांतील मंडळी बाबा म्हणून संबोधित. हे त्यांचे सहानुभूतीचे शब्द ऐकून माझ्या आईला हायसें वाटलें. ती म्हणाली,

'त्यांच्या मित्राच्या रूपानें आमच्या संकटकाळीं आम्हांला मदत करण्यास प्रत्यक्ष परमेश्वरच उभा राहिला !'

माझी आई त्यांचा आश्रय धरून राहिली. आम्हांला मदत करायला आमचा एकही मनुष्य पुढें सरसावला नाहीं म्हणून माझी आई दैवज्ञाकडे स्वयंपाकीण म्हणून राहिली तें पाहून लोकांनीं वाभाडे काढण्यास व चिंधड्या उडविण्यास कमी केलें नाहीं. माझ्या आईनें त्याला बिलकूल भीक घातली नाहीं.

* * *

आईनें मला शाळेंत घातलें. मी हळू हळू एक एक इयत्ता करीत करीत इंग्रजींत गेलों. माझ्या शिक्षणाचा खर्च वाढूं लागला. शिक्षणास कांहीं मदत मिळावी म्हणून बाबा म्हणाले, 'ताई, तुमच्या संस्था नाहींत का? कां नाहीं मागत शिक्षणाला मदत तिथून ? तुमच्या गोपाळचा अभ्यास चागला आहे. मदत घ्यायला लायक मुलगा आहे तो.'

आईला तें पटलें. तिला आशा उत्पन्न झाली. ती मला सभेच्या एका जबाबदार अधिकाऱ्याकडे घेऊन गेली. त्यानें सर्व चौकशी केली आणि म्हटलें,

'आमच्या सभेची सांपत्तिक स्थिति तितकी समाधानकारक नाहीं. ठराविक रकमेंतून कांहीं रक्कम सारखी विभागली जाते व विद्यार्थ्यांस मदत देण्यात येते. आणि त्यातून मागणी जास्त असल्यामुळें सर्वांच्या मागण्या मंजूर करता येत नाहींत.'

माझी आई हिरमुसली होऊन घरीं आली. तिनें ती हकिकत बाबांस सांगितली. ते म्हणाले, 'नाहीं तर नाहीं. मागणाराला हजार ठिकाणें आहेत. खासगी रीतीनें लोकाकडून मदत मिळाल्यास पहावी.'

माझ्या आईला एक एक कटू अनुभव येत होता. तरी पण ती डगमगली नाहीं. हाहि अनुभव घेण्यास ती तयार झाली. ती मला घेऊन ठळक ठिकाणीं फिरली. एखाद्या दुकानांत गेली तर, तिच्याकडे व माझ्याकडे दुकानदारानीं कपाळाला आंठ्या घालून चमत्कारिक रीतीनें पाहत म्हणावें,

' काय ?–मदत ? कुणाला ? या पोराला ? हें पोर शिकणार ? चार चार मास्तर ठेऊन देखील श्रीमंताचीं मुलें शिकत नाहींत. परीक्षेंत चार चार वेळां नापास होतात. नेतील पैसे आणि खातील हॉटेलांत. जा–निघा इथून. आमच्या-कडून नाहीं व्हायची मदत–एखाद्या चहाच्या दुकानांत ठेवा याला कपबशा धुवायला. '

कुणी म्हणूं लागले,

' अलिकडे हें फार झालंय बुवा. भंडावून सोडलंय या बायांनीं आणि पोरानीं. जो उठला तो येतो मदत मागायला. द्यायची कुठली मदत या सर्वांना ? '

तिसऱ्यानीं त्रासून म्हणावें,

' नाहीं हो शिकत असलीं पोरें ! ज्यानां देतों आहों मदत त्यांचींच या महि-न्यापासून बंद करणार आहों आम्हीं. '

या लोकाचे असले उद्‌गार ऐकून माझी आई अगदीं खिन्न होऊन जाई. तिचे डोळे पाण्यानें भरत हें पाहून मी आईला म्हणालों, ' आई चल घरीं. मला नको आहे कुणाची मदत, मी शिकेन कसा तरी. ' मला आतां समजूं लागलें होतें. मलाहि लोकांचा मनस्वीं राग आला होता. मी शाळेंत नादारीचा अर्ज केला. माझा अभ्यास पाहून मला नादारी मिळाली. शाळेंतून मला पुस्तकेंहि मिळत. गरीब विद्यार्थीफंडांतून मदत घेऊन वरकड खर्च मी भागवी. अशा प्रकारें बिकट परिस्थितीशीं झगडत झगडत मी मॅट्रिक झालों. मॅट्रिक झाल्यावर मी नोकरी धरावी अशी माझ्या आईची इच्छा होती; पण माझी इच्छा पुढें शिकण्याची होती. परीक्षेंत मला उत्तम गुण मिळाले होते, त्यामुळें मला कॉले-जात स्कॉलरशीप मिळाली. फावल्या वेळीं मी शिकवणी करीत होतों व माझा खर्च भागवीत होतों. हें पाहून बाबास आनंद होई. ते म्हणत,

' ताई, तुमचा गोपाळ तुमचें नशीब काढील, तुम्हाला हे दिवस विसरायला लावील. देवांनीं बापूंना एकच, पण चांगला मुलगा दिला. परमेश्वरानें त्याला तरी चांगलं आयुष्य द्यावें.'

आईला मी म्हणत असे,

' आई मी शिकेन. चांगला पैसा कमावीन आणि तुला सुखी करीन. तुझी

सेवा करीन. तूं माझ्याकरितां फार खस्ता खाल्ल्यास, हालअपेष्टा भोगल्यास. तुझे पाग मला अनंत जन्म घेतले तरी फिटावयाचे नाहींत.'

त्यावर माझी आई म्हणे ' काय करशील तें खरें. कुणी पाहिले आहेत ते दिवस ? हवेंत मनोरे बांधण्यात काय हंशील ? आपण जों जों सुखाचा विचार करूं लागावं तों तों सुख जास्त लांब पळत असतं. आपण इच्छा करावी एकाची आणि होतं तिसरंच असा देवाघरचा निष्ठुर न्याय आहे. माझा तर अनुभव असा आहे की, सुखाचा मार्ग आक्रमण करण्यास दुःखाचे पर्वतच प्रथम आक्रमण करावे लागतात. '

' आई, अशी निराश होऊं नकोस. तूं निराश होशील तर माझ्या सर्व आशा फोल होतील. या नश्वर जगात आशा धरूनच चाललें पाहिजे' असें मी तिला वारंवार सांगे. पुढें मी इंटर झालों. पोष्टात नोकरी मिळविली व मला कॉलेज संभाळता येईल अशी ड्यूटी मागून घेतली. मी बी. ए. च्या टर्मस भरल्या. अभ्यास केला. लहानशी खोली घेऊन आम्हीं आमचें बिऱ्हाड थाटलें.

* * *

मी कॉलेजात असतां महात्माजींची चळवळ चालू झाली. याचवेळीं पुष्कळानीं कॉलेज सोडलें. मी फक्त स्वदेशीचें व्रत आचरणात आणलें होतें. मी खादीशिवाय कांहींही वापरीत नव्हतों. परीक्षेला थोडे दिवस राहिले होते. कॉलेजची टर्म पुरी झालेली होती. चळवळ जोरांत होती. मुंबईत संपूर्ण गांधीराज्य झालें होतें तेव्हा !

इतक्यांत टेलीफोनची घंटा वाजली. गोपाळरावानीं रिसीव्हर उचलला व टेलीफोन घेऊन ते कुणाबरोबर बोलूं लागले.

मी ऑफिसात निघालों होतो. माझा पोषाख खादीचा होता. रस्त्यात आझाद मैदानाजवळ कुणी एकानें माझ्या हातात कॉंग्रेस पत्रिका ठेविली. मी ती घेतलेली पाहून पोलिसानें मला ताबडतोब गिरफदार करून मॅजिस्ट्रेटसमोर उभें केलें ! माझ्यावर खटला भरला. माझ्याबरोबर आणखी चौदा जणास अटक केली होती. त्या सर्वांना सहा सहा महिन्याची शिक्षा देण्यात आली. आमच्यापैकीं कुणींहि डिफेन्स दिला नाहीं कीं, स्टेटमेन्टस् केलीं नव्हती. आम्हीं सरळ तुरुंगाची वाट धरली. नोकरींतून मला बडतर्फ करण्यांत आलें ! पुन्हां बिकट परिस्थिति उत्पन्न झाली.

मी तुरुंगातून परीक्षेस बसण्याची परवानगी मागितली. मला जबाब आला कीं, माफी मागून सुटका करून घ्यावी. लांछनास्पद माफी मागून सुटका करून घेणें

मला अयोग्य वाटलें. मी नुकसान सोसण्यास तयार झालें. आई मला भेटण्याकरितां तुरुंगात येणार होती. ती आली नाहीं. तिच्याऐवजीं बाबाच आले होते. माझी आई आजारी होती. माझी सुटका होण्यास बराच अवधी होता. मी काळजींत होतों, पण सुदैवानें लौकरच गांधी-अरवीन करार होऊन आमची सुटका झाली !

\+ + +

आई क्षीण झाली होती. परीक्षेला बसण्याकरितां पैसे भरण्याची मुदत संपली नव्हती. मी पैसे भरले व त्या परिस्थितींत परीक्षेला बसलों. आई अतिसाराच्या आजारानें बेजार होती. योग असा कीं, ज्या दिवशीं माझा बी. एचा निकाल लागला-त्याच दिवशीं रात्रीं माझी आई अत्यवस्थ झाली. ती म्हणाली,

' आता मी मेलें तरी हरकत नाहीं. तूं चांगला वाढलास, शिकलास, माझ्यामागे पडलास-मला संतोष आहे. मला काळजी राहिली नाही. तुझें कल्याण...होईल.' असं म्हणतां म्हणतां तिला रडूं कोसळलें. तिला शब्द फुटत नव्हता. तिला ठसका आला. ती एकदम गाफील झाली. तिने डोळे वटारले व माझा कायमचा निरोप घेतला !

मी रडूं लागलें ! तिनें भोगलेलें सर्व दुःख माझ्या डोळ्यांसमोरून जाऊं लागलें. तिचा प्रत्येक शब्द माझ्या हृदयात थैमान घालूं लागला. मी बी. ए झाल्यावर तिला सुखी करणार होतों. तिची सेवा करणार होतों. इच्छावें एक आणि होतें दुसरें या माझ्या आईच्या शब्दाची मला आटवण झाली. माझ्या हातांत काय होतें ? गजबजलेलें एवढें जग, पण तें मला भेसूर वाटत होतें ! जगात मला कुणी राहिलें नव्हेंत. मी फटिंग झालों. यापुढें नोकरी करायची नाहीं असें मी ठरविलें होतें. आणि समजा, मी नोकरीला तयार असतों तरी, नोकऱ्या होत्या कुठें ?

सरकारांत ब्राह्मणाना नोकऱ्या मिळत नव्हत्या. मी आपला काहीं उद्योग करावा या हेतूनें मीं हें बटाट्यांचें दुकान घालून बसलों. माझ्या दुकानांत मीं एकच भाव ठेवला. माल चोख देऊं लागलों. लबाडी नाहीं, लुच्चेगिरी नाहीं, माप खोटें नाहीं अशी लोकांची खात्री झाली. मला गिऱ्हाइकें मिळूं लागलीं. मी डायरेक्ट माल मागवून या सर्व दुकानदारांस पुरवूं लागलों. माझा धंद्यांत चागला जम बसला.

मी ब्राह्मण असून हा हलका धंदा करतों म्हणूनच ना आपण मला हंसला होता ?

आलेल्या मनुष्यास कबुली देण्यापलिकडे गत्यंतर नव्हतें. तो खजील झाला व लाजला.

मी जाणून आहें हा धंदा हलका आहे. हें शास्त्रबाह्य आहे. काका, आतां शास्त्र, श्रुती, स्मृती याच्यावर भिस्त ठेऊन राहण्याचा मनु राहिला नाहीं. आता ब्राह्मणानीं, नोकऱ्याची आशा सोडून—असल्याच धंद्याकडे वळलें पाहिजे. श्रुती, स्मृती त्यांच्या उपयोगास यावयाच्या नाहींत. पोटासाठीं कोणताहि प्रामाणिक धंदा करण्यास कुणालाही हरकत नाहीं. आपण मात्र आपला दृष्टिकोन बदलला पाहिजे. एकाकाळीं आपण सेवाधर्मही कनिष्टच मानीत नव्हतों का ? पण तोच कनिष्ट मानण्याऐवजीं आपण आतां नोकरी असणें हें भूषणावहच मानतों ना ?

मला माझ्या जातीचा अभिमान नाहीं असें नाहीं पण, तुम्हीं पाहिलेतच ना ? माझ्या आपत्काळीं मला कुणीही मदत केली नाहीं आणि आतां मात्र जो तो बादरायण संबंध जोडून मजकडून मदत घेऊन जातो !

मी स्नान रोज दोन वेळा करतों. संध्या पूजा करीत नाहीं. माझ्या उभ्या-आयुष्यात मी गंधाचें एक बोटदेखील देवाला टेकलें नाहीं की, स्वतः लावलें नाहीं गळ्यांत मी जानवेंही ठेवलें नाहीं. पण, दया, शांति व समता हीं तत्त्वें मात्र अक्षरशः पाळीत आहें.

गळ्यात जानवें अडकवून, टिळेमाळा घालून, शास्त्र, श्रुती, स्मृती, यांचें स्तोम माजवून जे कर्मठपणाचा टेंभा मिरवितात ते ढोंगी—लबाड असें मी समजतों !

माझी परिस्थिति-जिच्या पुण्याईनें सुधारली, जिनें मला हालअपेष्टेनें वाढविलें, शिकविलें, जिच्या गोड पंखाखालीं माझ्या आयुष्याचे कठीण दिवस गेले, जिनें जननी आणि जन्मभूमि स्वर्गाहूनहि श्रेष्ठ आहे हे पटवून दिलें, जिला वेदातहि मातृदेवो भव म्हणून आद्यस्थान मिळालें आहे, ती माझी—मला जन्म देणारी आई, माझ्या सुखाच्या काळात मला टाकून गेली. तिला सुखी करायची माझी इच्छा जागच्या जागीं मावळली याचेंच मला दुःख होतें.

वरील निर्वाणीचे उद्‌गार ऐकून, आलेला गृहस्थ गहिंवरला व म्हणाला, ‘ तुमच्या आई शूर होत्या. त्यांनीं त्यांचें कर्तव्य मोठ्या धैर्यानें बजाविलें. सुपुत्र

निर्माण होण्यास अशाच माता असाव्या लागतात.' असें म्हणून त्यानें माझा निरोप घेतला.

* * *

जातांना दुकानदाराचीं शास्त्रसंबंधाचीं मतें पाहून तो गृहस्थ पार हादरून गेला. त्यांनीं त्याची अधिक चौकशी केली.

मुंबईत त्याची माहिती नाहीं असा एकही माणूस नव्हता. तो व्यापारी वर्गात मोठा मनुष्य म्हणून मोडत होता; आणि गाजावाजा न करितां बहुतेक संस्थांस मदत देत होता आणि म्हणूनच त्याची गणना मुंबईतील प्रमुख दानशूरांत होत होती.



# नवे संसार

‘ **को**ण ? कमल जोशी ! ’

‘ कशी ग अचानक भेटलीस ! मला कल्पना पण नव्हती तूं भेटशील अशी ! कुठंहि जा–आपल्या आपण तिघी एकीकडे दिसायच्या ! नाहीं ग ? ’

‘ कुठं आहे ती मालू ? ’

‘ मालू का ? आहे ती इथंच. सुटली बिचारी,—करील लग्न. ’

‘ लग्न करील ? काय ? अशी काय करतेस ? आहे का तुझं डोकं ठिकाणांत ? तिचं लग्न नव्हतं का झालेलं ? ’

‘ चुकल्यें ग. पुनर्विवाह करील.’

‘ म्हणजे ? जयंतचं काय झालं ? ’

‘ नाहीं का काहींच माहीत तुला तिचं ? कुठं आहेस तू इथें ? आहेसना दोनचार दिवस ? भेटेन तुला आणि सांगेन सगळा वृत्तांत तिचा. तो असा चुटकीसरसा नाहीं व्हायचा सांगून ! ’

‘ कायग–हे कोण ? यजमान का ? माझी तरी दे बाई ओळख करून. अशी कशीग आफ्रिकेंत उतरलीस ? ’

हंसून ‘ बरं पुरे. ऐकलं तर काय म्हणतील ? पोरकटच आहेस. ये–देतें ओळख करून. ’

‘ चालेल ना तुला ? ’

‘ बरीच कीं आहेस. केव्हांपासून झालीस इतकी स्पष्टवक्ती ? ’

‘ नाहीं म्हटलं–लग्न केलयस तूं, गेली असशील जुन्या वळणावर ! ’

कमल जोशीनें सरलेचा हात धरला व तिला खेंचीत ती आपल्या नवऱ्यापुढें घेऊन गेली.

‘ ही सरला बरंका. अगदीं हायस्कूलपासून इंटरपर्यंत आम्हीं बरोबर होतों.. ती गेली मेडीकलला अन् डॉक्टर आहे. ’ तिनें कमलच्या नवऱ्यापुढें हात केला. त्यानें ‘ अस्सं ’ म्हणून तिच्याशीं शेकह्यंड ( हस्तांदोलन ) केला.

कमल पुढे म्हणाली,

‘ इंजिनीअर आहेत बरंका. ब्रीज बांधायचं काम चाललं आहे बडोद्यास, तिथं असतों आम्हीं. आम्हीं सरदारगृहांत उतरलों आहों. आहों चार सहा दिवस. ये–तुला केव्हां फावेल यायला ? ’

‘ आम्हा डॉक्टराना दोनप्रहरचा वेळ काय तो मोकळा. येईन उद्यां दोनच्या सुमारास ’ असं म्हणून ती मुलांच्या झोक्याजवळून व समुद्राकडे पाहत पाहत टॉवर खालून झरझर गिब्स रोडवरून निघून गेली. कमल व तिचे यजमान तिथेंच वेलीच्या कमानीखालीं एका बांकावर बसले व वेळ होताच टॅक्सीनें सरदार-गृहांत गेले.

दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें बरोबर दोनच्या ठोक्याला डॉक्टरीणबाई हजर झाल्या.

कमल मेक्यानो घेऊन मुलाला खेळवीत होती.

मुलाच्या हनुवटीला हात लावून डॉक्टरीणबाई म्हणाल्या,

‘ काय नांव तुझं ? ’

‘ वसंत ’

‘ गोड आहे नांव. एवढाच ना ? ’ टेबलावरील आरशांत पाहत व केंसाचे आंकडे दाबीत तिला म्हणाली.

‘ बरं बाई–लेंढार नाहीं लागलं तुझ्यामागें !’

कमल तिच्याकडे न्याहाळीत म्हणाली, ‘ किती फॅशन केलीस तूं तरी, मालू-च्या खालीच !’

‘ गेली ग तिची फ्याशन. ती खरी मैत्रीण आपली. हायस्कुलात, कॉलेजात सर्व चळवळींत पहिली अन् हुषार. राह्यची कशी, झोकात ! सर्वांशीं गोड–मिळून मिसळून. चंपक मेहता बरोबर जायची तेव्हां गुजराथणीसारखी दिसायची अन् देबूबरोबर असली कीं, ती पारशीण नाहीं असं कोण म्हणेल तिला ? तिचे ते उंच टांचीचे हरतऱ्हेचे बूट, तिचे ब्लाऊझ, तिच्या उंच उंच गोल साड्या–कशा ? खुलून दिसत तिला.’

' तिचा बाप जस्टीस का कोण होता ना ग ? '

' हो–त्यानें तिला आय्. सी. एस्. नवरा पाहिला होता पण तें तिचं लग्न मोडलं ! म्हणे कुणीसं त्याला निनावीं पत्र लिहिलं आणि तेव्हांपासूनच तिचं कॉलेज सुटलं आणि या जयंतबरोबर तिचं लग्न झालं ! '

' जयंतानेंहि कॉलेज सोडलं अन् नोकरी धरली. ब्यारिस्टरचा मुलगा म्हणून जमलं त्याचं ! त्यांनींहि हुंड्याच्या लालचीवर लावलं लग्न तें !'

' लग्न झाल्यावर तिचे कॉलेजचे मित्र तिला भेटत. तीहि त्यांच्याबरोबर हिंडाफिरायला जायची ! घरच्या माणसांना हें कसं खपणार ? अर्थात् त्यांचीं व्हायला लागलीं भाडणें. त्याचा परिणाम असा झाला कीं, ते निघाले वेगळे !

जयंत तिच्यावर भारून गेला होता. हुरळला होता. त्यानं तिला कधीं बंदी केली नाहीं कीं, नवरेपणा तिच्यावर गाजवला नाहीं. दोघे चांगलें खेळीमेळीनें वागत. तिचे दोस्त मात्र तिला लुबाडीत. ते म्हणत,

' टाक पैसे. आमच्याशीं आहे गाठ. जर आम्हीं तोंड उघडलं तर होतील डोळे पांढरे ! ' करते काय बिचारी, तिला पुष्कळशा गोष्टी जयंत पासून लपवून ठेवावयाच्या होत्या. त्यामुळें ती त्यांना कधीं पैसेच दे, कधीं दागिनाच दे असं करी. जयंत मूळचा व्यसनी. त्याला रेसचा लागला नाद. छपन्न ठिकाणीं झाल्या त्याच्या नोकऱ्या. अखेर झाला तो अन्नाला मोताद. सासरा जिवंत होता तोंपर्यंत त्यानें अब्रूसाठीं फेडली यांचीं कर्जे. नंतर कोण कशाला कुणाला विचारतो ? तरी–ती बहीण बरी–तिनें याना दिला थारा. भेटायची मालू मला वरचेवर आणि सांगायची तिच्या सुखदुःखाच्या गोष्टी. ती म्हणायची,

' मला कंटाळा आला आहे. तूं बरीक लग्न नाहीं केलंस तें ठीक. आहे का कांहीं कुणाचं एक कीं दोन ? तूं आपली स्वतंत्र; मीं लग्न करून अडचणींत सांपडलें आहे. जयंताची नोकरी सुटली. तो कर्जबाजारी झाला. व्यसनी झाला. सर्व होतं नव्हतं तेवढ घालवलं त्यानं ! '

' तिला एक बिल्डिंग दिलं होतं ना ग आंदण तिच्या वडिलांनीं ? '

' हो—चांगलं दोनशें अडीचशें रुपये भाडं यायचं दर महिन्याला त्यांना, पण बायकोच्या साड्या सुद्धां मारवाड्याकडे जिथें गहाण पडल्या, तिथें काय रहाणार दुसरं ? इतकं करून सुख नाहीं तें नाहींच. रोज भांडणें. अन् मारामाऱ्या रोज तो तिला छळी म्हणे. '

'नांवाचा अगोदरच डंका वाजला होता. पत्करीत होता कोण? आणि अजून तरी काय तुमचे धिंडवडे चालतात ते कळत नाहींत मला कीं काय?'

असं तो म्हणाला कीं, हिला यायची चीड. ही म्हणायची,

'धिंडवडे, धिंडवडे काय? काय आहे तुमच्या घरांत मला सुख? मारे दिली मला बॅरिस्टरच्या मुलाला. बरी लावली आहे खपायला मला. जिचं नख नसतं दृष्टीस पडलं, तिच्यावर तुमच्यासारख्याला चांगलं तोंडसुख घ्यायला मिळते. काय आहे लायकी माझी या घरांत ती आहे ठाऊक मला. जरा कुठें विरंगुळ्या-साठीं गेलं कुणाकडे, कुठें कुणाबरोबर टेनीस खेळलं तेंहि नाहीं खपत! करायचं तरी काय? कंटाळा आलाय—नको घर असं झालय्. देवा! नको हें स्त्रियांचें जिणं.'

'अशी का होती तिची स्थिति? मी म्हणत्यें, लग्न झालय् तिचं, मुलं बाळं आहेत तिला, असेल आपली मजेंत.'

'छे-छे, मजेंत कसली? दिसतं तसं नसतं! इकडे तिकडे बिऱ्हाडं नाचवून व याला त्याला भूलथापा देऊन जितके दिवस काढता आले चैनींत—तितके दिवस त्यानीं काढले मुंबईस व अखेर बायका मुलांना ठेवलं कांदिवलीस बहिणी-कडे व आपण केला पोबारा!

नोकरी तर त्याला लागली नाहींच, पण डोकं मात्र फिरलं त्याचं! भटकत होता तो, इथं तिथं नोकरी नोकरी करीत.

केव्हां केव्हां माझ्या दवाखान्याजवळीहि येऊन बसे तो. इतकी गर्दी असायची त्याच्या भोंवतीं कीं, बोलून सोय नाहीं.'

'इतकी कां बाई गर्दी त्याच्या भोंवती? म्हणून विचारलं माझ्या बॉयला.' तो म्हणाला,

'बाई, आकडे देतो तो! त्यानें आकडा दिला म्हणजे लागतातच पैसे! चांगली चालली आहे चंगळ त्याची!' कमल मधेंच म्हणाली, 'चांगली चंगळ! बिचारी बायको राह्यली आहे याच्या नांवानें खडे फोडीत.' मालू म्हणायची,

'जयंत क्लबमधून आला म्हणजे, सारखा म्हणायचा 'मी तुला बुडवलं. तुला भिक्षेला लावलं. तूं श्रीमंताची मुलगी, मी कुठें नव्हतों श्रीमंताचा मुलगा? माझा बाप ब्यारिस्टर होता. मी गाडीशिवाय पाय नाहीं दिला बाहेर. तुझेच पाय पांढरे

असतील ! नाहीं–नाहीं माझे असतील–नाहींतर कुणाचे तरी असतील. नाहीं तर नसतील सुद्धा. काहीं नाहीं नशिबांत होतं तसं झालं ! जा—तूं—जा—कर दुसरं लग्न !'

'ही नुसती लग्नाची कल्पना—मला कशीशीच वाटे !'

'वाटणारच ! एकदा लग्न झाल्यावर हिंदू स्त्रीला काय शक्य असतं ? नवरा कसाहि असला तरी, तिनें त्याचा–त्याच्या घरच्या माणसांचा छळ सोसला पाहिजे आणि पुरुषांनीं मात्र, बायको पसंत नसली––तिला व्यंग असलं म्हणजे खुशाल टाकावीं आणि हवी तेवढीं लग्न करावींत हा स्त्रीजातीवर अन्याय नाहीं का ?'

'अन्यायच नुसता ? जुलूम !—आम्हीं बायका जोंपर्यंत शिकणार नाहीं, कायदे मंडळांत जाऊन कायदा बदलून घेणार नाहीं, तोंपर्यंत आपली स्थिति अशीच राहणार.'

'मालू नाहीं का शिकलेली ? ती काय करते ?'

'वा–ती काय करते म्हणजे ! तिनें क्लास काढला आहे कादिवलीस. ती मुलींना शिकवते. पैसे मिळवते ती ! पण तिच्या जागीं एखादी अशिक्षित बाई असती तर, तिच्या हालाला कुणी विचारलें नसतें ! आपल्या पांढरपेशांच्या बायका–सदैव नवऱ्याच्या गुलाम ! त्यांना काय गिरणींत जातां येतं, का लोकांचीं भांडी घासतां येतात ? त्यांनीं तसंच मरावं नाहींतर कायमचं उठून जावं समाजांतून ! असंच कीं नाहीं ?'

'मालू एवढी शिकलेली तिनें कशीबाई दिली जाणून बुजून संमति या लग्नाला !'

'तिनें नाहीं दिली संमति. त्यांच्या अगोदर झाल्या बऱ्याच भानगडी ! ती म्हणत होती माझं लग्न–मी जमवीन म्हणून. ओळख नाहीं देख नाहीं अशाच्या बरोबर, मी नाहीं लग्न करणार पण तिचा बाप रागावला तो म्हणाला,

'मुलींना, अधिक शिक्षण देण्यांत अर्थ नाहीं. त्या फाजिल होतात. हिच्या असल्या गुणानं हातचं चागलं स्थळ गेलं ! आपल्या इभ्रतीला शोभेल असंच नको का स्थळ बघायला ? उद्या भलत्या सलत्याबरोबर लग्न लावलं तर तोंड नाहीं काढता येणार मला बाहेर–याची कांहीं तरी आहे का लाज ? तें कांहीं नाहीं मी जमवीन त्याच्याबरोबर लग्न लावलं पाहिजे. मला नाहींका कळत तुझं हीत कशांत आहे तें !'

' सुरेशवर प्रेम होतं ना ग तिचं ? '

' हो ती बिचारी काय करणार ? ती हतबुद्ध झाली. तिनें सुरेशला सांगितलं,

' नाइलाज आहे माझा, तुझ्याबरोबर लग्न लावायला माझ्या वडिलांची संमति नाहीं. वाटलं होतं वडील आपल्या विवाहाच्या आड येणार नाहींत. ते सुशिक्षित आहेत ! सुधारक आहेत पण ते श्रीमंत, तुम्हीं गरीब. ते मोठ्या हुद्यावर, तुमचा बाप कारकून. हें त्यांच्या इभ्रतीला कसं शोभावं ! मी काय करणार ? मी स्वतंत्र नाहीं. माझ्या वडिलांच्या विरुद्ध मला जातां येत नाहीं. तुम्हीं माझा नाद सोडा.'

हें ऐकून तो हादरला. वाईट वाटलं त्याला. तो म्हणाला,

' माझी गरिबी माझ्या सुखाच्या आड आली. अशी गोष्ट घडेल असें माझ्या स्वप्नांत सुद्धां मला वाटलें नव्हतें ! मी तुझ्याशिवाय दुसरं कुणाबरोबर लग्न लावणार नाहीं ! माझा निर्धार कायम आहे. तूं ज्याला तुझा बाप देईल अशा श्रीमंत मुलाबरोबर लग्न लाव. श्रीमंतींत रहा. मजा कर. मी आपला गरिबींत माझें ध्येय गांठून एक जन्म असाच अविवाहित राहीन.' असे एकांतिक आणि निर्वाणीचे उद्‌गार त्यानें काढले. त्याच्या बरोबर लग्न लागलं असतं, तर तीं दोघें सुखी झालीं असतीं पण, ही आपली विवाह पद्धती त्यांच्या सुखाच्या आड आली. तो आज वकील आहे व ज्या कोर्टांत तिचे वडील न्यायाधीश होते त्याच कोर्टांत नामांकीत वकील म्हणून त्याचं नांव गाजत आहे. दुःखात अहर्नीश होरपळणारी बिचारी मालू आज सुटली आहे. तिचा जयंत, वेडा होऊन, वेडाच्या लहरींत नोकरी–नोकरी करीत दंग्याच्या दिवसांत बेछूट भटकत असतां–अज्ञात इसमाकडून मारला गेल्यामुळें, तिच्या इच्छेप्रमाणें सुरेशबरोबर तिला पुनर्विवाह करण्यास मार्ग मोकळा झाला आहे ! '

नंतर इकडल्या तिकडल्या गोष्टी सांगून दवाखान्यात जायची वेळ होतांच, डॉक्टरीणबाई, पुन्हां केव्हां आलीस मुंबईस तर भेटल्याशिवाय जाऊं नकोस असं कमलला सांगून व वसंतचा गालगुच्चा घेऊन निघून गेली.



# बिचारा रंगू

**मी** पुण्याचा राहणारा. भाऊसाहेब माझ्या मावशीचे यजमान, त्यांचा पूर्वी मुंबईस लहानसा रंगाचा व्यापार होता, मागच्या लढाईत जे कांहीं व्यापारी उदयास आले त्यांत एक हे होते. अर्थात् ते श्रीमंत होते. श्रीमंताचा मला मनापासून तिटकारा असे आणि म्हणून मी त्यांच्या येथें जाण्याचें बरींच वर्षें टाळीत होतों.

यंदा-भाऊंचा आग्रह बराच झाला, म्हणून मी त्यांच्या इथें आलों. ते ब्रूज रोडवर त्यांच्या स्वतःच्या इमारतींत राहत होते. मुंबई म्युनिसिपालिटीची निवडणूक नुकतीच झाली होती. ते त्या विभागातून, अगदीं मेटाकुटीनें शेवटच्या नंबरानें निवडून आले होते. त्यांच्या घरीं त्याचे एक दोन मित्र सिगारेट, चिरूट ओढीत बसले होते.

माझी आजपर्यंतची समजूत कीं, सांकेतिक भाषा फक्त राजकारणांतच असेल, विवाहित अविवाहित स्त्री-पुरुषातच असेल; पण नाहीं, साध्या खासगी भाषणातूनही तिचा उपयोग केला जातो.

त्यांच्या गोष्टी चालल्या होत्या. मला त्यांचा बोध मुळींच झाला नाहीं. त्याचा चहा चालला होता. माझ्याहि पुढें चहाचा कप, खारी बिस्किटें वगैरे जिन्नस येऊन दाखल झाले.

मला मुखमार्जन वगैरे करावयाचें होतें. मी तसाच स्वस्थ बसलेला पहातांच भाऊंच्या ध्यानांत तें आलें. त्यानीं रंगूला हाक मारली.

तो हंसत, लवत मोडत त्याच्या पुढें येऊन उभा राहिला.

'कायरे ? याना तोंड धुवायला पाणी वगैरे दिलें नाहींस का ? करतो आहेस काय तिथें सगळा दिवस ? काहींच कसें तुम्हांला कळत नाहीं. केव्हां येणार अकला तुम्हांला ?'

इतरांसमक्ष त्याचा पाणउतारा झाल्यामुळें त्याचा चेहरा क्विनाईनचा डोस घेतल्याप्रमाणें झाला.

त्यानें आपली जीभ चावली. त्याच्याकडून मोठी चूक झाल्यासारखी त्याला वाटत होती. तो अगदीं ओशाळून गेला. तो ठुमकत ठुमकत मला आतल्या खोलींत घेऊन गेला.

खुण्टाळ्यावर मी कोट टोपी ठेवल्यावर त्यानें मला स्नानगृहांत नेलें. तिथें पावडर वगैरे देऊन टॉवेल घेऊन तो कोणतें तरी गाणें गुणगुणत उभा राहिला. तो चांगला गुटगुटीत असून—गोरापान देखणा होता.

त्याची नजर चुकवून—मी त्याच्याकडे बारकाईनें पहात होतों. त्याच्यांत मला कांहीं तरी चमत्कारिकपणा दिसत होता. हा कोण होता हें मला माहीत नव्हतें ! त्याच्या चालण्यावरून व अंगविक्षेपावरून तो एखाद्या नाटक कंपनींत स्त्रीनट असावा अशी माझी कल्पना झाली !

मी आपलें तोंड धुवून पुन्हा बाहेर आलों. चहा वगैरे जिन्नस तसेच तिथें माझी वाट पहात होते.

चहा थंड होऊन त्यावर थरी जमली होती. मी तो तसाच माझ्या घशाखालीं लोटला व बाकी जिन्नस तसेच ठेऊन दिले.

मला सकाळींच कांहीं खाण्याची संवय नव्हती.

मंडळी उठून गेली होती. भाऊ त्यांच्याबरोबर जिन्याच्या तोंडावर बोलत उभे होते.

आंत टेबलावर टाईम्सचा ताजा अंक पडला होता. एका कोपऱ्यांत एका युरोपियनचा बस्ट होता. भिंतीला लागून एक दोन स्प्रींगच्या कोचा होत्या. दरवाजाच्या डाव्या बाजूला साहेबी पद्धतीचे टोप्या व काठ्या ठेवण्याचा स्टॅंड होता. मध्यभागी शिसवी फिरती खुर्ची असून पुढें भलें मोठे खणाचें काळें कुळकुळीत टेबल होतें.

टेबलावर सिगारेटचा डबा, एशपॉट, म्याचबॉक्स इतकी सामुग्री होती. भिंतीवर, सिन सिनेरी असलेल्या तसबिरी लटकत होत्या.

खोलींत मी एकटाच होतों. भाऊ घाईघाईनें वर आले. आपला पोषाक केला व त्या इसमांबरोबर महत्त्वाच्या कामाकरितां धांदलीनें मोटारीनें निघून गेले.

माझी मावशी हयात नव्हती. तिचीं मुलें जाणती होतीं तरी, ती फक्त मला नांवानेंच ओळखीत. मीही त्यांना लहान वयात पाहिल्यामुळें ओळखणें शक्य नव्हतें.

तिथें वावरत असलेल्या मुलांवर मुंबईच्या राहणीचा व श्रीमंती डौलाचा परिणाम झाला होता.

इंग्रजी पद्धती प्रमाणें परिचयाशिवाय बिनओळखी माणसाबरोबर बोलणें त्यांना अपमानकारक वाटत होतें ! तीं आपल्याच रंगात होतीं.

मी आपला सह्याद्रीचा अंक चाळीत होतों पण माझें लक्ष वाचनाकडे नव्हतें !

आपण उठून तडक माधवाश्रमांत जावें कीं काय, असें मला वाटूं लागलें होतें. माझी मनःस्थिति चमत्कारिक झाली होती. मी अखेर तिथेंच राहण्याचें ठरविलें इतक्यांत, आमचे भाऊसाहेब रुबाबात बाहेरून आले. सुमार दहाचा होता. घड्याळाचे टोले पडतच होते.

त्यांनीं आपली घडीची टोपी टेबलावरच ठेविली. गड्यानें त्याचा काळा काश्मिरी अंगरखा काढून कपाट उघडून हॅंगरवर अडकविला व कपाट बंद करून तो शेठचे बूट काढण्याकरिता उभा राहिला.

भाऊ माझ्यासमोर इझीचेअरवर बसले. गड्यानें बुटाच्या दोऱ्या सोडल्या. बूट काढला, स्टॉकीन्स काढून ते बुटात खोऊन त्यांनीं ते स्टॅंडवर ठेवून दिले व तो आपल्या कामाला गेला.

भाऊसाहेब माझ्याकडे पाहून किंचित हंसले व त्यांनीं विचारपूस केली.

आपणांस आताशीं एक मिनिटाची देखील फुरसत मिळत नसल्याची मोठ्या अभिमानानें त्यांनीं तक्रार केली. त्यांनीं आपल्या पाटलोणीच्या खिशात हात घालून ते रुबाबात उठले व त्यांनीं मला आत नेलें.

माझी मुलाना ओळख करून दिली. मी आल्यामुळें त्यानीं आनंद व्यक्त केला. मात्र मुलांनीं एवढा वेळ न ओळखल्यामुळें मला तिथेंच ताटकळत राहवें लागल्याबद्दल त्यानीं दिलगिरी व्यक्त केली.

त्याबद्दल मला कांहीं वाटलें नाहीं असें भासविण्याकरिता मी म्हटलें,

' ओळख नाहीं मग काय करणार ! होतो मी आपला वाचीत. '

भाऊसाहेब हंसले. आपल्या शुभ्र झालेल्या केसावरून त्यानीं हात फिरविला व ते आपल्या कामाला लागले.

माझी एकदांची व्यवस्था लागल्याचें पाहून मला हायसें वाटलें !

भाऊंच्या मुलांनीं मला आपलें बिल्डिंग दाखविलें. आम्ही दिवाणखाने वगैरे पाहत जात होतों. दिवाणखान्याला लागूनच एक लहान खोली होती. तींत मला नेण्याचें तो टाळीत होता; पण हॉलचा दरवाजा बंद असल्यामुळें त्याचा नाइलाज झाला. आम्हाला त्याच खोलींतून जाणें भाग झालें. ती खोली नीट नेटकीच होती. तींत एक कपाट, एक ड्रेसींग टेबल व तरतऱ्हेच्या सुंदर तसबिरा होत्या तिथें.

ड्रेसींग टेबलावर स्त्रियांच्या शृंगाराचें साहित्य होतें.

ही खोली कुणातरी रंगेल स्त्रीची असावी अशीच कुणी कल्पना केली असती. ही रंगूची खोली बरं का असें मला लगेच सागण्यात आलें ! मी क्षणभर उभा राहून खोली चौफेर पहात होतों.

' हा रंगू कोण ? बराच हौशी दिसतो. '

' कुठें नाटक कंपनींत...? '

' नाहीं. '

' तो अनाथ आहे. आमच्या इथेंच असतो. त्याची गोष्ट मजेदार आहे. त्याच्या आईला फक्त मुलगे झाले. मुलगी झाली नव्हती. तिला मुलीची हौस होती. तिनें याला लहानपणापासून चांगली समजूत येईपर्यंत परकर चोळी घालून मुलीप्रमाणें वाढवला होता. तो मुलींतच खेळे. आपण पुरुष आहों हें सुद्धा पुष्कळ दिवस त्या बेट्याला खरें वाटत नव्हतें ! अजूनहि तो बायकीच आहे. आतां थोडा सुधारला आहे. आमचा बाजारहाट तोच करतो. त्याला पुरुषी पोषाक मनापासून आवडत नाहीं. तो आरशात पाहून सारखा हळहळत असतो.'

मी आश्चर्यानें माझे डोळे वर चढविले. व थक्क होऊन ' याच्या शिक्षणाचें कसें काय ? ' चौकशी केली.

' कसलें याचें शिक्षण ? '

' जेमतेम वाचतो झालं ! '

'याला चित्रें जमविण्याचा फार नाद आहे. पुन्हां रेकॉडस् मधल्या सर्व लावण्या हुबेहुब म्हणतो. तो जेव्हा एकटाच ' झोक तोल तोल तोऽलग ! ' म्हणतो त्यावेळीं ऐकणाराला आपण ग्रामोफोनच ऐकतों आहों असा भास होतो.

चित्र कुठेंहि कां असेना ? तो तें आणील. उत्तम रीतीनें कापील व फ्रेम करून आपल्या खोलींत लावून देईल. हीं सगळीं चित्रें त्याच्याच हौसेचीं प्रतीकें

आहेत. पहा या कपाटाच्या आंतल्या फळीवर कशीं सुंदर सुंदर चित्रें त्यानें कापून चिकटवून ठेविलीं आहेत तीं! सांगायची मौज म्हणजे, त्यानें एकदां चित्र कापतां कापतां टेबल क्लॉथच कातरून टाकलें! आम्ही खो खो हंसलों.

पुरुषी वळण मुळीं त्याच्यात कसें तें नाहींच. पाहिलातका तो त्याचा शर्ट कसा सदोदित धोतरात खोंचलेला असतो तो! त्याला सिल्कचे उंची कपडे हवे असतात. आहे कीं नाहीं त्याचें सगळें वळण बायकी ?'

'हा त्याचा बायकीपणा घालविण्यासाठीं तुम्हीं कांहीं प्रयत्न नाहीं का केले?'

'हो फार खटपट केली भाऊनीं.'

'मारहि पुष्कळ...'

'मारून काय उपयोग'

'त्याला अद्याप देखील रंगराव म्हणून हाक मारिली तर तो मुळीं ओच देत नसतो! पण रंगूऽ अशी लाडीकपणानें हाक मारताच चट्टकन अगदीं तो कोमल स्वरांत ओ देतो.

त्याला कुणी बोललेलं भाऊंना खपत नाहीं. कुणीसं सांगितलं कीं, हा त्याचा बायकीपणा घालविण्यासाठीं विलायतेंत पुस्तकें मिळतात, म्हणून तेंहि एक पुस्तक चौकशी करून मागविलें. त्यांतले धडे स्वतः आरशांत पाहून करावयाचे असतात. पहिला धडा ताठ चालणें असा आहे. दुसरा धडा नजर समोर असा आहे. पुस्तक चांगलें आहे पण, तो तें करूं लागला कीं, आमचें हंसून हंसून पोट दुखे. अखेर पुस्तकाचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

ही पहा आमच्या समोरच्या गाडगीळ वकिलांच्या मुलीची तसबीर. ही त्याच्या लहानपणाची मैत्रीण. हीजबरोबर तो सागरगोटे, झिम्मा वगैरे खेळे. तो हिच्यावर मनापासून प्रेम करी. तो वाचायला तिच्यामुळें लागला.

मुलीला समजूत आल्यावर याची तिला लाज वाटूं लागली तरी, त्याचं तिला कांहीं वाटत नसे. ती तें खेळण्यावारी नेत असे. ती त्याची कींव करी. ती आतां मोठी झाली आहे, चागली शिकली आहे व तिचें लग्न झालें आहे. ती सासरीं गेली त्यावेळीं हा रडरड रडला! त्यानें त्यावेळीं अगदीं कमाल केली आपल्या वेडपटपणाची. ती त्याला दोन दिवस खुषींत आपल्याबरोबर सासरीं घेऊन गेली. तिनें जेव्हा त्याला आपला फोटो दिला तेव्हां कुठें याची समजूत पटली.'

* * *

मी दोन तीन दिवस तिथें राहिलों. रात्रीं रेडियो बंद करून रंगूकडून भाऊनीं एक लावणी हावभावासह मोठ्या सक्तीनें म्हणून घेतली. कुणी पाहुणे आल्यावर त्याच्याकडून बहुतेक नेहमींच असली तालीम करून घेण्यांत येत असे. भाऊनीं कदाचित् त्याच्याकडून आणखी दोन तीन गाणीं म्हणवून घेतलीं असतीं, पण माझ्या चर्येवर विषाद, खेद, तिरस्कार वगैरे भाव उमटलेले पाहून त्यांची त्यांना लाज वाटली. खरोखर, मला तें रुचलें नाहीं–त्यांनीं त्याच्या वेडपटपणाचा असा फायदा घ्यावा हें गैर होतें. मला तें आवडत नव्हतें.

एकंदरींत मला तेवढ्या अवधींत पुष्कळ गोष्टी माहीत झाल्या.

मावशी एकापरी जिवंत नव्हती हें ठीकच होतें.

भाऊंची सांकेतिक भाषा कशासंबंधीं होती हेंही मला कळलें.

मी ज्या वेळीं आलों, त्याच्या आदल्या दिवशीं, शेख मेमनस्ट्रीटवर एका मारवाड्याच्या पेढीवर पोलिसांनीं छापा घालून बऱ्याच सट्टेबाजांस पकडलें होतें. त्यांत भाऊंचा एक मित्र होता.

त्यानें लोहाणा ग्रेन डिलर्स असोसिएशनच्या सर्व सभासदांकडून त्यांचीं मतें यांना एन केन प्रकारेण मिळवून दिलीं होतीं. त्याला जामिनावर खुला करण्याकरिता हे पोलीस ठाण्यावर धादलीनें गेले होते.

तसेंच—

रंगू हा अनाथ नसून त्यांच्या कैलासवासी रखेलीचा तो मुलगा होता.

मी परत जातांना आगगाडींत तिथलीं पाहिलेलीं सर्व चित्रें माझ्या डोळ्यांपुढून जात होतीं.

रंगूची मला कींव येत होती. माझ्या तोंडून श्रीमंती–बिचारा रंगू–असेच अस्फुट शब्द बाहेर पडत होते.



